# हजरत महमद पैगंबर यांचें चरित्र.

लिहिणार,
**गोविंद नारायण काणे,**
वकील—उमरावती.

मुंबईत
जावजी दादाजी यांच्या
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

हिजरी सन १३१८.

इसवी सन १९००.



किंमत २ रुपये.

६/८८

# अनुक्रमणिका.

खानबहादुर महमद शेक इस्मायल, मिस्तर महमद खैरखान, मिस्तर खाजा हमीदुद्दीन, मि. अबदुल कादर वकील, व रा. रा. नारायण गोविंद केतकर वकील या सद्गृहस्थांनीं ह्या ग्रंथासंबंधीं अनेक उपयुक्त सूचना वेळोवेळीं केल्या त्याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा फार आभारी आहे.

---

5/88

# हजरत महमद पैगंबर

## यांचें चरित्र.

जो आपल्या गुणांच्या योगेंकरून सर्व मानवजातींत श्रेष्ठपद पावता झाला, व ज्याच्या शरीराच्या कांतीनेंच केवळ या धरणीवरचा अज्ञानांधकार नष्ट झाला व ज्याचा जन्मस्वभाव निर्दोष असा होता– व ज्यावर व ज्याच्या अनुयायांवर परमेश्वराची पूर्ण कृपा नांदत आहे असा जो परमेश्वराचा प्रेषित ( अथवा पैगंबर ) त्याचा वृत्तांत येणेंप्रमाणें आहे.

**मक्का** ह्मणून जी **अरबस्थाना**ची मुख्य राजधानी ती पैगंबराच्या जन्मसमयीं पुष्कळच भरभराटीस चढली होती. या पुरीचें स्थान दक्षिणोत्तर उथळ दरींत आहे. पुरीच्या पश्चिमेस लहानशी डोंगरांची रांग आहे. पूर्वेस उंच असे कठिण दगडाचे खडक आहेत. शहराच्या मध्यभागीं **काआबा** ह्मणून पूज्य मानिलेलें काळ्या पाषाणाचें मंदिर आहे. शहरांतील रस्ते त्या वेळीं चिरेबंदी असून सरळ होते. पौरजनांचीं गृहें दगडी कामांनीं सुरक्षित केलेलीं होतीं. तेथील सार्वजनिक मंदिराचें द्वार **काआबा** भजनालयाच्या

व्यासपीठासमोर होतें, व तेथील रहिवाशी तर धनधान्या-दिकेंकरून समृद्ध व बलवान् होते.

**काआबा** भजनालयाची देखरेख व तेथील सर्व कार्यांची व्यवस्था **इस्माइला**च्या वंशाकडे पूर्वापार चालत आलेली होती; परंतु **बाबुल** येथील लोकांनीं भजनालयावर चाल केल्यापासून त्याची देखरेख व व्यवस्था **युरामती** नांवाच्या कुळांतील माणसांच्या हातीं गेली. **बनी युरामती** कुळाच्या हातीं धर्मसांप्रदायाचें व राज्यकारभाराचें चालकत्व आल्या-मुळें कुळांतील मुख्य कारभाऱ्यांनीं आपणांस मालिक ह्मणजे राजा ह्मणवून घेण्याचा सांप्रदाय सुरू केला. इ. सनाच्या तिसऱ्या शतकाच्या आरंभास **बनी खुझआ** नांवाच्या लोकांनीं **यमन** प्रांतांतून चाल करून व मोठें बंड उभारून **मक्का**पुरी व **हिजाझ** प्रांताच्या दक्षिणेकडील भाग हस्तगत करून घेतला. या अवधींत—**बाबुल** लोकांकडून पराभूत झालेले **इस्माइला**चे वंशज धीराधीरानें आपलें डोकें वर काढूं लागले होते. इ० सनाच्या आरंभापूर्वीं जो एक शतवर्ष काल गेला त्यांत **अदनान** ह्मणून **इस्माइला**च्या वंशांतील कोणीएक महापुरुष उदयास आला होता. त्या वेळीं **युरामती** कुळाचा जो मुख्याधिकारी होता त्याच्या कन्येशीं या **अदनाना**नें लग्न लावून **मक्का**पुरीस आपलें घरदार करून तेथें तो वस्ती करून राहिला. **नज्द** व **हिजाज** या प्रांतांत रहाणाऱ्या **इस्माइली** लोकांचा मूळपुरुष **अदनान**. त्याचा पुत्र

**माआद**. याच **माआदा**च्या वंशांत **कुरेश** उपनांवाचा **फिर** ह्मणून इ० सनाच्या तिसऱ्या शतकांत पुरुष झाला. धर्मशास्त्रसंहिता कथन करणाऱ्या **पैगंबरा**चा हाच **फिर** नांवाचा मूळपुरुष होय. भजनालयाचें स्वामित्व व त्यामुळें लोकांकडून मिळत असलेले मानपान या दोन्ही गोष्टींचा उपभोग **बनी खुझआ** नांवाच्या कुळांतील लोक दोन शतकेंपर्यंत एकसारखे घेत आले. पुढें **कोसी** ह्मणून जो **कुरेश** कुळांत एक पुरुष झाला त्यानें **बनी खुझआ** कुळांतील सर्व लोकांना **मक्का**पुरींतून काढून देऊन राज्यकारभार व धर्मसांप्रदाय यांचीं सूत्रें आपल्या हस्तगत करून घेतलीं; व **हिजाझ** प्रांताचा आपण सत्ताधीश बनून राहिला. **कोसी** यानें **होलिल** याच्या एका कन्येबरोबर विवाह केला होता. हा काळ ह्मटला ह्मणजे इ० सनांतील पांचव्या शतकाच्या मध्यंतरींचा काळ असावा. **कोसी** यानें **मक्का**पुरीच्या कारभाराची शिस्तवार व्यवस्था लावावी ह्मणून कामाची सुरवात केली. आजपर्यंत **कुरेश** कुळांतील निरनिराळीं कुटुंबें एकमेकांपासून दूर अशीं पुरीच्या निरनिराळ्या भागीं **काआबा** भजनालयापासून दूर अंतरावर रहात होतीं. **कुरेश** कुळांतील लोकांची अशी दृढ समजूत असे कीं, हें भजनालय ह्मणजे अत्यंत पवित्रभूमि आहे ह्मणून त्यांनीं भजनालयाच्या आसपासहि आपलीं घरें बांधलीं नव्हतीं. भजनालयास व त्यांतील पवित्र पाषाणास धोका होण्याची फार भीति असल्यामुळें **कोसी** यानें **कुरेश** लोकांची

मनधरणी करून त्यांस असें सांगितलें कीं, तुह्मीं सर्व जणांनीं भजनालयाचे समीपभागीं जागा घेऊन वस्ती करावी. तेथें ही वस्ती करण्यास जागा देतांना भजनालयाचे सभोंवार सहज रीतीनें प्रदक्षिणा घालतां यावी इतकी जागा राखून ठेविली होती. ज्या कुटुंबांनीं या स्थळीं वस्ती केली, त्यांनीं आपलीं घरें चिरेबंदी करून गढीसारखीं मजबूत बांधिलीं होतीं.

आपल्या स्वतःच्या राहण्याकरितां **कोसी** यानें एक मंदिर बांधिलें, त्याच्या एका दरवाजाचें तोंड भजनालयाच्या सभामंडपाला लागून होतें. या मंदिराला **दारून नद्वा** असें ह्मणत. या मंदिरांतच सार्वजनिक कामाचा विचार होऊन त्याची व्यवस्था लागत असे. या मंदिरांत **कोसी**च्या वंशांतील लोकांस जाण्यायेण्याची मनाई नसे, परंतु इतर लोकांपैकीं ज्यांचें वय चाळीस वर्षांचें झालें नव्हतें, अशांस जाण्याची मनाई असे. दिवाणी फौजदारी अदालतीचीं कामें या ठिकाणीं होत असत. **कुरेश** लोक शत्रूबरोबर लढाई करण्यास जेव्हां निघत, तेव्हां त्यांचा झेंडा **कोसी**च्या मुलांच्या हातून **कुरेश** जातीच्या मुख्य सरदारांस या मंदिरांतच दिला जाई. हा झेंडा देण्याच्या समारंभास **अकदुल लिवा** असें ह्मणत, आणि हा समारंभ **कोसी**पासून तों अरबी पादशाईचा शेवट होईपावेतों चालला होता. अशीच दुसरी एक व्यवस्था **कोसी**नें काढली होती. ती सुद्धां बरेच काळपर्यंत चालत आली.

दरसाल **मक्केस** जे गरीब यात्रेकरू येत असत त्यांस अन्न-दान करण्याची फार आवश्यकता आहे असें **कुरेश** लोकांस सांगून तसेंच पाहुणचारापासून पुष्कळ पुण्यप्राप्ती घडते, असा बोध करून **रिफेदा** या नांवाची एक सालोसाल लोकांवर पट्टी बसविली. या उत्पन्नांतून **कोसी** हा **मिना** या नांवाच्या सणाच्या दिवशीं व सणाचे दुसरे दोन दिवसपर्यंत ह्मणजे यात्रेकरू **मिना** येथें राहीपर्यंत गरीबांस अन्न पुरवीत असे. **इस्लामा**ची स्थापना झाल्यानंतर सुद्धां ही वहिवाट चालू राहिली. **मिना** येथें यात्रेच्या वेळीं दरसालीं **खलिफ** व त्यांच्या मागून त्यांच्या गादीचे मालक जे जे **सुलतान** ह्मणून झाले ते जें गरीबांस अन्नदान देत असत त्याचें तरी मूळ वर सांगितलेल्या वहिवाटीवरूनच निघालें. **कोसी** हा सर्व मंत्र्यांस पाचारण करून, सर्व राष्ट्राची ह्मणून जी सभा भरवीत होता, व त्यांत अध्यक्ष ह्मणून जो अधिकार चालवीत होता त्या अधिकारास **नद्वा** असें ह्मणत. तसेंच कित्येकांस सैन्यावरचा अधिकार देऊन त्या अधिकाराचें दर्शक ह्मणून त्या लोकांच्या हातीं राष्ट्राचा झेंडा तो देई. ह्या त्याच्या अधिकारास **लिवा** ह्मणत. यात्रेकरूंस अन्न पुरविण्यासाठीं तो लोकांपासून जे कर घेई, त्या त्याच्या अधिकारास **रिफेदा** ह्मणून ह्मणत. **मक्का** शहर व त्याच्या आसपासच्या भागांतल्या विहिरींतून जो पाण्याचा पुरवठा होत असे त्याची व्यवस्था **कोसी**कडे होती. **काआबा**

मंदिराच्या किल्ल्या **कोसी**च्याच ताब्यांत होत्या; तसेंच त्या मंदिरांतील देवतांच्या पूजेची व्यवस्थाहि **कोसी**कडे होती. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें देशांतील राष्ट्रीय, व्यावहारिक, आणि धर्मसंबंधी सर्व अधिकार **कोसी** याजकडे असत. तो राजा असून न्यायाधीश व धर्माध्यक्ष होता. **कुरेश** ह्मणून जे लोक होते त्यांच्यांत तर तो मुख्य असा गणला जात असे. त्याची सत्ता राजकीय सत्तेसारखी असल्यामुळें **कुरेश** लोकांचा मोठा गौरव होत गेला, व **इस्माइला**च्या वंशामध्यें **कुरेश** लोकांचें मोठें महत्व वाढत गेलें. **कोसी** हा वयोवृद्ध होऊन इ. स. ४८० च्या सुमारास मरण पावला.

जीवंतपणींच **कोसी** यानें असें सांगून ठेविलें होतें कीं, मी मरण पावल्यानंतर माझे सर्व अधिकार माझा वडील मुलगा **अबदुदर** याजकडे रहावे; आणि त्याप्रमाणें **कोसी** मरण पावल्यानंतर त्याच्या बापाचे सर्व अधिकार कांहीं गडबड न होतां, मुलाकडे आले. **अबदुदर** याचा अंत झाल्यावर त्याच्या नातवंडाचा व **अब्दमुनाफ** जो त्याचा भाऊ त्याच्या मुलांचा मोठा तंटा माजला. कित्येक कुळें व त्यांचे अनुयायी असे मिळून एका पक्षास झाले. तसेंच दुसरीं कुळें, व त्यांचे अनुयायी हे दुसऱ्या पक्षास मिळाले. असो, पुढें कांहीं काळ लोटल्यानंतर या उभय पक्षांचा समेट झाला. या समेटामुळें असें झालें कीं, विहिरीचें पाणी पुरविण्याचें काम, व गरीब यात्रेकरूंस अन्न पुरविण्यासाठीं जे लोकांपासून कर

घेतले जात त्यांचें काम **अब्दमुनाफ** याचा मुलगा जो **अबदुसशमस** याच्याकडे आलें; व **काआबा** मंदिराच्या किल्लच्या व देवतांचें पूजाअर्चन, तसेंच लष्करी अमलदारांस राष्ट्राचा झेंडा देण्याचें काम व मंत्री लोकांची सभा भरवून राष्ट्रीय सभेचे अध्यक्षस्थानीं विराजमान होण्याचा अधिकार **अबदु-दर**च्या वंशांतील लोकांकडे राहिला. **अबदुसशमस** हा गरीब होता. त्याच्याकडे जीं जीं कामें सोंपिलीं होतीं तीं तीं सर्व त्यानें आपला भाऊ जो **हाशीम** याच्या स्वाधीन केलीं. **कुरेश** लोकांत **हाशीम** हा संपत्तीनें व मानानें मोठा माणूस गणला जात असे. **कोसी** यानें **कुरेश** लोकांवर यात्रेकरूंस अन्नदान करण्या-साठीं जो कर बसविला होता त्याची उग्राणी करण्याचें काम **हाशीम** याजकडे होतें. **मक्केस** यात्रा ज्या वेळीं भरत असे त्या प्रसंगीं यात्रेकरूंस जें अन्न दिलें जाई त्याचा खर्च वर सांगितलेल्या कराच्या उत्पन्नांतून व **हाशीमा**च्या स्वतःच्या द्रव्यांतून होत असे. **मक्कें**तील बहुतेक इतर लोकांप्रमाणें **हाशीम** हा व्यापारांत गुंतला होता. **कुरेश**लोक हिंवाळ्यांत **यमन**कडे एक तांडा पाठवीत असत तसाच **सूर्या** प्रांताकडे ग्रीष्म ऋतूंत दुसरा एक तांडा पाठवीत असत, ही रीत **हाशीम** यानेंच घालून दिली. तो **सूर्या** प्रांतांत व्यापाराचा तांडा घेऊन गेला असतां **गाझा** शहरीं इ. स. ५१० च्या सुमारास मरण पावला. **सल्म** या नांवाची जी त्याची बायको होती, तिच्या पोटीं **शैबा** नांवाचा एकुलता एक मुलगा **हाशीमास**

झाला होता. कराची उग्राणी करणें, व पाण्याची व्यवस्था लावणें हीं दोन कामें, **मुत्तलिब** या नांवाचा **हाशीमा**चा जो धाकटा भाऊ होता, त्याच्याकडे **हाशीमा**च्या मरणानंतर आलीं. **मुत्तलिब** याचा स्वदेशबंधूंमध्यें मोठा मान होता, व त्याच्या औदार्यामुळें व त्याच्या मोठेपणामुळें सर्व लोक त्याला **अलफैझ** ह्मणजे महान् उदार असें ह्मणत असत. **मुत्तलिब** यानें **शैबा** ह्मणून जो त्याचा पुतण्या होता त्यास **यस्रबाहून मक्केस** आणिलें. **मुत्तलिब** याचा **शैबा** हा गुलाम असावा अशी चुकीची समज होऊन **मक्के**करांनीं त्यास **अबदुल मुत्तलिब** असें नांव दिलें. **पैगंबरा**चा आजा **अबदुल मुत्तलिब** ह्मणजे **मुत्तलिबा**चा गुलाम या नांवानेंच इतिहासांत प्रसिद्ध आहे.

**मुत्तलिब** हा **यमन** प्रांतांतील **कझवन** गांवीं इ. स. ५२० च्या सुमारास मरण पावला. **मक्कें**तील सर्व प्रकारचे कारभार व अधिकार, **मुत्तलिबा**नंतर त्याचा पुतण्या जो **अबदुल मुत्तलिब** याजकडे आले. **अबदुल मुत्तलिब** यानें **झमझम** या नांवाच्या पवित्र विहिरीचा शोध लावल्यावर आणि **झमझम** कूपाची देखरेख कोणीं करावी या वादाचा निर्णय झाल्यावर, **मक्के**च्या राज्यकारभाराची व्यवस्था दहा सभासदांच्या हातीं ठेविली होती.

या दहा सभासदांस शेरीफ अशी संज्ञा होती. **मक्के**च्या संस्थानांत या दहा लोकांचा सन्मान प्रथम होत

असे, व त्यांचे निरनिराळे अधिकार या दहा जणांच्या कुटुंबांतून जे कोणी वडील गणले जात त्यांस वंशपरंपरेनें मिळत. जे निरनिराळे अधिकार असत ह्मणून वर ह्मटलें आहे ते येणेंप्रमाणेंः—

( १ ) **हिजबा**—ह्मणजे **काआबा** मंदिराच्या दरवाजाच्या किल्ल्या जपून ठेवण्याचा अधिकार, हा मोठ्या महत्वाचा होता.

( २ ) **सिकेय**—ह्मणजे **झमझम** विहिरीची, व यात्रेकरू लोकांना जो त्या विहिरींतून पाण्याचा पुरवठा होई त्याची देखरेख ठेवण्याचा अधिकार.

( ३ ) **दीयत**—दिवाणी व फौजदारी काम चालविण्याचा अधिकार.

( ४ ) **सिफारथ**—ह्मणजे वकिलात—ज्या माणसाकडे हा अधिकार असे, तो संस्थानाचा वकील ह्मणून **कुरेश** व **अरबस्थानां**तील इतर लोकांच्या टोळ्या यांच्यामध्यें लढा पडला असल्यास त्याचा वादविवाद करून तो त्याचा निकाल लावी.

( ५ ) **लिवा**—ह्मणजे संस्थानाचा झेंडा सांभाळून ठेवण्याचें काम. हा झेंडा घेऊन परराज्यावर स्वारी करीत. ज्या मनुष्याकडे या झेंड्याचें रक्षण करण्याचें काम असे, त्याच्या कडे संस्थानाच्या सैन्याधिपतीचा अधिकार असे.

( ६ ) **रिफेदा**— गरीब लोकांस मदत करण्यासाठीं जो

एक कर बसविला होता, त्याची व्यवस्था लावण्याचें काम. लोकांपासून धर्मादाय करण्यासाठीं हा पैसा घेतला जात असे, व त्याचा विनियोग गरीब यात्रेकरू लोकांस अन्न देण्याकडे होत असे. यात्रेकरू लोक एतद्देशीय असोत, अथवा परदेशीय असोत, त्यांस अन्न दिलें जात असे. हे यात्रेकरू लोक देवाच्या घरीं आलेले अतिथी आहेत अशी लोकांची समजूत असे.

( ७ ) **नद्वा**–ह्मणजे राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षपणाचें काम. हें काम ज्याच्यांकडे असे, तो मनुष्य संस्थानाचा मुख्य सल्लाकार असे, आणि त्याच्या अभिप्रायाप्रमाणें संस्थानाचीं सर्व कामें होत.

( ८ ) **खैमे**–सल्लाकार लोकांच्या दिवाणखान्याचा संरक्षक. हें काम ज्याकडे असे त्याच्याकडे राष्ट्रीयसभा भरविण्याचें काम असे. तसेंच सैन्यास तयार होण्याचा हुकूम करण्याचें काम याकडे असे.

( ९ ) **खजीना**–किंवा सार्वजनिक पैशाची व्यवस्था करण्याचें काम.

( १० ) **एझलाम**–दैविक बाणांची जपणूक करण्याचें काम. या दैविक बाणांवरून देव व देवता यांची इच्छा काय आहे हें समजत असे. अशी एक पूर्वापार चाल चालत आली होती कीं, कुटुंबांत जो कोणी वडील असे त्याच्याकडे संस्थानाचीं जीं मुख्य व महत्वाचीं कामें असत तीं

ठेविलीं जात. या वडील लोकांना **रैस** अथवा **सय्यद** असें ह्मणत. अधिकारांची जरी याप्रमाणें वांटणी झाली होती, तथापि **अबदुल मुत्तलिब** याच्या उत्तम चालचलणुकीमुळें व सर्व लोकांत त्याचें वजन फार मोठें असल्यामुळें सर्व अधिकाऱ्यांपेक्षां त्यास फार मोठा मान मिळत असे. मला दहा मुलगे झाले तर मी आपला एक मुलगा तुह्मांस बळी देईन असा नवस या पुरातन पुरुषानें केला होता. या पुरुषास दहा मुलगे झाले. **काआबा** मंदिरांतील देवतांस केलेला नवस पूर्ण करण्यासाठीं **अबदुल्ला** जो त्याचा अति प्रिय पुत्र त्याला बळी देण्यास तो घेऊन गेला, परंतु ईश्वरी संकेत निराळाच होता. देवळांतील पुजाऱ्यानें देवाचा शकुन ह्मणून असें सांगितलें कीं पुत्राला बळी न देतां, १०० उंटांचा बळी दे ह्मणजे झालें. असा शकुन झाला ह्मणून **अबदुल्ला** याचा प्राण वांचला.

**वाहब** ह्मणून जो **झोरी** कुळांत मुख्य मनुष्य असा गणला होता त्याच्या कन्येबरोबर **अबदुल्ला** याचा विवाह झाला. या लग्नानंतरच्या दुसरे वर्षीं ज्या गोष्टी घडून आल्या त्या ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. **यमन** प्रांताचा **अब्राहा** या नांवाचा जो **हबसानी** सुभेदार होता, त्यानें **सना**गांवीं एक मंदिर बांधलें, आणि मक्केस जें **काआबा** मंदिर असे त्याच्या पवित्रतेबद्दलची फार प्रसिद्धि

असल्यानें तिकडे द्रव्याचा जो ओघ जाई तो तिकडे न जाऊं देतां **सना**गांवीं स्थापिलेल्या देवळाकडे यावा हाच हें मंदिर बांधण्याचा या सुभेदाराचा उद्देश होता. **मक्के**करांनीं या नूतन मंदिरास बाटविलें. ही गोष्ट मनावर धरून त्यानें **मक्के**वर प्रबळ सैन्यानिशीं स्वारी करून **काआबा** मंदिराचा नाश करण्याचें योजिलें. स्वारी करण्याचे समयीं आपण स्वतः सजवलेल्या हत्तीवर बसून स्वारीचा पुढारी झाला. ह्या विस्तीर्ण सैन्यांतील राजवाहन ह्मणजे हत्ती हा प्रचंड प्राणी मोठ्या थाटानें चाललेला आहे हें पाहून **अरबी** लोक फारच आश्चर्यभरित झाले, आणि तेव्हांपासून त्यांनीं आपल्या शकास हस्ती शक असें नांव दिलें. ( इ. स. ५७० )

**हबसानी** सैन्य जवळ आलेंसें पाहून **कुरेश** लोक आपल्या पोरांबाळांसह जवळच्या डोंगरांत निघून गेले, व **काआबा** मंदिरांतील देवता आपल्या घरादारांचें संरक्षण करतील अशी आशा धरून सैन्याचें पुढें काय होतें हें पहात बसले. सुप्रभात-समयीं **हबसानी** सैन्य **मक्के**जवळ येऊन थडकलें, त्या वेळीं सर्व आकाशभर पाकोळीसारखे लहान लहान पक्षी दिसूं लागले, व त्यांनीं लहान लहान दगड सैन्यावर टाकिले. हे दगड सैनिकांच्या चिलखतांतून शिरून सैन्याचा विध्वंस झाला. याच वेळीं आकाशांतून पाण्याच्या मोठ्या धारा कोसळूं लागल्या, व त्या मोठ्या जलवृष्टीनें मेलेल्या सैनिकांस समुद्रांत वाहून नेलें.

**अब्राहा** जखमी होऊन **सना**गांवीं पळून गेला; आणि तेथें पोंचल्यावर लवकरच मरण पावला. याच वर्षी देवीची सांथ प्रथमतःच **अरबस्थानां**त उद्भवली. हा वर सांगितलेला चमत्कार घडून आल्यावर लागलीच थोड्या दिवसांनीं **अब-दुल्ला** हा **यस्रब**कडे प्रवास करीत असतां मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय सगळें २५ वर्षांचें होतें. **अबदुल्ला**च्या शोका-कुल झालेल्या बायकोस थोड्या दिवसांनींच एक पुत्ररत्न झालें. त्याचें नांव **महमद** असें ठेविलें गेलें. हस्ती शकाच्या पहिल्या वर्षी **रबी** महिन्याच्या पहिल्या तारखेस ह्मणजे **हबसानी** सैन्याचा पराभव ज्या दिवशीं झाला त्यानंतर ५० वे दिवशीं ह्मणजे ता० २९ माहे आगस्ट सन ५७० इसवी रोजीं **महमदा**चा जन्म झाला. जन्मसमयीं अद्भुत चमत्कार घडून आले त्यांवरून स्पष्ट दिसून आलें कीं राष्ट्रांचा उद्धारक या जगतीवर आला आहे.

**महमद** बाल्यावस्थेंत असतां **अरबी** लोकांच्या चालीला अनुसरून त्याचा सांभाळ **बनीसाआद** टोळींतील एका **बदवी** स्त्रीकडे सोंपिला होता, आणि तिनें चालीप्रमाणें ह्या बाल-काची कांहीं दिवस जपणूक केल्यावर त्यास त्याच्या आईच्या स्वाधीन केलें. नंतर त्याची आई **अमीना** हिनें त्याची जपणूक केली. पुढें थोड्याच काळानें ती मरण पावली. अशीं त्याचीं दोन्हीं मातापितरें मरण पावल्यामुळें **महमद** पोरका व निराश्रित झाला; व पुढें त्याची सर्व प्रकारची

व्यवस्था लावणें व त्यास लहानाचा मोठा करणें त्याच्या आजाच्या अंगावर येऊन पडलें. **अबदुल मुत्तलिब** जोंपर्यंत जीवंत होता तोंपर्यंत त्यानें त्याची जपणूक केली; परंतु **महमदा**ची आई **अमीना** मरण पावल्या-वर **अबदुल मुत्तलिब** हाहि फार दिवस जगला नाहीं. इतरांनीं किती जरी काळजी घेतली तरी आईबापांच्या काळ-जीची बरोबरी होणार नाहीं. जन्म होण्याच्या पूर्वींच कांहीं दिवस बिचाऱ्याचा बाप वारला. सहा वर्षांच्या उमरीचा झाला नाहीं तोंच त्याची आईहि गमावली आणि त्याची ही हानी झाल्यामुळें त्याच्या कोंवळ्या मनाला जन्मपर्यंतचा फारच मोठा धक्का बसला. असो; पुढें तीनचार वर्षांनीं त्याचा आजाहि मरण पावला. **सना**गांवाहून **अबदुलमुत्त-लिब** हा परत येतांना इ. स. ५७९ च्या सुमारास रस्त्यांतच मरण पावला.

**अबदुल मुत्तलिब** याच्या मरणानें या निराश्रित बाल-काच्या संबंधानें कांहीं ध्यानांत ठेवण्यासारख्या गोष्टी घडून आल्या. जेव्हां हा वृद्ध पितामह मरण पावला त्या वेळीं त्यानें **अबूतालिब** जो त्याचा दुसरा मुलगा होता त्याच्या स्वाधीन या बालकाला केलें; आणि **महमदा**चे लहा-नपणचे दिवस **अबूतालिब** याच्या देखरेखेखालीं गेले. या साध्याभोळ्या कुटुंबामध्यें या बालकाची कालक्रमणा कशी होत असेल याची आपणांस चांगली कल्पना करितां

येईल. पुढें जो कर्तव्याचा मुख्य भाग आपणास उचलावयाचा आहे तिकडे त्याचें चित्त लागल्यामुळें त्याची दृष्टि खोल गेलेली असून चर्येवर उत्साह व आस्था दिसत असत. हा प्रिय बालक कधीं गरज लागली तर घरांतलें काम करी, नाहींतर वनांतील वनशोभा पहात पहात जंगलांतील काम करी. बालकाचा स्वभाव प्रेमळ व शांत असे. मानवप्राण्यास दुःख झालेलें पाहून त्याच्या कोंवळ्या अंतःकरणांत फार पीडा होत असे. त्याच्या अंतःकरणाला पापाचा विटाळ आजपर्यंत लागला नव्हता. या प्रिय बालकावरतीं त्याच्या चुलत्याचें अत्यंत प्रेम जडलें होतें, तसेंच कुटुंबांतील इतर माणसांचेंहि होतें.

लहानपणीं त्याला कष्ट करावे लागत. पुष्कळ प्रसंगीं त्याला उंटांचा कळप घेऊन त्यांस पाणी पाजण्यासाठीं ह्मणून जंगलांत जावें लागत असे. या घराण्यांतील माणसांच्या ह्मणजे **हाशीम** व **अबदुल मुत्तलिब** यांच्या औदार्यामुळें घरांतील द्रव्यसंचय फारच कमी झाला होता, व ह्मणूनच चार लोकांत जें पूर्वी यांचें वजन असे तें आतां पुष्कळ कमी झालें होतें. अनाथ यात्रेकरूंस जें अन्न पुरविण्याचें काम तें आतां त्यांच्यानें होईना; ह्मणून तें काम आतां **उमैया**च्या कुटुंबाकडे सोंपावें लागलें. या घराण्यांतील लोकांनीं **अबदुल मुत्तलिब** याच्या घराण्यांतील माणसांचें फारच वैर करावें.

**महमद** हा वयानें अगदीं लहान असतांना **ओखद**

येथें मोठें युद्ध झालें. हें युद्ध बरेच काळपर्यंत चालून यात मनुष्यहानी फारच झाली. **कुरेश** आणि **बनी किनाना** या दोन टोळ्या एके बाजूस व **बनी हवाझीन** ही टोळी दुसरे बाजूस या दोन पक्षांत हें युद्ध माजलें होतें. **ओखद**च्या एका बाजूस **तायफ** गांव आहे व दुसरे बाजूस **नखला** गांव आहे. या दोन गांवांच्या दरम्यानचें हें गांव असून तें **मक्के**पासून तीन मजलांवर आहे. या स्थळीं दरवर्षास **झुलकाद**च्या पवित्र महिन्यांत एक फार मोठी यात्रा भरत असे, आणि या वेळीं लढाई करण्याची किंवा क्रोधानें मानवदेहाचा रक्तपात करण्याची मनाई असे. **मर-हुझ झुरेन**च्या जवळ **मजना** ह्मणून जें गांव आहे त्या ठिकाणीं दुसरी एक यात्रा वर्षाचेवर्षास भरत असे. **मक्के**पासून **मजना** हें फार अंतरावर नाहीं. तिसरी वार्षिक यात्रा **अरफात** टेक-डीच्या पायथ्याशीं **झुलमझझ** या गांवीं भरत असे. या तिन्ही यात्रांत **ओखद** येथील यात्रा फार महत्वाची, व **अरबस्थानां**तील सर्व लोकांची अशी राष्ट्रीययात्रा असे. यात्रेच्या पवित्र मासांत सर्व प्रकारचें वैर करण्याची बंदी असल्यामुळें **अरबस्थाना**च्या सर्व भागांतून आणि फार दूर-दूरच्या देशांतून व्यापाराचे जिन्नस येथें येत असत. **धन्य अरबस्थान, हिजाज** व **नज्द** या सुप्रसिद्ध ठिकाणांहून व्यापारी लोक व्यापार करण्यास येत. वनांतरींच्या वीर कवींचा मेळा या यात्रेस जमत असे. आपण रचलेल्या कविता राष्ट्रांतील शिष्ट-

जनांस दाखवून त्यांच्याकडून मोठेपणा मिळविण्यासाठीं ते या यात्रेस येत. या ठिकाणीं वीररसानें परिपूर्ण भरलेलीं अशीं काव्यें वाचलीं जात, व नानालंकारयुक्त असे गद्यरचनेचे लेखहि वाचले जात असत. जीं जीं वाखाणण्यासारखीं काव्यें असत तीं तीं सोनेरी अक्षरांनीं लिहून पुढच्या पिढीनें पाहून त्यांचे गुणानुवाद करावे ह्मणून **काआबा** मंदिराच्या सभामंडपांत टांगून ठेवीत. यात्रा भरली ह्मणजे **ओखद** हा गांव विलास व आनंद यांनीं भरून जाई. या आनंदाच्या भरांत थोडें विषवल्लीचेंहि मिश्रण होतें; कलावंतिणींनीं तंबू तंबूंनीं नाचत जावें; व जंगलांतून आलेल्या वीरांचीं मनें आपल्याकडे ओढून घ्यावीं. वेश्यांचा मोठाच मेळा त्या स्थळीं जमे; दारूचे पिठे, व तेथें दारू पिऊन धुंद झालेल्या लोकांचे कज्जे व खून; जुगार खेळण्याच्या जागा; व **मकेकरांनीं** रात्रीच्यारात्री जुवा खेळण्यांत घालविणें; कवन करणाऱ्यांचे सामने, व त्यांची एकमेकांला लागून बोलण्याची तऱ्हा हे सर्व प्रकार पाहून **अमिनाच्या** अनाथ मुलाच्या मनावर सहसा न लोपणारा ठसा उमटला.

या पवित्र महिन्यांत कोणीं कोणाचें वैर करूं नये असा नियम असतां एकदां तेथें जमलेल्या लोकांत मोठी भाऊबंदकी माजली. त्यामुळें वर सांगितलेल्या उभय पक्षांत चकामक झाली. पहिली एक चकामक झाल्यावर, कांहीं काळपर्यंत युद्ध बंद पडलें होतें, त्या अवधींत, **महमद** आपल्या पालन करणाऱ्या चुलत्याबरोबर **सूर्याप्रांतांत** व्यापाराच्या

उद्देशानें गेला होता. त्या सफरींत लोकांची निकृष्टावस्था याच्या पाहण्यांत आली, व धर्माची उतरती कळा त्याच्या नजरेस आली. या दोन्ही गोष्टींचें स्मरण त्याला जन्मभर राहिलें. याप्रमाणें जगांतील अनेक गोष्टींचें अवलोकन करीत करीत, हा **पैगंबर** लहानाचा मोठा झाला. ह्या मुलाची विद्या ह्मटली ह्मणजे **अरबस्थानां**तील पुराण-प्रसिद्ध कथांचें ज्ञान करून घेणें एवढीच होती. जिला सांप्रत काळीं विद्या ह्मणून ह्मणतात तशा प्रकारची विद्या त्यास नव्हती. जरी त्याची तेथील जनसमूहावर अत्यंत प्रीति असे तथापि त्याचा विचार व आचार लोकांहून फार भिन्न अस-ल्यामुळें तो त्या लोकांतलाच नव्हता, असें ह्मटलें असतां चालेल. लोकसमूह अत्यंत दुरावस्थेनें ग्रासून गेल्यामुळें ह्या अशक्त व दुर्बळ लोकांची धांव कोणीकडे चालली आहे, हें पाहण्याकडेच त्याचें चित्त गुंतून जात असे. **मक्केकरां**ची बेबंद-शाई, **ओखद** येथील यात्रेस जाणाऱ्या मंडळीमध्यें विना-कारण व एकाएकीं होणारे खून, **कुरेश** लोकांचा नास्तिकवाद, त्यांचें दुराचारी वर्तन, या गोष्टी पाहून तरुण **पैगंबराच्या** अंतःकरणांत चालू असलेल्या स्थितीचा अत्यंत तिटकारा उत्पन्न होई.

उंच कुळांतील व त्याच्या गोतांतील एका श्रीमान् विधवा बाईच्या नोकरीस **महमद** राहिला होता. तो आपल्या २५ व्या वर्षीं व्यापाराच्या उद्देशानें तिचा मुनीम

ह्मणून **सूर्याप्रांतां**त गेला. तिकडे त्यानें मोठ्या चातुर्यानें काम बजाविलें. त्यामुळें त्या बाईची मर्जी त्यानें संपादन केली, व कांहीं दिवसांनीं त्या बाईचें मनहि त्याजवर बसलें. पुढें थोडक्याच दिवसांनीं त्या दोघांचें लग्नहि झालें. लग्नाचा समारंभ मोठ्या थाटाचा झाला. त्यामुळें सर्व लोकांना मोठा आनंद झाला. ह्या पृथ्वीतलावर जीं दहा पांच सुखी जोडपीं सांपडतील त्यांपैकींच हें एक दंपत्य होतें. **महमदा**पेक्षां वयानें **खदीजाबाई** जरी बरीच वडील होती, तथापि या नवराबायकोंचें परस्परांवर अत्यंत प्रेम होतें. **महमदा**नें जें अत्यंत मोठें कर्तव्य करण्याचें योजिलें होतें त्याची सिद्धता करण्यास त्याला विश्रांतीची फारच अवश्यकता होती. ती विश्रांती त्याला ह्या लग्नानें प्राप्त झाली. आपल्या उपजीविके-साठीं जे त्याला नित्यशः श्रम करावे लागत ते करण्याची त्याला आतां अवश्यकता राहिली नाहीं. त्याच्या उपदेशावर ह्या बाईचाच प्रथम विश्वास बसला; आणि त्यामुळें पुढें ज्या वेळीं त्याचा स्वतःचा विश्वास त्याच्या कामाच्या संबंधानें नाहींसा झाला होता, व इतर माणसांचा तर मुळींच नव्हता, आणि सर्व जगभर तर त्याला काळोखी दिसत होती, अशा प्रसंगीं त्यां प्रेमळ बाईचा त्यावरचा विश्वास तसाच राहिला, इतकेंच नव्हे, परंतु आपल्या हातून आतां कांहीं कार्य होत नाहीं असें वाटून त्याला जेव्हां उद्विग्नता कधीं कधीं येत असे तेव्हां त्या बाईच्या मनांतील दृढ विश्वासामुळें त्याच्या अंतः-

करणांतील मावळत्या ज्योतीस तैलबिंदू मिळून ती ज्योत वाढती झाली. असें हें स्त्रीरत्न त्यास ह्या विवाहामुळेंच प्राप्त झालें. ही बाई त्याला नेहमीं समाधानाच्या गोष्टी सांगून निराशेनें उद्विग्न झालेल्या त्याच्या मनाचें शांतवन करी. **खदीजाबाईचें** आचरण कित्ता घेण्यासारखें होतें. **महमदाचे** अनुयायी लोक, **खदीजाबाई** व त्याची सर्वांत कनिष्ठ कन्या **फातमाबाई**, ह्मणजे जिला "कांतिपूर्णा" ह्मणतात, या दोन स्त्रियांस फारच मान देतात.

**महमद** यास **खदीजे**पासून तीन मुलगे व चार मुली झाल्या. मुलगे लहान असतांच मरण पावले. **महमद** फार कोंवळ्या मनाचा होता व त्याचा जीव मुलांमध्यें फार गुंतून गेला होता. ह्मणून मुलग्यांचे मरणानें त्याला अत्यंत शोक झाला. त्याला **कुरेश** टोळींतील लोक **अले-बतेर** ह्मणजे निर्वंश असें ह्मणत.

**महमदा**च्या लग्नानंतरचीं जीं १९ वर्षें गेलीं तीं सर्व त्यानें अंतर्ध्यानस्थ रहाण्यांत व परमात्म्याच्या समागमांत लोटलीं. कारणपरत्वेंच लोकसमाजांत तो जाई. **अबदुलमुत्तलिब** याच्या मरणापासून **मक्का** शहरांतील अधिकार हा एकाकडे न राहतां दहापांच माणसांत वांटला गेला होता. निरनिराळे जे अधिकारी होते, त्यांतील प्रत्येक जणाकडे कांहींनाकांहीं तरी काम असे. यामुळें लोकांच्या देहाचें अगर वित्ताचें संरक्षण ज्यांच्याकडून होईल अशी एकहि मंडळी त्या वेळीं

**मक्केंत** नव्हती. ज्या लोकांचा आप्तवर्ग असे त्यांचा कांहीं तरी बचाव होई, परंतु ज्या बिचाऱ्यांस गणगोत नसे अशा परकीय लोकांचा बचाव होणें फार मुष्किलीचें झालें होतें. दुष्ट लोक परकीय लोकांचें भांडेंकुंडेंच हिसकावून घेऊन तृप्त रहात नसत, तर त्यांच्या बायका आणि पोरीहि हिरावून घेत. **अबदुलजुदेआन** या नांवाचा **कुरेश** कुळांतील एक गृहस्थ **मक्का** एथें होता. त्याच्या आश्रयानें कोणी **अबुटटे महान** या नांवाचा त्या काळचा एक प्रसिद्ध कवि **मक्केस** येऊन राहिला होता. या कवीला **मक्का** शहरांत भररस्त्यांत लुटलें. हा प्रकार पाहून **महमद** पैगंबर यानें अशी सूचना केली कीं **हाशिम, मुत्तलिब, झौरा** व **तैम** या चौघांच्या वंशजांनीं कट करून असा बेत करावा कीं, कोणताहि मनुष्य **मक्केकर** अथवा परकीय स्वतंत्र अथवा गुलाम यांपैकीं कोणाहि मनुष्यास **मक्केंतील** कोणत्याहि भागांत कोणीं दुःख अगर त्रास दिला किंवा त्याचा कोणीं अपमान केला तर ज्यानें तसें केलें असेल त्यास शिक्षा द्यावी; व त्यानें केलेलें नुकसान भरून घ्यावें व ज्याचें नुकसान झालेलें असेल त्याची भरपायी करावी. **पैगंबराची** ही सूचना त्या लोकांस मान्य होऊन त्यांनीं सूचनेप्रमाणें कट केला. या कटाचें नांव **हिलफुलफुझुल** अथवा **फुझुल** लोकांची टोळी. पूर्वीं **फजलफाझल, मुफाझल,** व **फजेल** अशी चौघांजणांची **फुझुल** नांवाची **बनीयुराम** जातींतल्या लोकांची टोळी होती. त्या

टोळीचा उद्देशहि असाच होता. त्याची आठवण रहावी ह्मणून या टोळीस **फुझुल** नांव दिलें होतें. तिची स्थापना इ. स. ५९९ त **महमदा**चा विवाह झाल्यानंतर लवकरच झाली. तो त्या मंडळींत मुख्य होता. **फुझुल** मंडळीच्या साह्यानें दुर्बळ व त्रस्त लोकांस पुष्कळ आधार झाला; आणि दुष्ट लोकांपासून जो त्रास होत होता त्याचें चांगलेंच निरसन झालें. ज्या सालीं ही मंडळी स्थापिली गेली त्या सालीं तर मंडळीचें नांव घेतलें कीं, दुष्ट लोकांस दरारा पडे, आणि दुष्ट कृत्य करण्यास त्यांची छातीच होईना. **इस्लाम** सुरू झाल्यापासून ५० वर्षेंपर्यंत ही मंडळी टिकून राहिली होती; आणि तिच्यापासून लोकांचें कल्याणहि झालें. **हिळफुलफुझुल** मंडळी उदयास येऊन बरींच वर्षें लोटल्यावर आणि ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकाच्या प्रारंभीं **हिबारिस**चा मुलगा **उस्मान** यानें **हिजाज** प्रांतास **रोमी** लोकांच्या मुलुखांत सामील करण्याचा प्रयत्न चालविला होता. असा हा उद्योग चालविण्याचें कारण **बायझेंशियम** येथील बादशाहाकडून **उस्मान** यास द्रव्यप्राप्ति झाली होती. हा प्रयत्न निरर्थक झाला. आणि ही गोष्ट **महमदाच्याच** साह्यानें झाली. **उस्मान** यास **सूर्याप्रांतां**त पळून जावें लागलें. तेथें त्याला **अमूर** नांवाच्या **घासंडी** राजानें विष पाजून मारून टाकिलें.

**महमदा**च्या ३९ वे वर्षीं ह्मणजे इ. स. ६०९ या सालीं **कुरेश**

लोकांनीं **काआबा** मंदिराचा जीर्णोद्धार करण्याची सुरवात केली. मंदिराचा जीर्णोद्धार करण्याचे कामीं अनेक टोळ्या, अनेक जाती व अनेक कुटुंबांतील माणसें यांची कुमक होती. या कुमक करणाऱ्या माणसांमध्यें कांहीं कामाच्या संबंधानें एक तंटा उपस्थित झाला; आणि **महमदानें** मध्यस्थी करून जर हा तंटा मिटविला नसता तर तो विकोपास जाऊन मोठा रक्तपात झाला असता, परंतु **महमद** मध्यें पडला ह्मणून सर्वांचा समेट झाला व काम सुरळीतपणें चालू झालें.

कलहाचें कारण असें झालें कीं **काआबा** पाषाण ठेवण्या-साठीं नूतन मंदिरांत एक जागा तयार केली होती. **कुरेश** लोकांच्या चार टोळ्यांपैकीं कोणत्या टोळीनें हा पाषाण त्या जागेंत ठेवावा याबद्दल वाद सुरू झाला. प्रत्येक टोळी-वाले ह्मणत हा हक्क आमचाच आहे. या वादामुळें मंदिराचें काम चार पांच दिवस तहकूब पडलें. शेवटीं जमलेल्या लोकांत सर्वांहून वृद्ध असा एक गृहस्थ उठून बोलला कीं, माझी एक सर्वांस सूचना आहे, ती तुह्मांस पसंत पडली तर त्याप्रमाणें तुह्मी करा. ती सल्ला अशी कीं, मंदिराच्या आंगणांत जो कोणी प्रथमतः उत्तरेच्या दरवाजानें येईल त्याच्या हातून आपण या गोष्टीचा निर्णय करून घ्यावा ह्मणजे या कलहाचें मूळ नाहींसें होईल. ही सल्ला सर्व **कुरेश** मंडळीस पसंत पडली. इतक्यांत **महमद** त्याच दरवाजानें मंदिराच्या आंगणांत आला; तेव्हां त्याच्यावरच सर्वांनीं ही निर्णय करण्याची गोष्ट सोंपिली.

त्यानें सोंपिलेलें काम स्वीकारून असें केलें कीं आपल्या अंगावरील पांघरण्याचें वस्त्र काढून तें त्यानें जमिनीवर पसरलें. त्यावर तो पाषाण ठेविला, नंतर चाऱ्ही जातींतले मुख्य मुख्य असे चौघे गृहस्थ निवडून काढिले. त्या चौघांस पसरलेल्या वस्त्राचे चार कोंपरे हातीं धरावयास सांगितलें. नंतर आपण पुढें होऊन आपल्या हातांनीं तो पाषाण योग्य स्थळीं ठेविला. यामुळें सर्वांची समजूत झाली; व वादाचें मूळ नाहींसें झालें.

या दोन तीन गोष्टी खेरीज करून **महमदा**विषयीं या १९ वर्षांतील फारशी माहिती नाहीं. त्याचा सौम्य व प्रेमळ स्वभाव, त्याचें तपाचरण, त्याचें पवित्र वर्तन, त्याचें अत्युत्तम सौजन्य, निराश्रितांस व दुर्बलांस साह्य देण्याविषयीं त्याची सदोदितची तत्परता, त्याची थोरवी, त्याचा प्रामाणिकपणा, कर्तव्याविषयीं त्याचा उल्हास या व दुसऱ्या त्याच्या अनेक गुणांनीं त्याच्या देशबांधवांनीं **अलअमीन** ( प्रामाणिक ) असें उपपद त्यास दिलें. **अबूतालिब** यानें आपल्यावर केलेल्या उपकारांची फेड करावी ह्मणून **महमद** यानें या सुमारास **तालिब** याच्या मुलाच्या विद्याभ्यासाची सोय करण्याचा पत्कर घेतला. आपल्या कुटुंबाची पूर्वीपासून चालत आलेली थोरवी न घालविण्याविषयीं **अबूतालिब**चा प्रयत्न असल्यामुळें त्याला द्रव्याची या वेळीं बरीच अडचण पडूं लागली होती. **खदीजा**-बाईबरोबर लग्न झाल्यामुळें **महमद** हा **मक्केकरांत** मोठा

श्रीमान् झाला होता तसाच **अबूतालिब** याचा भाऊ **अबास** हाहि मोठा श्रीमान् असे. या दोघांच्या दौलतीएवढी दौलत **मक्केकर** लोकांत कोणाजवळ नसे. एकदां सर्व **अरबस्थान**भर मोठा दुष्काळ पडला होता, तेव्हां **महमदानें अबूतालिब** याचा मुलगा **अली** यास दत्तक घेतलें. **अबूतालिब** याचा दुसरा मुलगा **जाफर** यास दत्तक घेण्याविषयीं **अबास** याचें मन **महमदानें** वळविलें, आणि **अबास** यानें **जाफर** यास दत्तक घेतलें. तिसरा मुलगा **अकिल** हा आपला बाप **अबू-तालिब** याच्या जवळच राहिला. **महमदाचे** सर्व मुलगे ते लहान असतांच मरण पावले होते; त्यामुळें **अलीमध्यें मह-मदाचें** सर्व मन गुंतून जाऊन **अलीला** पाहून त्याला मोठें समाधान वाटे. पुढें कांहीं वर्षें लोटल्यावर **पैगंबराची फातमा** नांवाची कनिष्ठ कन्या इचें लग्न **अलीबरोबर** लावल्यामुळें **महमदाचें अलीवरचें** प्रेम व **अलीची महमदावरची** भक्ति अढळ झाली. या सुमारास **मक्केकर** लोकांस दयाधर्माचा एक उत्तम कित्ता **महमदानें** घालून दिला, आणि त्यामुळें **मक्केकरांच्या** मनावर **महमदाविषयीं** फारच उत्तम ग्रह होऊन, त्याजविषयीं त्यांची पूज्यबुद्धि वाढली. ही दयाधर्माची गोष्ट अशी कीं, **हरिस** नांवाच्या एका अरबी मनुष्याचा **झेद** नामें एक मुलगा होता; त्याला एका शत्रूच्या टोळीनें गुलाम करून **मक्केस** आणिलें व **खदीजाबाईच्या** एका जवळच्या नातेवाईकास विकलें. त्यानें माझी तुला ही भेट आहे, असें ह्मणून **झेद** यास **खदीजा-**

बाईच्या स्वाधीन केलें. मला या मुलाची देणगी दे असें ह्मणून **खदीजाबाई**जवळून **महमद** यानें **झेद** यास घेतलें; आणि लागलीच त्याला दासपणांतून मुक्त केलें. या प्रेमळ कृत्यानें **झेद**च्या अंतःकरणांत **महमदा**विषयीं अत्यंत प्रीति उपजली; ती इतकी कीं **झेद**चा बाप त्याला चल, आपण आपल्या घरीं जाऊं असें ह्मणत असतां **झेद** यानें ती गोष्ट नाकारिली; आणि तो **महमदा**जवळ तसाच राहिला. ह्या पंधरा वर्षांत **महमदानें** आपल्या मोठ्या कामाची तयारी केली; तशीच तें काम करण्याची त्याची योग्यता आहे किंवा नाहीं याची परीक्षाहि झाली. या काळांत त्याजवर संकटें पुष्कळ आलीं व दयाधर्माचीं कामेंहि त्याच्या हातून पुष्कळ घडलीं.

---

**टीप.**—या अध्यायाची चांगली समजूत पडण्यासाठीं **महमदा**चा कुलवृक्ष येथें लिहितों.



## अध्याय दुसरा.

**अरबस्थाना**कडे अवलोकन केलें असतां असें दिसून येईल कीं देशभर भाऊबंदकी माजलेली आहे, निरनिराळ्या जातींचे परस्परांशीं तंटे सुरू झालेले आहेत. लोक तर रानटी दशेंत बुडून गेले आहेत, दुष्टाचार व खोटे विचार चोहोंकडे माजलेले आहेत, बेबंदशाई माजलेली असून क्रौर्याच्या कृत्यांनीं माणसांची स्थिति जनावरांच्या स्थितीसारखी झालेली आहे. याप्रमाणें देशाची स्थिति झालेली होती. **सूर्याप्रांतांत महमदानें** ज्या पूर्वीं सफरी केल्या त्यांत त्याला दिसून आलें कीं, लोकांची कौटुंबिक, नैतिक व धार्मिक स्थिती फारच अवनत दशेस आलेली आहे. देशांत जे निरनिराळ्या पंथांचे लोक होते त्यांच्यांत तर वितंडवादाचे कलह होऊन ते लोक एकमेकांचे गळे कापण्यास तयार झालेले होते, आणि हा प्रकार सर्व देशभर व गांवोगांवीं झालेला होता. अशा या कंटक व नैराशिक स्थितींत कोठें पुनरुज्जीवनाचा बिंदू **पैगंबराच्या** दृष्टीस पडेना. हें खरें आहे कीं, धर्मसंबंधानें कांहीं लोकांचीं मनें उद्विग्न झालेलीं होतीं; परंतु उद्विग्नतेशिवाय त्यांच्या विचारांत घेण्यासारखें कांहीं नव्हतें, हें पाहून **पैगंबर** कासाविस होऊन गेला. उत्पत्ति, स्थिति, लय, सुख, दुःख ह्मणजे काय, व हीं या जगांत कशीं उपजतात व कशीं नष्ट होतात याचा विचार करण्यांत तो गढून गेला होता. त्याचा पोंच फार दूरवर गेल्यामुळें जगांत अत्यंत

अव्यवस्था पसरली होती, तिची व्यवस्था कशी लावावी या विचारांत त्याचें चित्त गर्क होऊन गेलें होतें. अशा प्रसंगीं त्याच्या अंतःकरणांत ईश्वरवाणी झाली. लग्न झाल्या दिवसापासून त्याची अशी चाल होती कीं, कधीं कुटुंबांतील माणसें घेऊन व कधीं तर एकटेंच **हीरा** नांवाच्या पर्वतावर एक गुहा असे तेथें ध्यान, प्रार्थना व मनन करण्यास जावें. **हीरा** पर्वताची सांप्रत "प्रकाशाचा पर्वत" ह्मणून प्रसिद्धि आहे. हा डोंगर ह्मणजे निर्जन, निर्वृक्ष, निर्जल असा होता. त्यांत दोन तीन दऱ्या होत्या. त्यांत सूर्य-किरणें पडलीं ह्मणजे असा त्याचा असह्य प्रकाश व तेज पडे कीं, दरीकडे पाहिलें कीं, डोळे अगदीं दिपून जात. एकांत स्थळीं जाऊन राहण्याची **पैगंबराला** तर अत्यंत हौस होती. या दरीमध्यें विचारांत गर्क होऊन रात्रीच्यारात्रीं तसेंच पडून राहून दृष्टीस अगोचर परंतु विश्व व्यापून जो उरलेला परमेश्वर त्याचें चिंतन करीत त्यानें आपला काळ लोटावा. असें होतां होतां शेवटीं नियमित घडी आली, व **महमदास** ईश्वराचें दर्शन झालें व त्याची आज्ञा काय आहे याचा उलगडा त्याला झाला. परमेश्वरानें ज्या कामाची नेमणूक मजसाठीं करून ठेविली आहे त्याची पूर्णता करण्यास डोंगर, नद्या, वृक्षवल्ली इत्यादिक मला जणूं काय पाचारण करीत आहेत असें त्याला वाटूं लागलें. पुढें जो दिव्य प्रकाश त्याच्या हृदयांतरीं उत्पन्न झाला, व ज्यामुळें जगाचा उद्धार

झाला त्याचीं हे दृष्टांत व मनतरंग पूर्वचिन्हें होतीं. महात्म्यांस मानव प्राण्यांचा उद्धार करण्यास समर्थ असा प्रकाश अंधारमय जगांतूनच मिळतो. एकादे दिवशीं अरुणोदयाचे वेळीं शीतळसा वायु मंदगतीनें वहात असतां, " तुला परमेश्वरानें निवडलें आहे, तुला परमेश्वरानें आपला **पैगंबर** केलें आहे, " अशी वाणी झालेली त्याच्या कानीं ऐकूं यावी अन्य प्रसंगीं "जा तुला आज्ञा झाली आहे कीं, परमेश्वराच्या नांवाचा डंका ( जयघोष ) सर्व पृथ्वीभर कर, " अशी वाणी होत आहे असा त्याला भास व्हावा. सत्याचा धनी जो परमेश्वर तो आपणच आपले पैगंबर निवडून घेतो. मेघगर्जनेपेक्षांहि उच्च स्वरानें आपली वाणी त्यांस कळवितो; साधारण माणसाच्या कानीं सुद्धां ही वाणी येऊं शकते. जर इहलौकिक सुखास आपण भुललों नसलों तर ही वाणी स्पष्टपणें ऐकूं येते, नाहीं तर तिचा सर्व प्रकारें लोप होतो. एके रात्रीं पृथ्वीतलावर सर्वत्र शांतता पसरली असतां, आणि पृथ्वीवरील सर्व वस्तूंची दृष्टी परमेश्वराकडे लागली असतां, **पैगंबरास** उद्देशून आकाशवाणी झाली. आणि त्या वाणीनें तृषाक्रांत **पैगंबरा**च्या आत्म्यास शांती मिळाली. ध्यानस्थ असतां सागरांतील लाटांप्रमाणें गर्जना करणाऱ्या वाणीचा शब्द **पैगंबरानें** ऐकिला. दोनदां अशी जबरदस्त गर्जना झाली, आणि दोनदां **पैगंबरानें** तिच्याकडे दुर्लक्ष केलें, परंतु **पैगंबरास** ही वाणी कोणाची आहे या विवंचनेंत कांहीं सुचे-

नासें झालें, इतक्यांत " डंका कर " अशी तिसऱ्यानें वाणी झाली. आणि **महमदानें** वाणीस विचारलें " कशाचा डंका करूं ? " " देवाच्या नांवाचा डंका कर " असें त्यास प्रत्युत्तर मिळालें. या आकाशवाणीनें विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय यांविषयीं **महमदास** ज्ञान सांगितलें. परमेश्वरासंबंधी जें मानवास ज्ञान आहे तेवढ्यावरूनच मानवाची मोठी योग्यता समजावयाची, व परमेश्वरानें जर आपणा स्वतः-विषयीं मनुष्यास लेखनकलेच्या द्वारें कळविलें नसतें तर मानव प्राण्यास परमेश्वराचें ज्ञान झालें नसतें. इत्यादि गोष्टी निवेदन करून ती आकाशवाणी स्तब्ध झाली, आणि **महमदास** ध्यानानें आलेली मूर्च्छा नाहींशी झाली.

शुद्धीवर आल्यावर **महमद** याला मोठा कंप सुटला, आणि तो तत्क्षणींच आपली बायको **खदीजा** इच्याकडे जाण्यास घरीं निघाला. घरीं पोंचल्यावर बायकोस हाक मारून ह्मणाला " अगे **खदीजे**, माझी ही अवस्था कां झाली ? " असें ह्मणून तो जमिनीवर मूर्च्छा येऊन पडला. ती त्याच्या जवळ त्याला काय झालें, ह्मणून पहात बसली. कांहीं वेळानें मूर्च्छा गेल्यावर, **महमद** उठून बसला व ह्मणाला " प्रिये, विश्वास न बसण्यासारखी गोष्ट घडून आली आहे; आणि ती ही कीं मी **पैगंबर** झालों आहें, नाहीं तर भ्रमिष्ठ तरी झालों आहें. तिनें उत्तर दिलें कीं "अरे **कासीमा**च्या बापा, परमेश्वर माझा त्राता आहे, तो अशी कधींहि गोष्ट घडून

आणणार नाहीं. कारण तूं सत्यवचनी, अपकाराबद्दल उपकार करणारा, परमेश्वराचे ठायीं भाव ठेवणारा, सदाचारी, आप्त व मित्र यांवर प्रेम करणारा, वितंडवाद न करणारा, असा आहेस, तुला झालें तरी काय ? तुला कांहीं भयचिन्ह दृष्टीस पडलें काय ?" **पैगंबरानें** होय ह्मणून इत्थंभूत झालेलें वर्तमान तिला निवेदन केलें. सर्व कथा श्रवण करून ती **महमदास** ह्मणाली "हे प्रिय प्राणपति, आनंद कर; आणि खिन्नता सोडून दे, मी परमेश्वराची साक्ष ठेवून सांगतें कीं ह्या लोकांचा तूं **पैगंबर** होशील." असें ह्मणून ती तशीच उठून **वराक**नामा कोणी वृद्ध व अंध तिचा आप्त होता, त्याकडे गेली. ह्या माणसाला यहूदी व ख्रिस्ती शास्त्रांची माहिती होती. त्यास तिनें हें सर्व वर्तमान सांगितलें. हें ऐकून तो म्हणाला, "**कुदुस** ! **कुदुस**"! पवित्र! पवित्र ! **मूसा**कडे जो देवाचा निरोप आला होता तोच हा "**नमुसि अकबर** ( ईश्वरी निरोप ) **महमदा**कडे आला आहे; तो आपल्या लोकांचा **पैगंबर** होईल, जा ही गोष्ट अशी आहे, असें त्याला जाऊन सांग; व असेंहि त्याला ह्मण कीं धीर धर."

पुढें कांहीं काळ लोटल्यावर जेव्हां एके दिवशीं मार्गांत त्या वृद्ध माणसाची व **पैगंबरा**ची भेट झाली तेव्हां तो **पैगंबरास** ह्मणाला "ज्याच्या हातांत या **वराका**च्या आयुष्याची दोरी आहे असा जो परमेश्वर त्याची शपथ घेऊन मी सांगतों कीं, बाबा, त्या परमेश्वरानें तुला या लोकांसाठीं

**पैगंबर** नेमिलें आहे; ह्मणजे तुला निवडून काढलें आहे. बा, ईश्वरी निरोप जो " **नमुसि अकबर** " तो तुजकडे आला आहे. लोक तुला लबाड ह्मणतील व ते तुझा छळ करतील, ते तुला देशाबाहेर हांकलून देतील, ते तुजवर स्वाऱ्या करून येतील; त्या दिवसांचें वैभव माझ्या दृष्टीस पडावें अशी माझ्या जीवाची पुष्कळ ओढ आहे, व तुझ्याकरितां त्यांच्याशीं युद्ध करावें असें माझ्या जीवाला पुष्कळ वाटतें. " असे शब्द बोलून त्यानें **पैगंबरा**च्या कपाळाचें चुंबन घेतलें. या संबोधक शब्दांनीं **पैगंबरा**च्या त्रस्त आत्म्यास समाधान झालें व धीर आला; व ईश्वराची वाणी पुन्हा होईल अशी आशा धरून तो कांहीं काळ वाट पहात बसला.

परमेश्वराच्या मनांत माझ्या हातून कोणतें कार्य करावयाचें आहे याचा नीटपणें उलगडा त्याला लागला नव्हता ह्मणून त्याच्या जीवाची फार तळमळ झाली होती; आणि त्या तळमळींत देहभान जाऊन तो एकदां आत्महत्या करण्याच्या बेतांत होता; परंतु त्याची अशी तळमळ झालेली पाहून मानव जातीचें कल्याण त्याच्या हातून कोणतें व्हावयाचें होतें याची दिशा देवदूतानें त्याला दाखवून दिली. देवदूत त्याला ह्मणाला, विश्वास व धीर धर, ह्मणजे योग्य काळीं, पृथ्वीवरील सर्व राष्ट्रें ईश्वराच्या खऱ्या मार्गांत येऊन मिळतील. हा दयेचा आशीर्वाद मिळाल्यावर देहानें थकून गेलेला, व मनानें दमून गेलेला **पैगंबर** घाई करून

अरण्यांतून घरीं गेला, आणि आपल्या प्रिय पत्नीच्या गळ्यास मिठी मारून ह्मणूं लागला, मला ह्या सर्वसाक्षी परमेश्वराच्या दृष्टीपासून दूर करून टाक.

आपल्या लोकांस मूर्तिपूजेपासून सोडविण्यांत त्याचें आयुष्य गेलें. या कामांत त्याजवर अनेक संकटें आलीं, त्यांतून त्याला आपली सुटका करून घेणें भाग पडलें. तो ध्यानस्थ झाला असतां व त्याच्या मनाची तळमळ झाली असतां त्याला आकाशवाणीनें जागृत केलें, व तूं अशा अशा गोष्टी कर असें त्याला कळविलें. "अरे ! वस्त्रानें आपणास लपवून घेणाऱ्या माणसा, ऊठ व लोकांस सावध कर; व देवाच्या नांवाचा गौरव कर." अशी वाणी त्यानें ऐकिली आणि ज्या कार्याकरितां त्याची नेमणूक झाली होती तें काम करण्यासाठीं त्यानें कंबर बांधिली. त्या काळापासून त्याचें सर्व आयुष्य मानवकल्याणाकडे लागलें. भयंकर रीतीचा छळ व सर्व प्रकारचा अपमान होत असतां त्यानें लोकांना उपदेश करण्याचें कार्य व त्यांची सुधारणा करण्याचें काम एकसारखें निर्धास्तपणें चालविलें.

**खदीजाबाई** ही त्याची पहिली शिष्य होती. त्याला देवाकडून आदेश आला आहे असा तिनेंच विश्वास प्रथमतः धरिला. पूर्वापार चालत आलेल्या मूर्तिपूजेचा त्याग प्रथमतः तिनेंच केला. पवित्र अंतःकरणानें दयामय परमेश्वराची प्रार्थना करण्यांत तीच त्याजला येऊन प्रथमतः सामील झाली.

एवढेंच तिच्या हातून कार्य झालें नाहीं, तर पुढें जीं त्याजवर संकटें आलीं व जो अनेक प्रकारें त्याचा छळ झाला त्या सर्व प्रसंगीं, त्याचें समाधान करण्यांत ती तत्पर राहिली. ती त्याला धीर देऊन त्याचें दुःखाचें ओझें कमी करी. ती त्याची वारंवार समजूत करी व ह्मणे, "मनुष्याच्या बडबडीनें तूं आपला धीर खचूं देऊं नको. मी तर तुजवर पूर्णपणें विश्वास धरून आहें ना ? मग तूं लोकांच्या व्यर्थ बडबडीकडे कां लक्ष देतोस ?"

**महमदाशीं** ज्यांचा अगदीं निकट संबंध असे अशा मित्रांसच त्यानें प्रथमतः आपले विचार प्रगट केले, व त्यांचीं मनें मूर्तिपूजेपासून दूर वळविण्याचा यत्न केला. **खदीजा-बाई**नंतर दुसरा शिष्य ह्मटला ह्मणजे **अली** हा होय. आपल्या कुटुंबांतील माणसें व **अली** या सर्वांसह **महमद** वारंवार **मक्के**च्या आसपासच्या डोंगरांतून जाई. तेथें जाऊन देवानें जे आपल्यावर अनेक उपकार केले आहेत त्यांबद्दल देवाची आठवण करून त्याची मनोभावानें प्रार्थना करी. एके प्रसंगीं **महमद** आपल्या शिष्यमंडळीसह परमेश्वराची प्रार्थना करण्यांत गुंतला असतां **अली**चा बाप **अबूतालिब** एकाएकीं तेथें येऊन उभा राहिला आणि तो **महमदा**स बोलला. अरे माझ्या भावाच्या मुला, हा तूं कोणता रे नवीन धर्म काढिला आहेस ? **पैगंबर** येणेंप्रमाणें उत्तर देता झाला. " हा धर्म देवाचा आहे; त्याच्या दूतांचा

हाच धर्म आहे. त्याच्या **पैगंबरांचा** हाच धर्म व आपला जो पूर्वज **इब्राहीम** त्याचाहि पण हाच धर्म होता. परमेश्वराच्या सेवकांस हा मार्ग लावून द्यावा, या हेतूनें मला परमेश्वरानें पाठविलें आहे, आणि हे माझ्या काका, या सत्याचा स्वीकार करावा अशी तुझी योग्यता आहे, ह्मणून या सत्याचा अंगीकार करण्यास मी तुला सांगावें; हें उचित आहे. तसेंच तूंहि पण त्याचा अंगीकार करावा, व त्याचा प्रसार करण्याचे कामीं तूं मला साह्य द्यावें, हें तुला उचित आहे." तो वृद्ध **अबूतालिब** उत्तर देतो कीं "बाळा, माझ्यानें आपल्या पूर्वजांचा धर्म सोडवत नाहीं; परंतु मी सर्वशक्तिमान परमेश्वराच्या नांवानें अशी प्रतिज्ञा करितों कीं, माझ्या देहांत जीव जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत तुझ्या केंसास कोणालाहि धक्का लावूं देणार नाहीं." असें बोलून तो **अलीकडे** वळला व त्याला विचारूं लागला कीं, "बा पुत्रा! तूं कोणत्या धर्मानें वागतोस?" **अलीनें** उत्तर दिलें कीं "माझा भाव परमेश्वरावर आहे; व त्याचा जो **पैगंबर** याजवर आहे, व **पैगंबर** जेथें जातो तेथें मी त्याच्या मागें जातों." वृद्ध **अबूतालिब** ह्मणाला, "जें वाईट आहे तें तूं कर; असें तो तुला कधींहि सांगणार नाहीं. तेव्हां तूं त्याला चिकटून राहिलास तर माझ्याकडून तुला तिलप्राय हरकत होणार नाहीं." पुढें थोड्या दिवसांनंतर **झेद** हाहि **महमदाचा** धर्म अंगीकारिता झाला. दासपणांतून मुक्तता

मिळाल्यावरहि **झेद महमदास** चिकटून राहिला होता, असें मागेंच सांगण्यांत आलें आहे. त्याच्या मागून **अबूकुहेफा**चा मुलगा **अबदल्ला** यानेंहि या नव्या धर्माचा स्वीकार केला. **कुरेश** कुळांत जीं ठळक कुटुंबें होतीं त्यांपैकीं हा होता. पुढें इतिहासांतरीं **अबूबकर** या नांवानें जो प्रसिद्ध पुरुष झाला तो हाच होय. याचें उपनांव **तयम इब्न मुरा.** हा फार श्रीमान् व्यापारी असून शांत व दृढविचाराचा होता. तथापि याच्या आंगीं मोठी उमेद, शहाणपण, प्रामाणिकपणा हे गुण असून सर्वांस आवडतें करून घेण्याचा त्याच्या आंगीं गुण होता. त्याच्या बरोबरीच्या लोकांत त्याचा मोठा मान व प्रतिष्ठा असे. ह्याचें वय **पैगंबराहून** दोन वर्षांनीं कमी होतें, आणि त्यानें एकनिश्चयानें **पैगंबराच्या** नव्या धर्माचा स्वीकार केल्यामुळें लोकांत मोठा गवगवा झाला. ह्या धर्माचा स्वीकार करण्याच्या संबंधानें चार सरदारांनीं त्याचें अनुकरण केलें. यांपैकीं **उम्मैय** कुळांतील **अफान** नांवाच्या गृहस्थाचा **उस्मान** ह्मणून जो पुत्र होता तो एक. हाच **उस्मान** पुढें तिसरा **खलिफ** झाला. दुसरा **अबदुर रहमान बिन औफ**; तिसरा **साआद बिन अबिबकस**; ह्यानेंच पुढें **इराण** देश काबीज केला. चौथा **झोबरे बिन अवाम** हा **खदीजा**बाईचा आप्त होता. हे सर्वजण **पैगंबरा**कडे आले व त्याच्या हस्तें **इस्लामा**ची दीक्षा घेते झाले. गरीब लोकांतूनहि पुष्कळांनीं **इस्लामी**

धर्माचा अंगीकार केला. हजरत **पैगंबरा**च्या चरित्रांत ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, त्याचे जवळचे आप्त हे त्याच्या पंथांचा अंगीकार करिते झाले. जर **पैगंबरा**च्या वर्तनांत निष्पापपणा नसता, त्याचा विश्वास बळकट नसता, त्याचें वर्तन अनुकरणीय नसतें तर त्याचा चुलतभाऊ, त्याची बायको व त्याचे निकटचे आप्त व मित्र हे त्याचे अनुयायी झाले नसते. हा ह्या इष्टमित्रांचा **पैगंबरा**-वरील भाव पाहिला असतां, मनाची पक्की खात्री होते कीं **महमदा**नें जें आपणाकडे काम सोंपवून घेतलें होतें तिकडे त्यानें तन, मन आणि धन हीं सर्वस्वीं अर्पण केलीं होतीं. आपण होऊन नेमून घेतलेल्या कार्यांत जर **पैगंबर** इतका दक्ष नसता अथवा जर त्याच्या मनाचा निश्चय डळमळीत असता, तर ज्या लोकांच्या पाहण्यांत त्याचें दररोजचें आचरण येत असे, ते लोक तरी त्याचें शिष्यत्व पतकरते ना. या गोष्टीविषयीं तर संशय धरण्यास जागा नाहीं.

याप्रमाणें त्यानें सतत तीन वर्षेपर्यंत आपल्या लोकांस मूर्तिपूजेपासून दूर करण्याचा प्रयत्न चालविला. इतक्या अवधींत त्याला तीसच लोक मिळाले ही कांहीं आश्चर्य करण्यासारखी गोष्ट नाहीं. कारण पुरातन धर्माचीं मुळें जमिनींत फार खोल गेलीं होतीं. पुरातन धर्मात लोकांस प्रिय अशा गोष्टी पुष्कळ होत्या. नूतन धर्म शुद्ध असल्यामुळें तशा

गोष्टींचा समावेश त्यांत करितां येईना. पुरातन अर्चनाच्या विधींत **कुरेश** लोकांची प्राप्तीची बाब असे, त्यामुळें त्या विधींचा विध्वंस झाला असतां **कुरेश** लोकांची प्राप्ति बुडाली असती. ह्मणून **महमदा**च्या विचाराचा पाडाव जितका होईल तितका करण्यास ते लोक तत्पर असत. शिवाय **कुरेश** लोकांचा पुरातन धर्मावरचा भाव केवळ वरपंगीचा असून नुसती त्यांत प्राप्ति आहे ह्मणून त्याचा बचाव झाला पाहिजे, असें त्याचें मत झालेलें होतें. त्यामुळें अशा लोकांचें मन वळविणें **पैगंबरास** दुरापास्त झालें. इतक्या गोष्टी प्रतिकूळ असतां **महमदास** ह्या काळांत तीसच शिष्य येऊन मिळाले, यांत आश्चर्य मानण्यासारखी गोष्ट नाहीं. इतक्या गोष्टी प्रतिकूळ असतां ह्या महान् उपदेशकाचा धीर कधींहि खचला नाहीं. परमेश्वरावरचा भाव त्याचा ढळला नाहीं. समर्थ परमेश्वरानें आपणास ज्या आज्ञा दिल्या आहेत त्या आपणास पाळल्या पाहिजेत, मग आपणास कोणाचें साह्य असो अगर नसो. आजपर्यंत त्यानें मुकाट्यानें आपला उपदेशाचा क्रम चालविला होता. त्याचे इतर आप्तवर्ग व ज्ञातिबंधु त्याला वेड लागलें आहे असें ह्मणत. पण तो उपदेश करितांना दिसला तर त्याच्या आड कोणी येत नसत. परंतु यापुढें मूर्तिपूजेचा त्याग करण्यासाठीं **कुरेश** लोकांस सुप्रसिद्ध रीतीनें सांगावें ह्मणून त्यानें निश्चय केला, आणि हा उद्देश मनांत धरून त्यानें **सफा** नांवाच्या डोंगरावर एक

जाहीरसभा भरविली, आणि त्या सभेंत त्यानें सांगितलें कीं, मूर्तिपूजा करण्यानें तुह्मी देवाचा मोठा अपमान करितां. कोरींव मूर्ति केल्यानें तुमचे अर्चनांत मूर्खपणा मात्र दिसतो; परमेश्वराची भक्ति होत नाहीं. हें जें परमेश्वराच्या दृष्टींत पापाचरण आहे त्याचा तुह्मीं त्याग करावा हें तुह्मांस उचित आहे. पूर्वीं जे जे उपदेशक झाले व त्यांनीं ज्या ज्या सन्मार्गाच्या गोष्टी सांगितल्या तिकडे त्या त्या काळच्या लोकांनीं लक्ष दिलें नाहीं. ह्मणून त्यांचा कसकसा नाश झाला हें त्यांस सांगून अशुद्ध आचरणाचा त्याग करा, व पवित्र, सत्यशील, व दयाशील धर्माचा अंगीकार करा ह्मणून त्यानें त्यांस आग्रहपूर्वक विनवणी करून सांगितलें. त्याचा ह्मा उपदेश जमलेल्या लोकांस मानवला नाहीं. चेष्टेखोरांनीं त्याची टर उडविली. तरुण **अली**ला पिसें लागलें आहे असें ते बोलले. याप्रमाणें टवाळकी करून ते तेथून निघून गेले, परंतु त्यांच्या मनांत अशी धास्ती उपजली कीं, ह्या विचारांनीं परिणाम नीट लागणार नाहीं. मोठा गहजब आमच्यावर येऊन पडला आहे, असें त्यांस वाटूं लागलें. **कुरेश** लोकांच्या संबंधानें आपले प्रयत्न निष्फळ झालेसें पाहून **मक्के**स जे लोक यात्रेच्या संबंधानें अगर व्यापाराच्या संबंधानें येत असत त्यांस देवाकडून आलेला निरोप सांगावा असा त्यानें विचार करून त्या कार्यास प्रारंभहि केला, परंतु इकडेहि **कुरेश** लोकांनीं त्यास त्रास दिला. **मक्का** शह-

राच्या ज्या ज्या भागांत यात्रेकरू येऊन उतरत त्या त्या भागांत **कुरेश** लोकांनीं आपले दूत पाठवून, त्यांच्या द्वारें यात्रेकरूंस कळविलें कीं **महमद** हा जादुगीर आहे. त्याच्या बोलण्यावर जर तुह्मी भरंवसा ठेवाल तर तुमचा घात होईल. ह्या त्यांच्या कृतीचा परिणाम त्यांसच अनिष्ट झाला. ज्या ज्या लोकांच्या कानीं **महमदाचा** उपदेश गेला, त्या त्या लोकांनीं मग यात्रेकरू ह्मणा अगर व्यापारी ह्मणा आपापल्या मुलखांत अशी बातमी पसरिली कीं, **मक्काशहरांत** एक मोठा **पैगंबर** उपजला आहे. तो **अरबस्थानांतील** सर्व लोकांस सांगतो कीं, पूर्वापार चालत आलेली मूर्तिपूजा टाकून द्या, व दयामय परमेश्वराची भक्ति करा. त्या **पैगंबराच्या** आंगीं मोठा उत्साह आहे, व आपल्या उपदेशामुळें आपल्या जीवावर येऊन बेतली तरी त्याची तो परवा करीत नाहीं.

यदाकदाचित् **कुरेश** लोकांचा असा समज झाला असता कीं, आपण **महमदास** निषेधिलें ह्मणजे त्याचे आप्तवर्ग त्यास सोडून देतील तर हा समज चुकीचा होता हें त्यांस लगेच कळून आलें. कारण **अबूतालिब** यानें त्यांचा चांगलाच निषेध केला. ह्या कुलपतीनें **महमदाचा** धर्म स्वीकारला नाहीं हें मागेंच सांगितलें आहे. तो धर्म जरी त्यास पसंत नव्हता तरी ह्या सुधारकाचा छळ झालेला

त्यास आवडत नसे. त्यानें एक कवन रचून त्यांत **कुरेश** लोकांनीं **महमदा**चा छळ कसा केला त्याचें विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे. पोरकीं मुलें व विधवा यांचा जो आधार, जो अक्षयी भरंवशाचा, जो आपलें वचन सदा पाळणारा व आपला निश्चय न ढळविणारा असा जो **पैगंबर महमद** त्याचा अशा प्रकारें छळ करावा ही मोठी खेदाची गोष्ट झाली आहे. तर **हाशीमा**चीं मुलें व **मुत्तलिब** यांचीं लेंकरें हा जो निरपराधी **पैगंबर** त्याचा बचाव करतील व प्रसंग पडल्यास आपल्या जीवाचा बळी देऊन **पैगंबराच्या** जीवास धक्का पोंचूं देणार नाहींत, अशी प्रतिज्ञा त्यानें या कवनांत करून ठेविली आहे. याच सुमारास **यस्रबा**चा अधिकारी यानेंहि **मक्केकर** व **कुरेश** लोकांस पत्रद्वारें सुचविलें कीं, पूर्वीं घडून आलेल्या गोष्टींकडे लक्ष ठेवा आणि ह्या आपसांतील तंट्यांत पडूं नका. हा जो नूतन उपदेशक भूतळीं आला त्याच्या बोधाकडे लक्ष द्या. एखाद्या सभ्य व मान्य गृहस्थानें जर एखाद्या धर्ममताचा अंगीकार केला तर त्यामुळें त्याचा छळ करणें उचित नाहीं. मनुष्याच्या अंतःकरणाची साक्ष देवच देऊं शकेल, इतरांस त्यांतील विचार समजणार नाहींत. ह्या त्याच्या सुबोधामुळें लोकांच्या विचारांत बराच फरक पडला, आणि **मक्केकर** लोकांनीं विरोध करण्याच्या पद्धतींत बदल केली. **काआबा** मंदिरांत प्रार्थना करण्याची **महमदास** मनाईची ताकीद **कुरेश**

लोकांनीं दिली. जेव्हां **महमद** व त्याचे अनुयायी प्रार्थनादि भक्तींत गुंतले असत तेव्हां त्यांच्या आंगांवर त्यांनीं उकीरड्यावरील घाण टाकावी. गांवांतील टवाळ लोक व मुलें यांस चिथावून देऊन त्यांच्या मागें जाऊन त्यांस त्रास द्या, ह्मणून त्यांची उठावणी करावी. **महमद** ज्या ज्या स्थळीं प्रार्थना व ध्यान करण्यास जाई त्या त्या स्थळीं ह्या दुष्ट लोकांनीं कांटे नेऊन टाकावे. **अबूलहब** ह्मणून जो **महमदा**चा एक चुलता होता त्याची बायको **उम्मीजमील** इनें या सुधारलेल्या खोड्या करण्यांत पुढाकार घ्यावा. ह्या बाईनें **महमद** व त्याची शिष्यमंडळी यांच्या प्रार्थनेच्या ठिकाणीं कांटे टाकवावे. ह्या तिच्या चीड आणणाऱ्या कृत्यानें तिला नरकास सरपण वाहून नेणारी कृत्या असें टोपणनांव मिळालें होतें.

**महमद** जरी या असल्या संकटांत पडला होता तरी त्याचा निश्चय ढळला नाहीं. आपलें काम देवानें नेमून दिलें आहे, तेव्हां त्याचा जयच होईल असा त्याचा बळकट विश्वास असल्यामुळें तो आपल्या उद्योगांत कमतरता पडूं देत नसे. **कुरेश** लोकांनीं पुष्कळ प्रसंगीं त्याच्या जीवावरचे प्रसंग आणिले होते. एका वेळीं, ते त्याला ठार करण्याच्या बेतांत होते. **महमदा**नें आपल्या शांत स्वभावानें तो भयंकर प्रसंग टाळिला. धर्मपंथाचा जितका जितका छळ होतो तितका तितका तो

अभिवृद्धि पावतो ह्या नियमास अनुसरून **महमदाच्या** पंथाचीहि वाढ झाली. **कुरेश** लोकांनीं **महमदावर** जें कडक शस्त्र धरिलें होतें व त्यांनीं जो त्याच्या मताचा द्वेष केला त्यामुळें **हमजा** ह्मणून जो **अबदुलमुत्तलिब** याचा पुत्र होता तो **महमदाचें** शिष्यत्व अंगीकारिता झाला. हा प्रतापसिंह योद्धा, उदार व सत्यवचनी होता. ह्याच्या प्रतापशाली तरवारीपुढें **कुरेश** लोक थरथर कांपत असत. याच सुमारास हा शूर पुत्र **पैगंबराकडे** आला, व त्यापासून त्याच्या धर्माची दीक्षा घेता झाला. तेव्हांपासून तो **इस्लामास** दृढपणें चिकटून राहिला व पुढें त्यानें त्या धर्माकरितां आपला प्राणहि अर्पण केला.

ज्या राष्ट्राची सांगड कुमार्ग व दुर्नीति यांच्या बराबर जडली होती अशा या **अरबी** राष्ट्रास तुह्मी दुर्नीतीचे विचार सोडून द्या असा सदुपदेश करण्याचें कार्य **महमदानें** छळ होत असतांहि बंद पाडलें नाहीं. धर्मोपदेश करण्याचे कामांत त्यानें आपलें तन मन धन अर्पिलें होतें. **सोनू** याच्या लोकांस आपल्या पापाचरणाबद्दल ईश्वराचा क्षोभ कसा सोसावा लागला व जलप्रलय कसा झाला, **अद** व **समूद** या जातींच्या लोकांनीं ईश्वराच्या दूतांच्या सद्बोधाकडे दुर्लक्ष केल्यामुळें त्यांस कोणत्या प्रकारचें शासन भोगावें लागलें, याची आठवण त्यानें झणझणीत शब्दांनीं लोकांस केली. त्यामुळें श्रोतृजनांच्या अंतःकरणांस चटका लागला. आश्चर्यानें

भरलेले असे जे सृष्टिसौंदर्याचे देखावे, भरदोनप्रहरीं पड-लेला चकचकीत सूर्यप्रकाश, बुरख्यानें आपलें तोंड गुंडा-ळून घेणारी रात्र, सूर्यप्रकाशानें प्रकाशित होणारा असा वैभवपूर्ण दिवस, ह्या सर्व चित्रविचित्र गोष्टींचें अवलोकन करा. ह्या सर्वांची शपथ घेऊन मी तुह्मांस सांगतों कीं वर सांगितलेल्या लोकांचा जसा विध्वंस झाला तसा तुमचा विध्वंस न व्हावा ह्मणून सावध व्हा. आणि जर सावध झालां नाहींत तर तुमचा विनाश झाल्यावांचून राहणार नाहीं. ज्या वेळीं न्यायाचा दिवस येईल त्या वेळीं इहलोकीं केलेलीं कृत्यें सनातन न्यायाधीशापुढें तराजूंत घातलीं जातील. ज्यांनीं बालकांस अन्यायानें जीवंतपणीं पुरून टाकिलें आहे, त्या लोकांस तुह्मी कोणत्या अपराधाबद्दल असें शासन त्या बालकांस दिलें अशी विचारणा होईल. अशा प्रसंगीं आकाश व पृथ्वी गुंडाळलीं जातील, व परमेश्वरावांचून साह्य देण्यास अथवा शासन करण्यास जवळपास कोणी राहणार नाहीं. परलोकीं दुष्टाचरणाबद्दल शासन होईल. सदाचरणाचा सुखकर मोबदला मिळेल. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य आगटी पेटवून त्याचा प्रकाश चोहों दिशांस पसरून फांकला ह्मणजे आपलें कार्य करून घेण्याच्या बेतास लागतो व लागलीच ती आगटी विझून जाते, व मग त्या मनुष्यास अंधारांत रहावें लागतें, तशी दुर्दशा अविश्वासी लोकांची होईल. ते बहिरे, मुके, आंधळे होतील; जेव्हां तुफानानें भरलेले काळेभोर ढग आकाशांत

येऊन मेघगर्जना सुरू होतात व विजा चमकूं लागतात तेव्हां आपण मरूं, अशा धास्तीनें गडगडणें कानांत ऐकूं येऊं नये ह्मणून आपल्या कानांवर बोटें ठेवणाऱ्या लोकांसारखे हे अविश्वासी लोक आहेत. परमेश्वरानें ह्या अविश्वासी लोकांच्या भोंवतीं घेर घातला आहे. विजांच्या चमकण्यानें त्यांचे डोळे जातील, विजांचा प्रकाश पडला ह्मणजे ते चालूं लागतील, अंधार झाला ह्मणजे ते थांबतील, परमेश्वराच्या इच्छेस आलें तर त्यांचे कान व डोळेहि जातील. परमेश्वर हा खरोखर परमसमर्थ देव आहे. अविश्वासी लोकांचीं कामें मैदानावरील मृगजलासारखीं आहेत. तृषाक्रांत प्रवाश्यास पाणी आहे असा भास होतो व जेव्हां तो तिकडे जातो तेव्हां तेथें त्याला कांहींएक आढळत नाहीं. ईश्वर तुमच्या सभोंवार आहे, आणि तुह्मांस त्याजला पूर्ण हिशेब दिला पाहिजे; कारण परमेश्वर हा हिशेब घेण्यांत फार तत्पर आहे. अथवा खोल समुद्रावरील काळोखासारखा अविश्वासी मनुष्य आहे. खालीं पहावें तर लाटांवर लाटा, वरतीं ढग, एका काळोखीवर दुसरी काळोखी. मनुष्य आपला हात पुढें करितो, तो त्याला दिसत नाहीं, ज्याला परमेश्वर उजेड देत नाहीं, त्याला उजेड मिळत नाहीं. अशा प्रकारें तो लोकांस उपदेश करी. त्यामुळें लोक आश्चर्यभरित झाले, व शिष्यसंख्या वाढत चालली. **कुरेश** लोक आतां अगदीं घाबरून गेले, **महमदा**च्या उपदेशानें जबरदस्त धर्मक्रांति होणार अशी त्यांस धास्ती पडली. आपलें महत्व व आपली

प्रतिष्ठा आतां लयास जाणार असें त्यांस वाटूं लागलें. ज्या मूर्तींची निगा आमच्याकडे आहे त्यांचाच विनाश व्हावा ह्मणून **महमद** लोकांस सांगतो. जे अर्चनविधी आमच्या हातून व्हावयाचे ते अर्चनविधी करणें पाप आहे असें तो लोकांस शिकवितो, पुरातन कालापासून चालत आलेल्या गोष्टी जशाच्या तशाच राहिल्या तरच आमची उपजीविका चालेल. **महमद** जें ह्मणतो तें जर घडून येईल तर आजपर्यंत **अरबस्थानां**तील लोकांमध्यें जो आमचा मान व जी आमची मोठी योग्यता आहे ती अर्थातच नाहींशी होणार,. सर्व लोकांचे हक्क सारखे आहेत असें ह्याच्या उपदेशांचें धोरण आहे. याच्या देवाच्या दृष्टींत भेदाभेद मुळींच नाहीं. ह्या भेदाभेदाचा समूळ विध्वंस करणें ह्मणजे आमच्या पुरातन मतास अगदीं विरुद्ध, तेव्हां आह्मांस याच्या मताची जरूर नाहीं. या योगानें आमचे सर्व हक्क नाहींतसे होणार; तर या मतांच्या मुळासच कुऱ्हाड लावून त्यांचा समूळ छेद करणें हेंच उचित आहे. असा त्यांनीं विचार करून तसें करण्याचे उपाय शोधण्याचे कामास ते लागले. त्यांनीं अशी मसलत केली कीं उघडपणें द्वेष कधीं करूं नये. परंतु प्रत्येक कुटुंबांतील लोकांनीं आपल्या कुटुंबांत अथवा आपल्या कुटुंबाच्या आश्रयाखालीं जे लोक असतील त्यांपैकीं जर कोणी या मताचा स्वीकार करील तर त्या मनुष्यास मुकाट्यानें नाहींसें करून टाकावें. **अबूतालिब** व इतर आप्तवर्ग यांचा

आश्रय **महमदास** असल्यामुळें त्याचा बचाव झाला. तसेंच **अबूबकर** व इतर लोक यांस त्यांच्या स्वतःच्या मोठेपणामुळें अगर कोणा बळकट मनुष्याचा आश्रय असल्यामुळें ते त्या काळापुरते तरी वांचले गेले. पण त्यांच्या शिवाय इतर लोकांस फारच यातना झाल्या. त्यांस तुरुंगांत टाकिलें. त्यांची उपासमार करून त्यांस काठ्यांनीं तर बडविलें. **रमधे** टेंकाडावर व **बथे** नांवाच्या ठिकाणी फार क्रूरपणाचीं कृत्यें घडून आलीं. ज्या स्त्रियांनीं व ज्या पुरुषांनीं आपला पूर्वींचा मूर्तिपूजक धर्म सोडून दिला होता, त्यांस रानांतील पोळणाऱ्या वाळवंटावर ऐन दोनप्रहरीं कडक उन्हांत बसवावें व तृषेनें व्याकुळ झाले ह्मणजे त्या लोकांस सांगावें कीं, पुरातन धर्माचा अंगीकार करा अथवा प्राणांस मुका. कांहीं लोकांनीं **इस्लामा**चा त्याग केला. अशा लोकांनीं सुद्धां यातना व जाच यांच्यांतून सुटका झाली ह्मणजे पुन्हा **इस्लामी** पंथ स्वीकारावा; परंतु बहुतेक लोक शेवटपर्यंत टिकून राहिले. यांच्यापैकींच **बिलाल** नांवाचा **इस्लामी** धर्माचा पहिला साक्षी ह्मणून इतिहासांतरीं सुप्रसिद्ध आहे. **उम्मैय** बिन **खलफ** या नांवाचा गृहस्थ **बिलाल**चा धनी होता. या धन्यानें त्यास भरदोनप्रहरीं ऐन उन्हांत रोज रोज **बथे** येथें न्यावें, त्याची पाठ उघडी करावी. तसाच त्याला पूर्वेकडे तोंड करून पश्चिमेकडे पाठ करून उभा करावा. त्याच्या छातीवर मोठा थोरला दगड ठेवावा, व त्या धन्यानें

त्यास ह्मणावें **इस्लामा**चा त्याग कर, अगर जीव जाईपर्यंत असेंच तुला उभें रहावें लागेल. तृषेनें व्याकुळ झाला तरी **बिलाला**च्या तोंडीं "**अहदून अहदून**" असे शब्द निघावे. अहदून ह्मणजे देव एकच आहे. अशा यातना सोशीत त्यानें पुष्कळ दिवस लोटले. शेवटीं मरणोन्मुख झाला. ही त्याची दुर्दशा पाहून **अबूबकरास** दया आली व त्यानें त्याबद्दल खंड देऊन त्यास सोडवून घेतलें. असे सहा गुलाम **अबूबकरानें** पैसे देऊन सोडविले. **यासर** व त्याची बायको **समीया** या दोघां नवराबायकोंचे हाल हाल करून **कुरेश** लोकांनीं त्यांचे प्राण घेतले. त्यांचा मुलगा **अमर** यास त्या दुष्ट लोकांनीं पुष्कळ यातना दिल्या. शिष्यांचे असे हाल ते लोक **महमदा**-च्या डोळ्यांसमोर करीत. ह्या शिष्यांनीं मोठ्या धीरानें व सहनशीलतेनें हे हाल सत्यासाठीं ह्मणून सोसले. **महमदा**चा निश्चय ढळविण्याच्या उद्देशानें **कुरेश** लोकांनीं आपली पराकाष्ठा करून सोडिली. तो एके दिवशीं **काआबा** मंदिरांत बसला असतां त्याच्यापासून जरा पलीकडे धर्मद्वेष्ट्यांचे पुढारी लोक बसले होते. त्यांच्यापैकीं एकजण, **उतबा बिन रबिया** नांवाचा गृहस्थ त्याजकडे आला. **उतबा**चे धर्मसंबंधी विचार फारसे द्वेषबुद्धीचे नव्हते. **उतबा** त्यास ह्मणाला. हे माझ्या भावाच्या पुत्रा, तुझ्या आंगीं पुष्कळ प्रशंसनीय गुण आहेत; व तुझें कुळहि सुप्रसिद्ध आहे. असें असतां तुझ्यामुळें आमच्यांत दुही माजली आहे, व

कुटुंबांतून बेबनाव झाला आहे. आमच्या देवदेवतांस तूं झूट ह्मणतोस व आमच्या पूर्वजांस धर्मभ्रष्ट ह्मणतोस याकरितां आमची एक तुला सूचना आहे. ती तुला पसंत पडली तर फार बरें होईल. तूं जर तिचा विचार करशील तर ती तुला सांगतों. **महमद** ह्मणाला सांग बरें. ती सूचना तूं सांगत असल्यास मी चित्त देऊन श्रवण करितों. **उतबा** ह्मणतो हें जें तूं काम उपस्थित केलें आहेस त्या योगानें तुझ्या मनांतून जर संपत्ति मिळवावयाची असेल तर आमच्यांपैकीं कोणाजवळहि नाहीं इतकें द्रव्य आह्मी तुला जमवून देतों. जर तुला प्रतिष्ठा मिळवावयाची असेल तर तुला आह्मी आमचा नायक करून तुझ्या आज्ञेवांचून कोणतीहि गोष्ट करणार नाहीं. जर तुला राज्य पाहिजे असेल तर तुला आमचा राजा करितों, आणि तुझ्या आंगांत ज्या भुतानें संचार केला आहे तें कांहीं केल्यानें निघत नसेल, तर आह्मी वैद्य बोलावून घेतों व त्यास पुष्कळ द्रव्य देऊन तुझ्यांतलें भूत काढून टाकितों." **उतबाचें** भाषण संपल्यावर **महमद** ह्मणाला, आणखी कांहीं तुला सांगावयाचें आहे काय? **उतबा** ह्मणाला, "माझें बोलणें संपलें, मला आतां कांहीं सांगावयाचें नाहीं." "बरें तर मग आतां मी बोलतों तें ऐक," असें ह्मणून **महमदानें** बोलण्यास सुरवात केली. "परम दयामय परमेश्वराच्या नांवानें मी सांगतों. दयामय परमेश्वराकडून हा आदेश आला आहे. हें अरबी **कुरान** यांतील

ओंव्या स्पष्ट करून सांगितल्या आहेत. ज्यांना हें समजेल त्यांना ज्ञान व्हावें ह्मणून ही किताब देवाकडून आलेली आहे. यांत सुसमाचार असून शासनाविषयीं सांगितलें आहे, परंतु पुष्कळ लोक त्यांत जें सांगितलें आहे त्याकडे लक्ष देत नाहींत, व त्यापासून दूर वळतात, व बोलतात; "तूं जीं मतें अंगीकारावयास आह्मांस बोलावतोस तीं आमच्या अंतःकरणास पटत नाहींत. आमच्या कानांत बधिरपणा आलेला आहे, आणि तुजमध्यें व आह्मांमध्यें पडदा पडलेला आहे. तेव्हां तुला जें उचित दिसत असेल त्याप्रमाणें तूं वाग. आह्मी आपल्या विचाराप्रमाणें वागूं." मी तुह्मांसारखाच एक मनुष्य आहें. मला असा आदेश झालेला आहे कीं तुमचा एकच देव आहे, त्याच्याचकडे तुह्मी वळा, व गत कृत्याबद्दल त्याजवळ क्षमा मागा. जे मूर्तिपूजक लोक देवानें नेमलेल्या धर्माप्रमाणें वागत नाहींत व परलोक आहे असें मानीत नाहींत, त्यांस धिक्कार असो! जे विश्वास ठेवितात, व पुण्याचरण करितात त्यांस अक्षय सुखाचा लाभ होईल." "आपलें भाषण समाप्त करून **पैगंबर उतबास** ह्मणाला, आतां हें तूं श्रवण केलें आहेस. जो तुला उत्तम मार्ग दिसेल त्याचा तूं अंगीकार कर."

आपल्या शिष्यमंडळीवर संकटें येतात व त्यांस यातना भोगाव्या लागतात हें पाहून **महमदाच्या** जीवास अत्यंत कष्ट होत. अशा प्रकारें शिष्यांचा छळ किती दिवस होणार

कोण जाणे, असें पाहून त्यानें त्यांस असें सांगितलें कीं जवळच्या **हबसाण** देशाचा राजा **ख्रिस्त**-भक्त आहे, तर **कुरेश** लोकांच्या मनाचा पालट ईश्वरदयेनें होईपर्यंत या ख्रिस्ती राजाचे राज्यांत जाऊन त्याचा आश्रय धरून रहा. हा राजा सदाचरणी व आदरातिथ्य करणारा आहे. तो अन्य मतांचा द्वेष करीत नाहीं. आपलें शिष्यमंडळ त्याच्या राज्यांत त्याचा आश्रय घेऊन राहिल्यास त्यांचा अपमान व छळ होणार नाहीं अशी **पैगंबरा**ची दृढ समजूत होती. **महमदा**च्या सांगण्याप्रमाणें सुमारें १५ असामी **अरबस्थान** सोडून **हबसाण** देशच्या राजाच्या राज्यांत निघून गेले. **इस्लाम** धर्माची स्थापना झाल्यापासून त्या धर्माच्या लोकांनीं धर्माकरितां केलेलें हें पहिलें पलायन ह्मणून प्रसिद्ध आहे. धर्मस्थापना झाल्यावर पांचवे वर्षीं ह्मणजे इ. स. ६१५ त ही गोष्ट घडली. धर्मछळामुळें देशत्याग करणाऱ्या लोकांची संख्या वाढत वाढत ८३ पुरुष व १८ बायका इतकी वाढली. **कुरेश** लोकांनीं त्यांचा पिच्छा सोडला नाहीं. ते **हबसाणां**त त्यांची पाठ पुरविण्यास गेले. राजाकडे त्यांनीं आपल्या प्रतिनिधींस पाठविलें. आणि हे लोक आमच्या देशांतून पळून आले आहेत, त्यांस आमच्या स्वाधीन केलें पाहिजे, त्यांस देहांत शासन देणें आहे, असा त्यांनीं आपला निरोप राजास कळविला. ह्या लोकांवर असा आरोप आहे कीं, ह्यांनीं पुरातन धर्माचा त्याग केला असून नूतन धर्माचा अंगीकार

केला आहे. ही सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर **नजशी**-राजानें ह्या स्वदेश सोडून आलेल्या लोकांस आपल्या समोर बोलावून आणून तुमचे शत्रु तुह्मांविषयीं मजला जें सांगतात तें खरें आहे काय असें तो त्यांस विचारता झाला. त्यानें त्यांस असेंहि विचारलें कीं, तुह्मीं पुरातन धर्म सोडून दिला व माझ्याहि धर्माचा स्वीकार केला नाहीं. मग तुह्मीं तिसराच पंथ कोठून काढला? हें मजला सांगा. **अबूतालिब**चा मुलगा **जाफर** पुढें होऊन सर्वांच्या वतीनें राजास सांगूं लागला कीं " हे राजा, आह्मी पूर्वीं अज्ञान व रानटीपणाच्या खोल सागरांत बुडून गेलों होतों. आह्मी मूर्तींची अर्चा करीत होतों. आह्मी पापाचरणांत आयुष्यक्रम घालवीत होतों. आह्मीं मृत मांसावर उपजीविका करावी, आणि अभद्र भाषण करावें, मानवधर्म, दयाधर्म, पाहुणचार व शेजारधर्म या सर्वांकडे पाठमोरें होत होतों. बळी तो कान पिळी याशिवाय दुसरा कानून आह्मांस माहीत नव्हता. अशी आमची स्थिति असतां देवानें आमच्यामध्यें एक मनुष्य उत्पन्न केला. त्याचा सत्यसंकल्प, प्रामाणिकपणा, सदाचरण व उत्तम कुळीं जन्म यांविषयीं आह्मांस पूर्ण माहिती होती. या मनुष्यानें आह्मांस बोलावून सांगितलें कीं, परमेश्वर हा एकच देव आहे, व तो अद्वितीय असा आहे. मूर्तींची आराधना करूं नका. सत्यवचनी असत जा. जिम्मेस दिलेलें धन ज्यांचें त्यांस परत करा. दयाधर्म पाळीत जा. शेजार-

धर्म राखीत जा, स्त्रियांविषयीं दुष्ट भाषण करूं नका. पोरक्या पोरांच्या वित्ताचा अपहार करूं नका. दुराचारापासून दूर असा, कोणाचें वाईट करूं नका, प्रार्थना करीत जा, भिक्षा घाला व उपास करा, हा त्याचा उपदेश आह्मीं ग्रहित केला आहे, आणि त्याजवर आह्मी विश्वास ठेवितों. ह्या आमच्या कृत्याबद्दल आमचे लोक आह्मांवर उठले आहेत. आह्मीं एका देवाची भक्ति सोडून द्यावी, काष्ठाच्या व पाषाणाच्या मूर्ति करून त्यांची पूजा करावी व इतर अनाचाराचे व्यवहार चालू ठेवावे, ह्मणून त्यांनीं आमचा छळ मांडिला आहे. त्यांनीं आह्मांस त्रास दिला, व आमचा जाच केला. शेवटीं निराश्रित होऊन आह्मी तुझ्या राज्यांत आश्रयासाठीं आलों आहों. तर हे राजा, तूं आह्मांस त्यांच्या जाचापासून सोडवून आमच्या जीविताचें रक्षण करशील असा आमचा पूर्ण भरंवसा आहे. " हें **जाफराचें** भाषण ऐकून घेऊन **कुरेश** लोकांनीं जी दुष्टपणाची मागणी केली होती तिचा धिक्कार करून ती पूर्ण होत नाहीं असा जबाब राजानें **कुरेश** लोकांनीं पाठविलेल्या प्रतिनिधींस दिला. ते प्रतिनिधी निराश व दुर्मुखलेले होऊन आले तसे **मक्केस** परत गेले.

शिष्यांस जरी **हबसाणां**त जावयास सांगितलें तरी **पैगंबर** हा **मक्केस**च लोकांकडून उपमर्द व शिवीगाळ सोशीत आपल्या कामाकडे नजर ठेवून राहिला होता. पुन्हां एकवार लोकांनीं त्याला त्याच्या कर्तव्यापासून परावृत्त करण्याचा

प्रयत्न चालविला. ह्या वेळींहि **पैगंबर** ढळला नाहीं. त्यानें पहिल्याप्रमाणेंच त्यांस जबाब देऊन सांगितलें कीं, मला द्रव्य, प्रतिष्ठा व राज्य ह्यांची इच्छा नाहीं. मला परमेश्वरानें पाठविलें आहे. मला तुह्मांस सुसमाचार कळविण्याकरितां आज्ञा दिली आहे. परमेश्वरानें जो निरोप सांगितला तो जशाचा तसाच तुह्मांस निवेदन करितों. मी तुह्मांस सावध करितों. जो निरोप मीं आणला आहे त्याचा जर तुह्मी स्वीकार कराल, तर तुमचें इहलोकीं व परलोकीं कल्याण होईल. माझा उपदेश जर तुह्मी ग्रहण करणार नाहीं, तर त्याबद्दल मला कांहीं संताप व्हावयाचा नाहीं; व तुमच्या मध्यें व मजमध्यें न्याय करण्याचे कामाचा ईश्वरावर हवाला ठेवून मी स्वस्थ बसेन. लोकांनीं त्याला चिडविलें, त्याची थट्टामस्करी केली; अडवून अडवून प्रश्न घालून त्याच्या मतांत खोटेपणा आहे असें दाखविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. तुला परमेश्वरानें आह्मांस सांगण्यासाठीं सुसमाचाराचा निरोप दिला आहे, ही जर गोष्ट खरी तर ह्याचें खरेपण सिद्ध करण्यासाठीं आह्मांस कांहीं चमत्कार करून दाखीव असें लोक त्याला बोलत. विहिरी व नद्या पाण्यानें भरून टाक, आकाशाचा एक एक भाग खालीं आणून आह्मांस दाखीव, डोंगर व पर्वत नाहींसे करून टाक, सुवर्णधातूचें एक गृह बांधून दे, शिडी करून आकाशांत चढून जा असे आह्मांस चमत्कार करून दाखीव; मग आह्मीं तुजवर विश्वास ठेवूं; असें लोक ह्मणत. अशा लोकांस त्याचें

एकच उत्तर होतें "परमेश्वरानें मला चमत्कार करण्यास पाठविलें नाहीं. तुह्मांस उपदेश करण्यासाठीं त्यानें मला पाठविलें आहे. माझ्या प्रभूचें नाम सुवंदित असो! मला इतर मनुष्यांपेक्षां मोठें करून प्रेषित ह्मणून या जगांत पाठविलें आहे काय? दूत पृथ्वीवर सहसा येत नाहींत. नाहीं तर ईश्वरी सत्य तुह्मांस पढविण्यासाठीं त्यानें आपला दूतच पाठविला असता. परमेश्वराचा (अल्लाचा) खजीना माझ्या हातांत आहे, असेंहि मी बोललों नाहीं. गुप्त गोष्टींची माहिती मला आहे असेंहि मी बोललों नाहीं. परमेश्वराच्या दूतांपैकीं मी एकजण आहें, असेंहि तुह्मांस मीं सांगितलें नाहीं. परमेश्वराची कृपा असली तरच माझ्या हातून माझें सहाय करून घेतां येईल, अथवा एखादी गोष्ट तडीस नेण्याची उमेद येईल, पण त्याची कृपा नसली तर कांहींएक माझ्या हातून होणार नाहीं. मी परमेश्वराची वाणी तुह्मांस कळविणारा आहें. परमेश्वराचा निरोप माणसांस कळवावा एवढेंच माझें कर्तव्य आहे."

मोठ्या आनंदाच्या भरांत असतांहि त्याचे पुढें लिहिलेले विचार असत. दयामय व करुणामय परमेश्वराचें नाम सुवंदित असो. स्वर्गाच्या ठायीं व पृथ्वीवर जें जें आहे तें तें सर्व कांहीं परमेश्वर जो राजा, जो पवित्र, जो सर्वसमर्थ व जो सर्वज्ञ याची स्तुती करितें. जे पूर्वीं अंधारसागरांत बुडून गेले होते अशा **अरबी** लोकांचा उद्धार करण्याकरितां व त्यांस शास्त्र व ज्ञान मिळावें ह्मणून परमेश्वरानें एक **पैगंबर**

उभा केला आहे. ही परमेश्वराची मोकळ्या हातानें दिलेली देणगी आहे व त्याच्या इच्छेनेंच ती मिळते. ही परमेश्वराची परम दया आहे. सृष्टी ही चमत्कारांनीं भरलेली आहे. आपल्या सभोंवार नजर फेंका. हा चमत्कारिक भूलोक, हा सूर्य, हा चंद्र, हा ताऱ्यांचा समुदाय, हीं सर्व मुकाट्यानें खरीं पण अति वेगानें ह्या निळ्या आकाशांत मार्गक्रमण करीत आहेत. ह्या विश्वांत नियमबंधन किती आहे, करपून गेलेल्या पृथ्वीतळास पर्जन्याच्या थेंबांनीं कशी टवटवी येते, जिन्नसांनीं भरलेलीं जहाजें सागरांत इकडून तिकडे कशीं जातात, ताली-वनाची वनशोभा किती रमणीय, ह्या ताडवृक्षांवरील सुवर्ण-वर्णाच्या फळांची किती मधुरता, ही करामत काष्ठांच्या व पाषाणांच्या देवाची आहे काय? ही परमेश्वराची कृती आहे. ह्याच्यापेक्षां अधिक महत्वाचे चमत्कार कोणते आहेत? किती वेडे लोक तुह्मी आहां. सर्व सृष्टीभर चमत्कार भरले असतां तुह्मांस आणखीहि चमत्कार करून दाखविले पाहिजेत काय? तुमच्या देहाची रचना किती तरी चमत्कारिक आहे. त्यांत निरनिराळ्या भागांची एकांत एक अशी गुंफण कशी चतुराईनें बनविली आहे. दिवस संपल्यावर रात्र व रात्र संपल्यावर दिवस, जीवन व मरण, निद्रावस्था व जागृदावस्था यांचें चक्र, ईश्वराच्या विपुल देणगींतून रक्षण करण्याची तुमची मनीषा, भरलेल्या ढगांस जिकडे परमेश्वराची इच्छा असेल तिकडे नेण्याविषयीं वायूची तत्परता, वैचित्र्यामध्यें

व्यवस्था, मनुष्याच्या निरनिराळया अनेक जाती, त्यांच्यांत एका प्रकारची निकटसाम्यता, फळें, पुष्पें, नाना जातींचे प्राणी या सर्व गोष्टींवरून चतुर अशा ईश्वराचें कौशल्य दिसून येत नाहीं काय? ही चमत्कृति पाहिल्यानें तुमची तृप्ति होत नाहीं काय?

**पैगंबर** सृष्टिसौंदर्याला लुब्ध होऊन गेला होता. एक देव आहे; त्याचें चातुर्य सर्व सृष्टींत भरून गेलें आहे. महान् पराक्रमी परमेश्वरानें तुमच्यासाठीं ज्ञानपूर्ण अशी बोधाकरितां किताब दिली आहे. ह्या सर्व गोष्टी बस्स आहेत, असें **पैगंबर** लोकांस आग्रहपूर्वक सांगत होता तरी **कुरेश** लोकांस हें पसंत पडत नव्हतें. त्यांस ईश्वराची सर्वत्र दूरवर पसरलेली कृति दिसत नव्हती, त्याची वस्ती सर्व सृष्टींत आहे हें त्यांच्या लक्षांत येईना. नीतीनें वागा, दुराचरणाचे मार्ग सोडून द्या, हा त्याचा उपदेश श्रवण करितांना त्यांचे कान बहिरे होत. आह्मी मरेपर्यंत-किंवा तुझा अंत होईपर्यंत तुला उपदेश करूं देणारच नाहीं असा आमचा निश्चय आहे, हेंच प्रत्युत्तर त्याच्या उपदेशाला **कुरेश** लोकांनीं द्यावें. एके प्रसंगीं याच सुमारास **महमद काआबा** मंदिरांत ध्यानस्थ बसला होता व **कुराना**च्या ५३ वे अध्यायांतील कांहीं वचनें ह्मणत होता तेव्हां **अल्लात अल्लुझा** व **मन्ना** हीं कोण होतीं असें तुह्मांस वाटतें? असे त्यानें विचारिलें त्या वेळीं एक मूर्तिपूजक जवळ होता तो ह्मणाला ह्या अप्सरा आहेत,

आणि त्या देवापाशीं आपली रदबदली करीत आहेत. कित्येकांची अशी समजूत झाली कीं, हे शब्द **महमदाच्या** तोंडचेच आहेत. हा प्रकार **महमदास** समजतांच तो बोलला "हीं निरर्थक नांवें आहेत, आणि तीं तुम्हीं व तुमच्या पूर्वजांनीं प्रचारांत आणलीं आहेत." हीं निरर्थक नांवें आहेत असें **महमद** जेव्हां बोलला तेव्हांपासून तर **महमद** व ह्याचे शिष्य यांचा अधिकच छळ होत गेला. परमेश्वराचें साह्य आपणास आहे अशी त्याची मनोदेवता साक्ष देत असल्या-मुळें **महमदानें** आपलें उपदेशाचें काम शत्रूंच्या कुचाळींना न भीतां चालविलें होतें. हा त्याचा नवीन उपदेश प्रतिकूळ गोष्टींना न जुमानतां लोकांच्या अंतःकरणांत रुजूं लागला. अशा पेरणीस पीक आल्यावांचून कसें राहील? जंगलांत वस्ती करून असणारे **अरब**, व निरनिराळ्या शहरांतून व्यापार करणारे लोक हे जेव्हां मेळ्यास जात तेव्हां ह्या **पैगंबराचा** बोध त्यांच्या कानीं पडे. त्याच्या अंतःकरणांत उकळी फुटून निघालेले शब्द श्रोतृजनांचें चित्त आकर्षण करून घेत, आणि हा वार्षिक मेळा संपल्यावर हे लोक जेव्हां आपापल्या घरीं जात तेव्हां ते या बोधाची बातमी निरनिराळ्या दूरप्रदेशीं नेत. हे लोक **पैगंबराच्या** बोधा-प्रमाणें आपलें वर्तन ठेवूं लागले, आणि तेहि ते मुद्दाम करीत असें नाहीं, तर बोध चांगला आहे, तेव्हां तो अनुकरणीय आहे असें पाहून ते आपलें आचरण तदनुसार ठेवूं लागत.

**महमदा**च्या द्वेष्ट्यांनीं जितकी ह्मणून त्याची मानहानी केली, तितकी जास्त त्याची प्रतिष्ठा मात्र वाढत गेली.

इकडे त्याचे शत्रु **मक्केकर** लोक स्वस्थ बसले नाहींत. **अबूतालिबा**कडे पुष्कळदां जासूद पाठवून त्यानीं त्यास सांगितलें कीं, तूं आपल्या पुतण्यास आमच्या धर्माविरुद्ध बोलूं देऊं नको. **अबूतालिब** यानें त्या लोकांची पुष्कळ समजूत घालून त्यांस सामोपचाराच्या गोष्टी सांगून परतविलें; परंतु **महमदानें** त्यांच्या दुराचरणाविषयीं बोलणें कमी केलें नाहीं ह्मणून त्यांनीं **काआबा** मंदिरांत **महमदा**चा उपदेश जो अलीकडे होत असे तो बंद केला. आणि मग सर्व **कुरेश** मिळून त्याच्या चुलत्याकडे आले व त्याला ह्मणूं लागले कीं तुझें वय व तुझी योग्यता आह्मी जाणून आहों. तुझी मान-हानी व्हावी अशी आमची बिलकूल इच्छा नाहीं; परंतु ह्याला मर्यादा आहे. तुझा पुतण्या जो आमच्या देवतांचा उपमर्द करितो, तें आमच्यानें सहन करवत नाहीं. तसेंच तो आमच्या वाडवडिलांस जीं नांवें ठेवितो तींहि पण आह्मांस पसंत पडत नाहींत. तेव्हां तूं आपल्या पुतण्याचें तोंड एकदां बंद करीव, अगर तूंतरी त्याचा धर्म स्वीकार, व त्याच्या पक्षास जाऊन मीळ ह्मणजे उभय पक्षांची लढाई होऊन त्यांत ज्यास जय मिळेल तो खरा, असा एकदां निकाल तरी होईल, असें बोलून ते परतले. **अबूतालिब** याच्या मनांतून आपला पुरातन धर्म सोडण्याचें नसून **महमदास**हि सोडा-

वयाचें नव्हतें. ह्मणून त्यानें **महमदास** बोलावून आणून **कुरेश** लोकांचें काय बोलणें होतें तें कळवून तूं हा सर्व प्रकार सोडून दे, असा बोध केला. **महमदास** असें वाटलें कीं, आतां **अबूतालिब** आपणास आश्रय देण्यास नाराज आहे तथापि आपण आरंभिलेलें कार्य आपणास सोडतां येत नाहीं, असें जाणून त्यानें आपला निश्चय **अबूतालिबास** कळविला. "काका, या लोकांनीं माझे उजवे बाजूस सूर्य व डावे बाजूस चंद्र आणून ठेवून असें सांगितलें कीं, तूं आरंभिलेल्या कार्याचा त्याग कर. तरी सुद्धां मला आरंभिलेलें कार्य सोडणें नाहीं. ईश्वराचा धर्म सर्व लोकांस विदित झाल्यावर मी हें काम सोडीन अथवा मला मृत्यूनें गांठल्यास मी ह्या कामाचा त्याग करीन." असें ह्मणून तो जावयास निघाला. **अबूतालिब** यानें त्याला परत बोलावून ह्मटलें, माझ्या पुतण्या मागें परत; तुला जें वाटेल तें तूं लोकांस सांग, मी तुला कधींहि सोडणार नाहीं. **महमदास** सोडून देण्या-विषयीं **कुरेश** लोकांनीं **अबूतालिब** यास पुनः एकवार विनंति केली. आह्मी तुला दुसरा तरणा मनुष्य त्याच्या ऐवजीं देतों असेंहि सांगितलें; परंतु **अबूतालिब** यास ती गोष्ट पसंत न पडून त्यानें त्यांचें ऐकिलें नाहीं. मी आपल्या पुतण्यास आश्रय दिल्यावांचून राहणार नाहीं असें त्यानें त्यांस स्पष्ट सांगितलें. त्यामुळें **कुरेश** लोक फार चिडून गेले व आह्मी तुझ्या पुतण्याला ठार मारूं, सोडणार नाहीं,

असा धाकहि त्यास दाखविला. त्या वृद्ध पुरुषानें, **महमदा**चे आप्तवर्गास ह्मणजे **बनी हाशीम** व **बनी मुत्तलिब** या दोन जातींच्या लोकांस **महमद** हा जो आपल्यांत श्रेष्ठ पुरुष झाला आहे, त्याचें संरक्षण करण्यास तुह्मी तयार अहां काय? असा सवाल टाकिला. **अबूलहब** खेरीजकरून बाकीच्या सर्व आप्तांनीं **महमदा**चें संरक्षण करण्याचें अंगीकारिलें. याच समयास **उमर** नांवाचा मनुष्य या नूतन पंथास येऊन मिळाला. पुढें जी **इस्लामाची** वृद्धि होऊन अनेक राष्ट्रांचीं राज्यसूत्रें मुसलमानांच्या हातांत आलीं, त्यांची व्यवस्था लावण्यांत **उमर** हा फारच उपयोगीं पडला. त्याच्या आंगीं फारच तरतरी व उमेद होती. त्याचे हातून **इस्लामा**चें कोणतें कार्य झालें, याविषयीं इतिहासांत सोनेरी अक्षरांनीं वर्णन दिलें आहे. **इस्लमी** लोकांचा छळ करण्यांत **खताब** याची अपकीर्ती फार झालेली होती. त्या **खताबा**चा हा मुलगा होता. **उमर** हा स्वतः **इस्लामा**चा द्वेष करी, व तो **पैगंबरा**चा शत्रु होता. एके समयीं मोठ्या त्वेषानें आपल्या बहिणीच्या घरीं तिचा प्राण घेण्यासाठीं ह्मणून हा गेला. त्या वेळीं **कुराना**चा कांहीं भाग घरांतील माणसें वाचीत होतीं, तो भाग **उमर**च्या कानीं पडला, आणि त्याचमुळें त्याच ठिकाणीं त्याच्या मनाचा पालट झाला.

**उमर** हा नागव्या तरवारीनिशीं आला होता, तरी **कुरानां-तील** वाक्यें त्याच्या कानीं पडतांच तो आश्चर्यभरित झाला आणि

तसाच **पैगंबरा**कडे गेला. शिष्यमंडळी **पैगंबरा**चा उपदेश श्रवण करण्यांत गुंतली होती. **उमर** नागवी तरवार हातीं घेऊन आलेला आहे हें पाहून ही मंडळी भयाभीत झाली. इतक्यांत **पैगंबरा**च्या हाताचें चुंबन घेऊन तो त्यास ह्मणाला, मला ईश्वराच्या मंडळींत घे. देवानें **उमर** यावर अशी कृपा केली ह्मणून सर्वांनीं परमेश्वराची स्तुति केली. **उमर** हा नव्या पंथाचा पुढें नामांकित पुढारी झाला; व पुष्कळ शिष्यांचा रक्षणोपाय त्याच्या हातून झाला.

**महमदा**च्या धर्मांत पुष्कळ गरीब लोक येऊन अगोदरच मिळाले होते, व पुढें **हमजा, अबूबकर, उमर** व **अली** हे मोठ्या पदवीचे व नामांकित कुळाचे लोक जेव्हां येऊन मिळाले तेव्हां ह्या नव्या पंथाची स्थिति बरीच चांगली झाली असें ह्मटलें पाहिजे. आतां लपूनछपून परमेश्वराची प्रार्थना करण्याची जरूर राहिली नव्हती. त्यांनीं सर्व लोकांच्या देखत उघडपणें, ईश्वराची प्रार्थना करण्याचें तेव्हांपासून आरंभिलें. **कुरेश** लोकांचे **हबसाणां**त पाठविलेले प्रतिनिधि याच सुमारास परत आले. ज्या कार्यासाठीं आह्मांस पाठविलें होतें त्याची आमच्या हातून बरोबर तजवीज झाली नाहीं, व आह्मांस अपयश आलें, असें वर्तमान जेव्हां त्यांनीं सांगितलें तेव्हां लोक फारच चवताळून गेले. **हाशीम** व **मुत्तलिब** या दोघांस एकसमयावच्छेदेंकरून निर्वंश करून टाकावें असा त्यांनीं सरते शेवटीं निश्चय केला. हा उद्देश

पूर्ण करण्यासाठीं इ. स. ६१६ वे वर्षीं त्यांनीं एक कट केला. त्यांनीं एक पत्रिका तयार केली, तींत अशी शर्थ लिहिली कीं, कटांतील लोकांनीं **हाशीमा**च्या वंशजांबरोबर लग्नव्यवहार करूं नये; व त्याजबराबर क्रयविक्रय, घेवदेव करूं नये. ही पत्रिका त्यांनीं **काआबा**मंदिरांत तिचें संरक्षण व्हावें ह्मणून ठेवून दिली होती. **मुसलमान** व मूर्ति· पूजक असे दोन्ही प्रकारचे **हाशीमी** व **मुत्तलिब** लोकांनीं असा विचार केला कीं, आतां आपली धडगती नाहीं, आपल्यावर कोणकोणतीं संकटें येणार याचा अंदाज आपणांस बसवितां येत नाहीं. तेव्हां आपण सर्वजणांनीं शहरांतील वस्ती सोडून देऊन एखाद्या सुरक्षित ठिकाणीं जाऊन एकत्र जमून रहावें. **अबूतालिब** याचें जें **शीब** नांवाचें राहण्याचें ठिकाण आहे, तेथें जाऊन रहावें ह्मणून त्यांनीं बेत केला. **मक्के**च्या पूर्वेच्या भागास जो तुटलेला कडा असे तेथें हें स्थळ होतें. तें निरुंद असून त्यांत एका मार्गावांचून दुसरा मार्ग जाण्यायेण्याजोगता नव्हता. या ठिकाणीं सर्वजण जाऊन राहिले. **अबूलहब** मात्र तिकडे गेला नाहीं; तो तसाच आपल्या पहिल्या घरीं राहिला, व तो शत्रूस जाऊन मिळाला. ते ह्या बचावाच्या जागेंत सुमारें तीन वर्षें राहिले. त्यांजबरोबर **महमद**हि होता. असें राहण्याचें कारण **कुरेश** लोकांनीं त्या जागेला वेढा घालून ठेविला होता. त्यांनीं जी अन्नसामग्री आपल्याबरोबर नेली होती, ती थोडक्याच

वेळांत खपून गेली, व भुकेनें व्याकुळ झालेल्या मुलांचें रडणें बाहेरपर्यंत ऐकूं येई. त्यांच्या जातींतील कांहीं चांगल्या लोकांनीं जर त्यांस साह्य दिलें नसतें, तर त्यांचा अन्नावांचून समूळ नाश होण्याचा संभव होता. शत्रूंतील कांहीं पुढारी लोकांस आपल्या कृत्यांची लाज वाटूं लागली. **हिशेम** बिन **अम्र** यानें **बनी हाशीम** व **बनी मुतलिब** या दोन कुळांचा व **कुरेश** लोकांचा तंटा मिटवण्याचा इ. स. ६१९ च्या सुमारास कांहीं विचार चालविला होता. **झोबर बिन अबू उम्मैय** याच्या व इतर दुसऱ्या मंडळीच्या साह्यानें हा तंटा मिटला गेला. पत्रिका व तींतील शर्थी रद्द करण्यांत आल्या. दोन्ही कुटुंबांच्या जातींस पूर्ववत् हक्क मिळून समेट झाला.

बंदिखान्यांत जोंपर्यंत **पैगंबर** होता तोंपर्यंत किल्ल्याच्या बाहेरच्या लोकांतून कोणी शिष्य झाला नाहीं; परंतु पवित्र महिन्यांत सर्व प्रकारचे कलह करण्याची मनाई असे, त्या वेळीं **महमद** बाहेर पडून उपदेश करीत असे. **अबूलहब** ह्मणजे ज्यास कलागतीचा बाप असें नांव पडलें होतें, तो लोकांस सांगे कीं **महमद** हा लबाड मनुष्य आहे, व **साबी** मताभिमानी आहे ह्या त्याच्या करण्यानें **महमदाच्या** कार्यास अडथळा होई.

पुढल्या वर्षास ह्मणजे इ. स. ६२० स शोकसंवत्सर असें नांव पडलें आहे. या वर्षी **अबूतालिब** व **खदीजाबाई**

हीं दोघेंहि एकामागून एक थोडक्याच अंतरानें परलोकास गेलीं. **अबूतालिब** यानें **महमदाचा** लहानपणापासून प्रतिपाळ केला होता, आणि मरे तोंपर्यंत ह्यानें त्याच्या शत्रूंला त्याच्या केंसासहि धक्का लावूं दिला नाहीं. **खदीजाबाईच्या** मरणानें तर **महमदास** फारच धक्का बसला. ज्या वेळीं कोणाहि मनुष्याचा त्याजवर विश्वास बसला नव्हता, व आपल्याला देवानें कांहीं काम नेमून दिलें आहे याबद्दलची त्याची त्यालाच खात्री नव्हती, ज्या वेळीं त्याचें अंतःकरण अनेक प्रकारच्या संशयांनीं मोहित झालें होतें व चोंहों बाजूंस अंधार व निराशा दिसत होती, अशा वेळीं ह्या **खदीजाबाईनें** त्याजवर विश्वास ठेविला, व त्यास ती धीर देत असे. त्याजला समाधान व उमेद देण्यांत सदा तत्पर अशी ती होती, मरेपर्यंत **महमदास** तिच्या त्या उत्तम भक्तीचा व उत्तम प्रेमाचा विसर पडला नाहीं.

---

## अध्याय तिसरा.

### हेजरा अथवा मदिनेस जाणें ( पलायन ).

**उमैयादि** द्वेष करणाऱ्या कुळांचा पुरातन धर्मावर विश्वास होताच. तशांत **हाशिमी** लोकांचा द्वेषहि ते करीत. अशा समयीं **अबूतालिबहि** मरण पावला. **अबूतालिबाचें** लोकांत पुष्कळ वजन असल्यामुळें त्यांस **महमदाच्या** विरुद्ध फारशी दांडगाई करितां येईना. **अबूतालिब** मरण पावल्यानंतर

धाक ह्मणून कोणाचाच राहिला नव्हता. तेव्हां **कुरेश** लोकांना **इस्लामी** लोकांचा छळ करण्याची संधी मिळाली; व ती त्यांनीं व्यर्थ दवडली नाहीं.

वृद्ध पाळण करणाऱ्या **अबूतालिबाच्या** मरणानें व आवडत्या पत्नीच्या मरणानें **महमद** फारच कष्टी झाला होता. तशांत **कुरेश** लोकांतील मूर्तिपूजेची चाल नाहींशी करवेना ह्मणून तो फार निराश झालेला होता. परमेश्वरावर भाव ठेवून आपण आतां दुसरीकडे जाऊन देवाचें काम करावें, असा त्यानें विचार केला. **मक्केकरांनीं** प्रभूच्या वाणीस धिक्कारिलें, कदाचित् **ताएफकर** तिचा अंगीकार करतील ह्मणून आपण तिकडे जाऊन देवाचा निरोप त्यांस सांगावा, असा त्याच्या मनांत विचार आला. मग **झेद** नांवाचा आपला विश्वासू नोकर घेऊन **महमद तायफास** गेला. देवानें मला उपदेशाचें काम दिलें आहे असें त्यानें **तायफकरांस** जाहीर केलें. " तुह्मी पापी व दुराचरणी आहां, याकरितां कुमार्ग सोडून देऊन परमेश्वराची भक्ति करण्यास तत्पर व्हा, " हें त्याचें बोलणें लोकांस रुचलें नाहीं, उलटे त्याच्या बोलण्यानें लोकांचीं मनें चिडून गेलीं. ते बोलले ' या माणसाला चळ लागला आहे. तो आमच्या सुस्वरूप देवदेवतांस सोडून द्या असें सांगतो, त्यांची अर्चा आह्मी किती मोकळ्या मनानें करितों, आह्मांस आचारविचाराच्या संबंधानें त्यांच्या कडून कोणत्याहि प्रकारची मनाई नाहीं. तेव्हां हा

आह्मांस भलतेंच सांगतो, ह्याला खरोखर वेड लागलें आहे,' असें ह्मणून त्यांनीं **महमदाला** शहराबाहेर हांकलून दिलें. नंतर गांवांतील टवाळ व बाजारबुणगे लोक व गुलाम ह्यांनीं मिळून त्याला धोंडमार केला, व त्याची हुर्यो उडविली. संध्याकाळ होईपर्यंत याप्रमाणें त्यांनीं त्याचा पिच्छा पुरविला; व मग त्याला सोडून दिलें. तो जखमी झालेला होता, त्याच्या पायाला ठोकर लागली होती, तो श्रमी झाला होता. अशा स्थितींत तो असतां, परमेश्वराची प्रार्थना करण्याचे उद्देशानें एका ताडवृक्षाच्या छायेखालीं जाऊन बसला. आकाशाकडे तोंड करून दोन्ही हात जोडून **महमद** मोठ्यानें बोलला कीं, "हे प्रभो, मी दुर्बल आहें, माझी मनीषा व्यर्थ आहे; ह्मणूनच मी तुजजवळ गाऱ्हाणें करितों; मी मनुष्यांच्या दृष्टींत कसपटाप्रमाणें झालों आहें; ह्मणून हे दयाळू प्रभो! हे अशक्तांच्या प्रभो! तूं माझा राजा आहेस, मजला सोडूं नको. परकीय व द्वेष्टे यांच्या स्वाधीन मला करूं नको. माझ्या हातून जर अपराध झाला नसला तरच मला अभय आहे. तुझा आश्रय मी करितों. तुझ्या मुखाकडे अवलोकन करून राहिलें असतां पृथ्वीतलावरील अंधाराचा विध्वंस होतो, व इहलोकीं व परलोकीं शांती प्राप्त होते. तुझा कोप मजवर न उतरो, तुझी इच्छा असेल तर तूं माझीं संकटें दूर कर. तुजवांचून दुसरा कोणी सबळ नाहीं. तुझ्या साह्यावांचून दुसरें कोणाचें मला साह्य नाहीं." **महमदाचें**

अंतःकरण अगदीं पोळून गेलें, व तो तसाच **मक्केस** परत आला. तेथें एकांतवासांत तो कांहीं काळ राहिला. उपदेशाचें काम क्वचित् करी. सालोसाल जो यात्रेचा मेळा **मक्केस** जमे त्यांत परके लोक आसपासच्या प्रांतांतून जे येत त्यांना **महमदानें** उपदेश करावा. त्यास असें वाटे कीं, कोणी तरी आपल्यावर विश्वास ठेवील व आपण सांगतों तें खरें आहे असें मानील, व तो हें माझें मत आपल्या लोकांस सांगेल. एके दिवशीं असें आपलें उपदेशाचें काम तो करीत असतां **यस्रब** शहरांतून आलेलीं ६ माणसें एका ठिकाणीं बोलत उभीं आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. हीं माणसें यात्रा व व्यापार अशीं दोन्ही कामें करण्याच्या उद्देशांनीं आलेलीं होतीं. **महमद** त्यांस ह्मणाला, बाबांनो, जरा खालीं बसा, व मी सांगतों तें ऐका. तीं माणसें खालीं बसलीं व त्याचें बोलणें त्यांनीं ऐकिलें. त्या भाषणानें त्यांचीं मनें आश्चर्यभरित होऊन गेलीं, व हा आपणांस जें सांगतो तें खरें आहे असें त्यांस वाटून त्यांनीं लागलीच त्याच्या शिष्यत्वाची दीक्षा घेतली. हे लोक जेव्हां आपापले घरीं गेले तेव्हां त्यांनीं तावडतोब आपल्या लोकांस सांगितलें कीं, **अरबी** लोकांत एक **पैगंबर** उपजला आहे. सर्वांस देवाचे दास व्हा ह्मणून तो सांगत आहे; आणि शेंकडों वर्षांपासून तुमच्यांत जे तंटे माजले आहेत, त्यांचा निर्मोड करा, असें तो आपणास सांगतो. ही कथा इ. स. ६२० वे वर्षीं झाली. पुढल्या

वर्षी हेच लोक पुनः मेळ्यास आले, बरोबर दुसरे ६ जण घेऊन आले. हे सहाजण **यस्रब** शहरांत ज्या दुसऱ्या दोन जाती आहेत, त्यांच्याकडून प्रतिनिधी ह्मणून आले होते. ज्या जागेवर आदल्या वर्षी सहा जणांनीं दीक्षा घेतली होती, त्याच जागेवर ह्या दुसऱ्या सहाजणांनींहि **पैगंबराचें** शिष्यत्व अंगीकारलें. हें स्थळ **आकेबा** नांवाच्या टेंकडावर आहे. ह्याच ठिकाणीं या बारा जणांनीं असा पण केला कीं, " आह्मी परमेश्वराशीं अन्य कोणालाहि सामील करणार नाहीं. आह्मी चोरी करणार नाहीं. व्यभिचारकर्म करणार नाहीं. आपल्या लेंकरांची हत्या करणार नाहीं. कोणावर आळ घेणार नाहीं. **पैगंबर** जी जी रास्त गोष्ट आह्मांस सांगेल ती ती आह्मी मानूं, व सुखाच्या प्रसंगीं व तसेंच दुःखाच्या प्रसंगीं आह्मी त्याला सोडणार नाहीं. " या पणाला **आकेबाचा** पहिला पण असें ह्मणतात. याला बायकांचा पण असेंहि नांव आहे; याचें कारण असें सांगतात कीं, दुसरा जो **आकेबाचा** पण झाला त्यांत **यस्रब** येथील प्रतिनिधींनीं अशी शर्त कबूल केली होती कीं, प्रसंग पडल्यास मुसलमानांच्या शत्रूवर आह्मी हत्यारबंदहि होऊन चाल करूं.

हा पण केल्यावर हे लोक **यस्रब** शहरास आपल्या लोकांत परत गेले, व परत जातांना नूतन धर्माचें त्यांस शिक्षण देण्यासाठीं ह्मणून **महमदाचा** एक शिष्य आपले बरोबर ते घेऊन गेले. ह्यामुळें **यस्रब** शहरीं धर्माचा प्रसार फारच

लवकर झाला. **आकेब** येथील वर सांगितलेला पहिला पण झाल्यावर व दुसरा **आकेबा**चा पण होण्यापूर्वीं मध्यंतरींचा जो अवसर गेला तो **पैगंबरानें** हातीं घेतलेल्या कामाच्या संबंधानें ध्यानांत ठेवण्याजोगा काळ आहे. त्याचा परमेश्वरावर विश्वास किती होता व त्याच्या अंगीं प्रशंसनीय गुण किती होते, ह्यांची कल्पना ह्या अवसरांत जें त्याचें धीराचें वर्तन दिसून आलें त्यावरून करितां येतें. ह्या प्रसंगीं जो त्याच्या अंगचा मोठेपणा दृष्टोत्पत्तीस आला तसा प्रसंग पुढें कधीं घडून आला नाहीं. आपले लोक मूर्तिपूजेच्या चालीला फारच चिकटून आहेत हें पाहून त्याच्या जीवाला कष्ट व्हावे; परंतु अंतीं सत्याचा विजयच होईल, ही त्याच्या मनाची खात्री होती. त्यामुळें ह्या कष्टांचें पुष्कळ प्रकारें निरसन व्हावें. सत्याचा विजय झालेला पाहणें कदाचित् माझ्या वांट्याला येणार नाहीं; परंतु सूर्यकिरणें पडलीं ह्मणजे जसा अंधाराचा लोप झालाच पाहिजे तसें सत्य-सूर्याचा प्रकाश पडला ह्मणजे असत्याचा लोप होईलच होईल, यांत संशय नाहीं. असें तो आपलें समाधान करून घेई. जरी त्याचें लहानसें शिष्यमंडळ या वेळीं सिंहाच्या जबड्यांत असल्यासारखें होतें, व तो स्वतः निराश्रित असा होता, तथापि परमेश्वरानें मला पाठविलें आहे असा त्याचा पूर्ण भरवंसा होता, ह्मणून त्यानें निर्धास्तपणें आपल्या लोकांच्या ह्मणण्यास जुमानलें नाहीं, व परमेश्वर कधींनाकधीं

आपणास आश्रय देईल ह्मणून परमेश्वराचे साह्याचा अवसर आज येईल, उद्यां येईल असा तो मनाला धीर देऊन व निश्चय धरून त्या अवसराची वाट पहात बसला होता. ह्याच अवसरांत ह्मणजे ज्या समयीं **पैगंबर** देवाच्या कृपेची मार्गप्रतीक्षा करीत बसला होता, त्या अवसरांतच **पैगंबरा**चें स्वर्गारोहण घडून आलें. त्याची हकीकत थोडक्यांत येणें-प्रमाणें आहे.

हा चमत्कार ज्या रात्रीं घडून आला ती रात्र फारच शान्त होती; त्या रात्रीं निबिड अंधकार पडला होता. पाण्याचें झुळझुळ वाहणें आणि वाऱ्याची गति हीं दोन्ही बंद पडलीं होतीं. सृष्टीभर सर्व प्रकारची हालचाल बंद पडली होती. अशा रात्रीच्या मध्यान्हसमयीं **महमदानें** एक वाणी ऐकिली, आणि त्यामुळें तो जागा झाला. “ अरे झोंपीं गेलेल्या, जागा हो. ” असा शब्द त्याच्या कानीं ऐकूं आला. जागा होऊन पहातो तों **गाब्रिएल** दूत त्याच्या समोर उभा आहे. **गाब्रिएला**च्या तोंडावर गंभीरता दिसत होती, त्याचा वर्ण शुभ्र होता. त्याचे केंस त्याच्या मानेवर लोळत होते, त्याचे उडण्याचे पंख अनेक रंगांचे व तेजःपुंज होते. त्याच्या अंगांतला झगा मोत्यें व सुवर्ण यांनीं मढविलेला होता. **पैगंबरास** बसण्यासाठीं ह्मणून अनुपम असा शुभ्र दिव्य वाजी हा देवदूत घेऊन आला होता. ह्या वाजीचें तोंड माणसासारखें असून

गालाचा भाग मात्र घोड्याच्या मुसकटासारखा दिसत होता. त्याचे डोळे माणकासारखे लाल व ताऱ्यासारखे प्रकाशमान होते. त्याला गरुडासारखे पंख असून ते सूर्यकिरणासारखे चकचकीत होते, व ते रत्नांनीं जडलेले होते. हा प्राणी स्त्री-जातीचा असून त्याच्या अंगीं जो अतिवेग होता त्यामुळें त्याचें नांव **अलबोराक** अथवा विद्युल्लता असें पडलें होतें.

**पैगंबर** अश्वारूढ होण्यास तयार झाला, परंतु वाजी मागें सरला. हें पाहून **गाब्रिएल** ह्मणतो, "**अलबोराक**, शान्त हो. परमेश्वराच्या **पैगंबरा**चा सन्मान कर. परमेश्वराचा इतका आवडता मनुष्यप्राणी आजपर्यंत तुजवर आरूढ झाला नाहीं." **अलबोराक** हिला वाचा फुटून ती बोलूं लागली. "असें कां ह्मणतोस? **इब्राहीम** जो देवाचा दोस्त तो जेव्हां आपल्या पुत्रास भेटावयास गेला तेव्हां तो प्राचीन युगीं मजवर बसला नव्हता काय? अरे **गाब्रिएला**, हाच का तो मध्यस्थ? परमेश्वराच्या भक्तीची पद्धती यानेंच घालून दिली आहे ना?" "अगे **बोराके**, तूं ह्मणत्येस तेंच खरें. **अरबस्थान** ह्मणून जो सुखी देश आहे तेथील हा रहिवाशी आहे. याचें नांव **महमद इब्न अबदल्ला** आहे. हा परमेश्वराची खरी भक्ति व अर्चना करितो. **आदामा**च्या संतानांपैकीं हा मुख्य गणला आहे. परमेश्वरानें जे आजपर्यंत प्रेषित पाठविले, त्यांमध्यें हा श्रेष्ठ व शेवटचा प्रेषित आहे. स्वर्गीं जाणें ह्याच्या मध्यस्थीनेंच होणार. ह्याच्यावर जे विश्वास

ठेवतील त्यांस स्वर्गप्राप्ति होईल. स्वर्ग ह्याच्या उजव्या हाताशीं आहे. नरक ह्मणजे जहानमचा अग्नि ह्याच्या डाव्या हाताशीं आहे. जे कोणी ह्याच्या मताचा निषेध करतील त्यांस ह्या नरकांत ढकललें जाईल." **अलबोराक** बोलते, "हे **गाब्रिएला**! पुनरुत्थानाच्या दिवशीं ह्यानें माझी मध्यस्थी करावी, असें तूं ह्याला सांग. तुमचें परस्परांचें जें नातें आहे त्यामुळें हा तुझें बोलणें अमान्य करणार नाहीं." **पैगंबर** बोलतो, "हे **बोराके**, मी तुझ्यासाठीं रदबदली करून तुला स्वर्गीं पोंचवीन." हें **महमदाच्या** मुखांतून वचन निघतांच **महमदानें** बसावें ह्मणून **बोराक** जवळ आली; **महमद** आरूढ होतांच **मक्केच्या** पर्वतावर तिनें उंच उड्डाण केलें. विद्युल्लतेप्रमाणें आकाश व पृथ्वी यांच्या दरम्यान हीं जात असतां **गाब्रिएल महमदास** ह्मणतो, "**महमदा**, पृथ्वीवर उतरून गुडघे टेंकून प्रार्थना कर." **महमद** खालीं उतरला, व प्रार्थना करून **गाब्रिएलास** ह्मणतो, "हे जिवलग मित्रा, ह्या स्थळीं प्रार्थना करण्याचें काय प्रयोजन आहे?" **गाब्रिएल** ह्मणाला, "हा **सिनाई** डोंगर आहे; आणि ह्या स्थळीं परमेश्वरानें **मूसास** दर्शन दिलें होतें."

**महमद** पुन्हा अश्वावर आरूढ होऊन ते दोघे आकाशमार्गानें वर जाऊं लागले. इतक्यांत **गाब्रिएल** पुन्हा **महमदास** ह्मणतो, "**महमदा**, एथें खालीं उतरून गुडघे टेंकून प्रार्थना

कर." **महमदानें** खालीं उतरून सांगितल्याप्रमाणें प्रार्थना करून तो **गाब्रिएलास** पुसतो, "ह्या स्थळीं प्रार्थना करण्यास तूं मला कां ह्मणून आज्ञा केली?" **गाब्रिएल** ह्मणतो, " हें स्थळ **बेथलेहेम** आहे. ह्या ठिकाणीं **मरियम** बीबीचा पुत्र **ईसा** ह्याचा जन्म झाला."

**पैगंबर** घोडीवर बसून आकाशमार्गानें वाट चालूं लागला; चालतां चालतां उजव्या बाजूस एक वाणी ऐकूं आली. ती अशी कीं, " अरे **महमदा**, क्षणभर थांब. तुला कांहीं गोष्ट सांगावयाची आहे, उत्पन्न झालेल्या सर्व प्राण्यांत माझा भाव तुजवर फार आहे." **बोराक** घोडी न थांबतां तशीच पुढें चालती झाली, व **महमद** त्या स्थळीं उतरला नाहीं. मार्गावर थांबणें आपल्या स्वाधीन नाहीं, परंतु सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या स्वाधीन आहे, अशी **महमदाची** समजूत होती. पुढें कांहीं दूर गेल्यावर डाव्या बाजूकडे पूर्वीं-प्रमाणें वाणी झाली कीं, **महमदा**, थांब. मला तुझ्याशीं कांहीं बोलणें आहे, **बोराक** घोडी न थांबतां तशीच चालती झाली, व **महमद** या स्थळींहि थांबला नाहीं. पुढें कांहीं दूर गेल्यावर एक शृंगार घातलेली व रूपानें अनुपम अशी सुंदर स्त्री त्याच्या पाहण्यांत आली. मोहकशा स्मित वदनानें ती त्यास ह्मणाली, "अरे **महमदा**, जरा थांब. मला तुजशीं कांहीं बोलावयाचें आहे. सर्व प्राणिमात्रापेक्षां माझी प्रीति तुजवर फार आहे. घोडी ह्या स्थळींहि न थांबतां पुढें चालती झाली.

कोणत्याहि स्थळीं थांबणें ही गोष्ट आपल्या स्वाधीन नाहीं, तर परमेश्वराच्या स्वाधीन आहे असें **महमद** मानीत असे. तथापि त्यानें **गाब्रिएलास** पुसलें कीं, ही जी वाणी मीं ऐकिली ती कोणाची असावी? व ज्या रूपवती स्त्रीनें मला खुणा केल्या ती कोण असावी, हें तुला ठाऊक आहे काय? **गाब्रिएलानें** उत्तर केलें कीं, "प्रथमतांच जी वाणी तूं ऐकिली; ती यहूदी माणसाची होती; तिजकडे लक्ष देऊन जर तूं थांबला असतास तर तुझ्या राष्ट्रांतील सर्व लोक **इस्राएल**धर्मी झाले असते; दुसऱ्यानें जी वाणी तूं ऐकिली, ती **ख्रिस्ती** मनुष्याची होती, तेथें जर तूं थांबला असतास तर तुझें राष्ट्र ख्रिस्ती धर्मानुयायी झालें असतें; जी तूं सुंदर स्त्री पाहिलीस ती तर हें जग होय. त्यांत मोह, संपत्ति व असत्यता हीं भरलेलीं आहेत. ह्या स्त्रीचें बोलणें ऐकून जर तूं त्या स्थळीं थांबला असतास तर तुझ्या राष्ट्रानें इहलौकिकसुखाचा अंगीकार केला असता, व अनंतकाळच्या सुखास मुकून तुझ्या राष्ट्राचा नाश मात्र झाला असता." हवेंतून ते तसेच पुढें गेले, कांहीं वेळानें **यरुशलेम** येथील पवित्र मंदिराच्या दाराशीं येऊन थडकले. **महमद** घोडीवरून खालीं उतरला, व पूर्वकाळीं **अलबोराफी**स पूर्वींचे भविष्यवादी देवळाच्या ज्या कडीस बांधून ठेवीत असत, त्या कडीसच **महमदानें** तीस अडकवून ठेविलें. मंदिरांत गेल्यावर अनेक भविष्यवादी **पैगंबरा**च्या पाहण्यांत आले. ह्या सर्वांच्या समागमांत असतां त्यानें परमेश्वराची

प्रार्थना केल्यावर आकाशमार्गानें एक प्रकाशाची शिडी आली. **गाब्रिएल** दूताच्या मदतीनें **पैगंबर** विद्युल्लतेसारखा त्या शिडीवर चढून वर आकाशांत गेला. " हा पहिला स्वर्ग." **गाब्रिएलानें** दार ठोकलें. 'तूं कोण आहेस?' अशी आंतून पृच्छा झाली. 'मी **गाब्रीएल** आहें,' असें उत्तर मिळाल्यावर दुसरा असा प्रश्न झाला कीं, 'तुझ्या बरोबर कोण आहे?' **महमद** माझ्या बरोबर आहे, असें **गाब्रिएलानें** उत्तर दिलें. त्यानंतर असा प्रश्न पुनः विचारण्यांत आला कीं, त्याजकडून जो कार्यभाग होणें आहे, तो करण्याचा अधिकार त्यास मिळाला आहे काय? **गाब्रिएलानें** उत्तर दिलें. 'होय, त्याला अधिकार मिळाला आहे.' असें असल्यास त्यानें खुशालपणें आंत यावें, असें उत्तर मिळाल्यावर दरवाजे उघडले.

हा पहिला स्वर्ग शुद्ध रुप्याचा बनविलेला होता. आंत शिरल्यावर एक अति वृद्ध मनुष्य आपल्याजवळ येत आहे असें **महमदाच्या** दृष्टीस पडलें. **गाब्रिएल महमदास** ह्मणतो, हा **आदाम** ह्मणजे मानवजातीचा मूळपुरुष आहे. ह्याला दंडवत कर. दूतानें सांगितल्याप्रमाणें **पैगंबरानें** त्या महान् पुरुषास नमन केलें. **आदाम** यानें **महमदास** आलिंगन देऊन ह्मटलें, " तूं माझ्या सर्व संतानांमध्यें मोठा आहेस, आणि सर्व भविष्यवाद्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. " ह्या स्वर्गांत सर्व जातींचे प्राणी असंख्य होते. **गाब्रिएलानें** सांगितलें कीं,

हे प्राणी देवदूत आहेत; आणि हे पृथ्वीतळावरील जे असंख्य प्राणी आहेत, त्यांच्याविषयीं देवाजवळ रदबदली करितात.

पुढें **महमद** व **गाब्रिएल** दुसऱ्या स्वर्गधामीं चढून गेले. वर सांगितल्याप्रमाणें पुनः **गाब्रिएलानें** दार ठोकलें. पुनरपि तेच सवालजबाब होऊन दार उघडलें, व हे दोघे आंत प्रवेश करिते झाले. हा स्वर्गधाम दीप्तिमान् पोलादाचा बनविलेला होता. ह्या धामीं **नू** रहात असून त्यानें **महमदास** पाहतांच प्रेमालिंगन देऊन बोलून दाखविलें कीं, तूं भविष्यवाद्यांत श्रेष्ठ आहेस. अशाच रीतीनें ते दोघे तिसऱ्या स्वर्गधामीं जाऊन पोंचले. ह्याची जमीन अमूल्य रत्नांनीं जडलेली होती. त्याच्या चकाकीकडे कोणाच्यानें पहावत नसे. ह्या स्थळीं अतोनात उंचीचा असा एक देवदूत बसलेला होता. या देवदूताच्या आज्ञेंत एक लक्ष शस्त्रधारी शिबंदी असत. त्याच्या पुढें एक अत्यंत विस्ताराची किताब पसरलेली होती. त्यांत त्याचें लिहिणेंपुसणें अविश्रांत चाललें होतें.

**गाब्रिएल महमदास** सांगूं लागला कीं, ह्या दूताचें नांव **अस्राएल** ( यम ) ह्याजपुढें जी विस्तीर्ण किताब पडलेली आहे, त्यांत तो पुढें जन्मास येणाऱ्यांचीं नांवें लिहीत असतो व ज्यांचा मरणकाळ येऊन ठेपला आहे त्यांचीं नांवें पुसून टाकीत असतो; आणि त्यानें कोणाचें नांव पुसलें कीं तो तात्काळ मरून जातो.

यापुढें ते चवथ्या स्वर्गधामांत जाऊन पोंचले. हें

अत्युत्तम रुप्यानें मढविलेलें होतें. ह्या स्थळींहि राहणाऱ्या प्राण्यांमध्यें एक फार उंचीचा देवदूत होता. ह्याच्या मुद्रेवर अस्वस्थता दिसत होती, व नेत्रांतून एकसारखा अश्रूंचा लोट चालला होता. **गाब्रिएलानें** या दूताविषयीं असें सांगितलें कीं, याला अश्रूंचाच देवदूत ह्मणतात. ह्याचें काम माणसांच्या हातून जें पाप झालें असेल, त्याजबद्दल रडत बसावें; व त्यांजवर जीं संकटें येणार असतील त्यांचें भविष्य सांगत बसावें.

पांचवें स्वर्गधाम सरस सोन्याचें बनविलेलें होतें. या ठिकाणीं **अहरोनानें पैगंबराचें** आदरातिथ्य करून त्याला आलिंगन दिलें; व त्याची बडेजाव केली, सूड उगविणारा देवदूत या आकाशांत राहतो; व त्याची हुकमत अग्नीवर चालते. जितके ह्मणून देवदूत **पैगंबराच्या** पाहण्यांत आले, त्या सर्वांत हा कुरूप व भयंकर होता. त्याची मुद्रा तांबूस रंगाची होती, व त्याच्या अंगावरती काळे डाग पडलेले होते. त्याच्या नेत्रांतून विद्युल्लता चमकत असे; व मुखानें तो अग्निज्वाळाच भक्षण करी. तो ज्या सिंहासनावर बसला होता त्याचा आसमंतभाग अग्निज्वालांनीं वेष्टित होता, व त्याच्यापुढें जळते निखारे पडलेले होते. जर तो या रूपानें धरणीतलावर येईल, तर पर्वत भस्म होऊन जातील. सागर कोरडे पडतील, आणि जीव भयानें प्राण सोडून देतील.

हा देवदूत व त्याच्या हाताखालचे मंत्री यांच्या हातीं काफीर लोकांना शिक्षा देण्याचें आहे.

हें भयंकर स्थान सोडून ते सहाव्या स्वर्गधामीं चढून गेले. हें धाम लाल रत्नांनीं जडित केलेलें होतें. ह्या स्थळीं एक मोठा देवदूत होता. त्याचें अर्धांग बर्फाचें असून अर्धांग अग्नीचें बनलेलें होतें. असें असतांहि बर्फ वितळला नव्हता; व अग्नि विझाला नव्हता. त्याच्या सभोंवार कमी दर्जाचे दूतांचें मंडळ होतें. यांचा सदोदित असा जयघोष चाललेला असे कीं, हे अल्ला ज्याप्रमाणें तूं आपल्या परमसामर्थ्यानें बर्फाचा व अग्नीचा हा गोळा एकत्र करून ठेविला आहेस, त्याचप्रमाणें तूं आपल्या सर्व सेवकांस त्यांच्याकडून तुझ्या आज्ञांचा प्रतिपाळ करून एकत्र कर. **गाब्रिएल महमदास** उद्देशून बोलतो, हा दूत स्वर्ग व पृथ्वी यांचा रक्षक आहे. राष्ट्रांतील माणसांच्या अंतःकरणांत तुझ्या धर्माची प्रेरणा करण्यास हा आपल्या हाताखालचे दूत पाठवील. हाच लोकांचीं मनें परमेश्वराची भक्ति करण्यास वळवितो. पुनरुत्थानाचा दिवस येईपर्यंत याचें हें काम असेंच चालेल.

याच स्वर्गधामीं **मूसा** वस्ती करून होता. इतर प्रेषितांनीं **पैगंबराचें** आदरातिथ्य करून तो आला ह्मणून संतोष मानिला, परंतु **मूसाच्या** डोळ्यांतून मात्र **पैगंबराला** पाहून अश्रुधारा चालल्या. **पैगंबरानें** त्यास विचारलें तूं कां बाबा रडतोस. **मूसा** ह्मणाला कीं, भ्रष्ट अशा **इस्राएली** संतानांतील

जितक्या लोकांस मीं सुखधामाप्रत नेलें त्यांच्यापेक्षांहि तूं अधिक लोकांस सुखधामीं पोंचविणार आहेस असें भाकित आहे. ह्मणून मला दुःख वाटतें; व ह्मणूनच माझ्या डोळ्यांतून अश्रु निघतात.

या ठिकाणाहून सप्तमस्वर्गधामीं जाण्यास ते चढून गेले. तेथें गेल्यावर पुराणपुरुष **इब्राहीम** यानें **पैगंबराचें** आदरातिथ्य केलें. हें सुखधाम दिव्य ईश्वरी प्रकाशानें शोभायमान झालेलें होतें, तेथील सौंदर्य अवर्णनीय होतें. तेथील एक प्राणी ह्मटला ह्मणजे त्याच्या शरीराचा विस्तार या आपल्या पृथ्वीच्या विस्ताराहून अधिक. तो आपला सर्वकाळ ईश्वरस्तवन करण्यांत घाली.

या अघटित प्राण्यांविषयीं **पैगंबर** चिंतन करीत असतां त्यास **सद्रात** नांवाच्या वृक्षाकडे एकाएकीं उचलून नेलें. परमेश्वराचें जें अदृश्य सिंहासन होतें त्याच्या उजवे बाजूस हा वृक्ष आहे. ह्या वृक्षाचीं फळें दुधापेक्षां अधिक रुचिकर व मधापेक्षां अधिक गोड लागत.

पुढें **पैगंबर** व त्याचा वाटाड्या देवदूत हे दोघे भजनालयांत गेले. हें मंदिर लाल मण्यांनीं जडवलेलें होतें. त्यांत असंख्य नंदादीप जळत होते. **पैगंबर** दरवाज्यांत गेल्याबरोबर त्याच्यापुढें तीन पेले आले. एकांत मध भरला होता. दुसऱ्यांत दूध भरलें होतें. तिसऱ्यांत मद्य भरलें होतें. **पैगंबरानें** दूधाचा पेला घेतला व तो पिऊन टाकिला.

**गाब्रिएल** दूत मोठ्यानें ओरडून बोलला "गड्या, फार चांगलें केलें; तूं जो पेला निवडून घेतलास त्यांत तुझी बरकत आहे. जर तूं मद्य प्राशन केलें असतेंस तर त्यामुळें तुझे लोक बहकले असते."

ह्या भजनमंदिराचा आकार **मक्केंतल्या काआबा** मंदिरासारखा होता. आणि **काआबा** मंदिराच्या ऊर्ध्व भागींच सातव्या आकाशांत हें भजनमंदिर आहे. **पैगंबर** ज्या वेळीं तेथें जाऊन पोंचला त्या वेळीं देवदूत मंदिरास प्रदक्षिणा घालीत होते. त्यांच्या मेळ्यांत **पैगंबर** जाऊन मिळाला, व त्यानें सात प्रदक्षिणा घातल्या. **गाब्रिएला**च्यानें या स्थळाच्या पलीकडे जाववेना. ह्मणून तो तेथेंच थबकला. **महमद** मात्र अति वेगानें आकाशांतून वर गेला. जातांना त्याला नेत्रास दिपविणारे असे दोन प्रकाशाचे प्रांत लागले, व एक तर निबिड अंधाराचा प्रदेश लागला. अंधकाराच्या प्रदेशांतून बाहेर निघतांच तो घाबरून गेला. कारण तो **परमेश्वराच्या** संनिध येऊन ठेपला. दोन हांकांच्या अंतरावर परमेश्वराचें सिंहासन होतें. **परमेश्वरानें** आपले हात पुढें करून एक हात **पैगंबराच्या** छातीवर व दुसरा हात त्याच्या खांद्यावर ठेविला. हे हात अंगावर पडल्यानें **पैगंबराला** अत्यंत सुखाचा अनुभव झाला. चोहोंकडे सुगंधपरिमळ भरला आहे असा त्यास भास झाला. **परमेश्वराच्या** संनिध राहण्याचा ज्यास अनुभव आहे, त्यासच ह्या सुखाची कल्पना करितां येईल.

कुरानांतील पुष्कळशीं मतें **परमेश्वरानें** स्वतः होऊन **महमदास** निवेदन केलीं. सर्व भाविक लोकांनीं दिवसांतून पन्नासदां तरी प्रार्थना करावी अशी आज्ञा **परमेश्वरानें** त्यास दिली.

**परमेश्वराचें** सांनिध्य सोडून **पैगंबर** खालीं उतरून जेव्हां **मूसास** येऊन भेटला, त्या वेळीं **मूसानें** त्यास विचारलें कीं तुला **अल्लानें** कांहीं हुकूम दिला आहे काय? **पैगंबरानें** सांगितलें कीं मीं व सर्व भाविक लोकांनीं नित्यशः पन्नासदां प्रार्थना करावी असा **परमेश्वराचा** मला हुकूम झाला आहे. **मूसा** ह्मणाला तुझ्यानें एवढा दुर्घट उद्योग होईल काय? तुझ्या पूर्वींच मीं या गोष्टीचा प्रयत्न करून पाहिला. मीं **इस्त्राएली** लोकांकडून ही गोष्ट करविण्याचा प्रयत्न केला; परंतु माझा प्रयत्न निष्फळ झाला. मग मागें फीर व **देवास** सांग कीं एवढें ओझें आमच्यानें उचललें जाणार नाहीं. तेव्हां यांत कांहीं तरी कमी करा. **परमेश्वराकडे** **महमद** परतला, व दहा प्रार्थना कमी करून घेतल्या. **मूसाकडे** जेव्हां **पैगंबर** परतून आला तेव्हां लोकांकडून चाळीस प्रार्थनाहि नित्यशः होणार नाहींत असें **मूसा** बोलला. त्यावरून **पैगंबर परमेश्वराकडे** पुनः पुनः जाऊन शेवटीं पांच प्रार्थना तरी नित्यशः कराव्या अशी आज्ञा त्यानें आणली.

तरी **मूसा** याला समाधान झालें नाहीं; व तो ह्मणाला एवढी गोष्ट सुद्धां मनुष्यांच्या हातून होणार नाहीं. **पैगंबर**

बोलला मला आतां **परमेश्वरा**कडे जाऊन विनवणी करण्याची लाज वाटते, असें ह्मणून **मूसा**ला नमन करून **पैगंबर** चालता झाला.

प्रकाशाच्या शिडीनें तो **यरुसालेमा**च्या देवळांत खालीं उतरून पहातो तों **बोराक** घोडी बांधलेल्या ठिकाणींच त्याला आढळली. तिजवर बसून तो जेथून निघाला होता तेथेंच पुनः परत येऊन पोंचला.

इ. स. ६२२ वे वर्षी ह्मणजे स्वर्गारोहणाच्या पुढले सालीं **यस्रब** शहराच्या ज्या ज्या लोकांनीं **पैगंबरा**च्या धर्माची दीक्षा घेतली होती असे पंचाहत्तर असामी **मक्केस** आले आणि येतांना त्यांनीं आपल्या बरोबर गांवांतील मूर्तिपूजकांसहि आणलें. **पैगंबरास** बोलावून आपले शहरीं घेऊन जावें या उद्देशानें हे आले होते. परंतु त्यांच्या बराबर आलेल्या मूर्तिपूजक बिरादरांस हा उद्देश माहित नव्हता.

चोहों बाजूंस शांतता पसरली आणि शत्रूकडील माणसांमध्यें सामसूम झाली आहे अशा रात्रीच्या थंड समयीं हे नव्या पंथाचे पुढारी लोक पूर्वसंकेतानुरूप एका टेंकडीच्या पायथ्याशीं जमले. ह्याच ठिकाणीं पूर्वीच्या सालीं सुद्धां ते लोक मिळाले होते. **पैगंबर**हि त्या स्थळीं आला. त्याचे बराबर त्याचा चुलता **आबास** हाहि आला. हा कांहीं **महमदा**च्या मताचा नव्हता; परंतु त्या मताचा उत्कर्ष व्हावा, अशी त्याची फारच इच्छा होती. **पैगंबरानें** सभेची सुरवात केली.

तो **यस्रब**करांस ह्मणाला, " बाबांनो, तुह्मी **इस्लामास** वरतां परंतु तसें करण्यानें तुमच्यावर अनेक संकटें येतील. लोक तुमचा पुष्कळ छळ करतील, आणि तुह्मांला पुष्कळ हाल भोगावे लागतील. तुह्मी मला आपल्या शहरीं नेतां खरें परंतु त्यांत तुह्मांला फार त्रास सोसावा लागेल. या गोष्टीचा तुह्मी पूर्णपणें विचार करा. मग काय करावयाचें तें करा. " त्या जमलेल्या सर्व मंडळीनें मिळून एकदम त्यास असा जबाब दिला कीं "हे **परमेश्वरा**च्या **पैगंबरा**, तुझ्या धर्माचा आह्मीं स्वीकार केला आहे, आणि आह्मांवर याबद्दल कोणतीं संकटें येतील तीं सर्व आह्मी जाणून आहों, व तीं भोगण्याबद्दल तयारहि आहों. जो पाहिजेल तो पण तूं आमच्याकडून करून घे; आह्मी तसा पण करण्यास तयार आहों" **पैगंबरानें** आपल्या दररोजच्या रिवाजाप्रमाणें **कुराना**तून कांहीं भाग वाचून दाखविला. या नव्या पंथाचा अंगीकार केला असतां आत्म्यास किती समाधान होतें, याचें त्यानें सविस्तर वर्णन करून, तुह्मी सर्वजण **परमेश्वरा**ची भक्ति करण्यास या असें सर्वांस पाचारण केलें. नंतर पूर्वीं जो त्यांनीं पण केला होता त्याची पुनरुक्ति केली, व ते ह्मणाले कीं "आह्मी **परमेश्वरा**वांचून इतर कोणत्याहि देवाची भक्ति करणार नाहीं, **इस्लामा**च्या सर्व आज्ञा आह्मी पाळूं. **पैगंबरानें** उचित कर्म करावयास सांगितलें असतां तें आह्मी करूं. आह्मी आमच्या मुलांबाळांचा जसा बचाव करितों त्याप्रमाणें

**पैगंबरा**चाहि बचाव करूं. आह्मी त्याच्या केंसासहि धक्का लागूं देणार नाहीं, पण हें देवाचें काम करितांना आह्मी जर मरण पावलों तर त्याबद्दल आह्मांस कोणता मोबदला मिळेल?" असा शेवटीं त्यांनीं **पैगंबरास** प्रश्न केला. "तुमच्या वांट्यास परलोकीं सुख येईल" असा जबाब **महमदानें** त्यांस दिला. ते त्याला ह्मणाले. "तुझा उदयकाळ आला ह्मणजे तूं आपल्या लोकांकडे जाशील, व आह्मांस टाकून देशील." **पैगंबर** स्मित वदनानें बोलला "असें कधींच होणार नाहीं, तुमचें रक्त तें माझें झालें आहे, मी तुमचा झालों आहें, व तुह्मी माझे झालां आहां." "असें जर आहे तर कर तुझा हात पुढें" असें ते ह्मणाले. नंतर प्रत्येकानें त्याच्या हातावर हात ठेवून "आह्मी परमेश्वराचे व तुझे झालों आहों, आह्मी तुला कधीं सोडणार नाहीं" अशी शपथ घेतली. इतक्यांत एका **मक्के**करानें एक मोठी आरोळी ठोकली. हा **मक्के**कर माणूस या लोकांचें काय चाललें आहे हें बरेच अंतरावरून टपत बसून पहात होता. ही आरोळी ऐकिल्याबराबर तेथें जमलेल्या निरभिलाष लोकांच्या अंतःकरणांत धस्स झालें. **पैगंबरानें** चार दृढ निश्चयाच्या गोष्टी सांगून त्यांला अशा व्यर्थ आरोळीकडे कांहीं लक्ष देण्याची जरूरी नाहीं, असें बोलून त्या लोकांला त्यानें धीर दिला. नंतर जमलेल्या लोकांच्या सह्यानें त्यांच्यांत जे शिष्ट ह्मणविले जात होते अशा पंधरा जणांची आपले प्रतिनिधी (**नकीब्ज**)

ह्मणून नेमणूक करून घेतली. याप्रमाणें **आकेबाचा** दुसरा पण झाला.

वर सांगितलेल्या **मक्केकरांच्या** हेरानें झालेलें वर्तमान सर्व शहरभर पसरून दिलें. **महमद** व त्याचें शिष्यमंडळ यांनीं जें हें दांडगाईचें कृत्य केलें त्याची हकीकत ऐकून **कुरेश** लोकांना फारच त्वेष आला, व जे लोक **यस्त्रबाहून** आले होते, त्यांच्या तांडेलाकडे तावडतोब ते गेले, व आमच्या गांवच्या कोणकोणत्या लोकांनीं तुह्मांबराबर तह केला आहे, व आणा शपथा वाहिल्या आहेत, त्यांचीं नांवें सांगा, अशी त्यांच्याजवळ दरडावून मागणी केली. तांडेला-कडून ही माहिती मिळाली नाहीं, ह्मणून **कुरेश** लोक निराश झाले; परंतु त्यांनीं **यस्त्रब** येथील आलेल्या यात्रेकरूंस कोणत्याहि प्रकारची इजा केली नाहीं. तसेंच त्यांस परत जाऊं दिलें. पुढें **महमद** व त्याचे शिष्य यांचा अतोनात छळ **कुरेश** लोकांकडून झाला. दिवसानुदिवस **इस्लामी** लोकांवर फारच धोक्याचे प्रसंग येऊं लागले. आपल्या सर्व लोकांची हे एकदम कत्तल उडवितील अशी **पैगंबरास** भीति वाटल्यावरून त्यानें आपल्या लोकांस **यस्त्रब** येथें तावडतोब जाण्यास सांगितलें, व तेथें गेल्यावर तुह्मी सुरक्षितपणें नांदूं लागाल असें तो ह्मणाला. ह्यावरून दोन दोन तीन तीन कुटुंबें एकत्र जमून मुकाट्यानें **मक्का** सोडून गेलीं. **यस्त्रबास** त्यांचा चांगला सत्कार झाला. त्यामुळें **मक्का** शहरांतील

महल्लेचेमहल्ले ओस पडले. शहराची अशी अवस्था पाहून **उतबास** फारच दुःख झालें, आणि त्याला एका जुन्या भविष्य-कथनाची आठवण झाली. तें असें "जरी एखाद्या वस्तीस अनेक वेळां आशीर्वाद मिळाला असला तरी सुद्धां तेथें प्रसंगोपात्त अनेक दुःखें व संकटें येतील." आणि त्याला असें वाटलें कीं ह्या सर्वाला कारण आपल्या भावाचा मुलगा होय. त्यानेंच आमच्या सभांची फांकाफांक केली, आमच्या कार्यांचा विध्वंस केला, आणि आह्मांमध्यें दुफळी केली. **पैगंबराच्या** ठायीं तल्लीन झालेले **अली**, व **अबूबकर** या दोघांशिवाय **महमदा**-जवळ आतां कोणी राहिलें नव्हतें. बाकीचें त्याचें शिष्यमंडळ **यस्रबास** निघून गेलें होतें. चोहोंकडून प्रतिकूळ गोष्टींचें जरी वादळ उठलें होतें तरी **महमदाच्या** अंतःकरणांत कोण-त्याहि प्रकारची भीति उत्पन्न न होतां तो तसाच धीरानें **मक्केस** वस्ती करून होता, परंतु शेवटीं तुफान होण्याची वेळ जमून आली. **पैगंबर** पळून आपल्या हातांतून निसटून जाईल अशी भीति **कुरेश** लोकांस उत्पन्न होऊन त्यांनीं **दारून नद्वा** या सभामंदिरांत सर्व लोकांची जाहीरसभा भरविली. या सभेस इतर जातींच्या सरदारांसहि निमंत्रण केलें होतें. गोष्ट निकरास जाऊन पोंचली आहे, **महमदास** जर जीवंत ठेविलें तर **कुरेश** लोकांनीं मरावें, व **कुरेश** लोकांनीं जीवंत रहावें असें आहे तर **महमदानें** आपले प्राणांस मुकावें, या थरास गोष्ट येऊन थडकली आहे, अशा

प्रकारची भीति सर्व सभासदांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली. कित्येकांचा अभिप्राय असा पडला कीं, यास जन्मठेपेंत ठेवावें, दुसरे कित्येकांस असें वाटलें कीं, यास शहराच्या हद्दपार करावें. या सर्व गोष्टींची भवति न भवति झाली. दगा करून याचा जीव घ्यावा असाहि विचार सभेपुढें आला, परंतु दगा करून मारण्यांत मारणारा व त्याचें कुटुंब यांजवर सर्व दोष बसतो, व **महमदाचा** सर्व आप्तवर्ग एकत्र मिळून मारणाऱ्याचा सूड घेतील, तेव्हां हा विचार चांगला नाहीं, असें त्यांनीं ठरविलें. दग्यानें मारण्याच्या संबंधानें जी अडचण पडली होती, ती दूर करण्याची एक युक्ति **अबूजहल** यानें काढली. ती अशी कीं निरनिराळ्या कुटुंबांतून कांहीं धीटशा माणसांची निवड करावी; त्या सर्वांनीं एकसमयावच्छेदेंकरून **महमदाच्या** उरांत आपापल्या तरवारी भोंसकाव्या म्हणजे कोणा एकावर दोष न राहतां अनेक कुटुंबांतील माणसांवर हा दोष राहील व इतक्यांचा सूड घेणें **महमदाच्या** आप्तवर्गास फार दुरापास्त होईल. ही मसलत सभेच्या पसंतीस आली, आणि ज्या लोकांच्या हातून हा खून करावयाचा त्यांची निवडणूक करण्यांत आली. रात्रीचा समय बराच झाल्यावर हे मारेकरी लोक **पैगंबराच्या** घरासमोर दडून राहिले. यांचा उद्देश असा होता कीं **पैगंबर** प्रातःसमयीं घराबाहेर पडला म्हणजे त्याजवर सर्वजणांनीं एकदम हल्ला करून त्याच्या उरांत तरवारी भोंसकून त्याचा जीव घ्यावा. **पैगंबराच्या** घराच्या

दरवाजास एक छिद्र होतें. त्या छिद्रांतून या मारेकऱ्यांनीं **पैगंबर** बिछान्यांतच पडला आहे किंवा नाहीं हें वारंवार डोकावून पहावें. आपल्या जिवावर बेतली आहे असें **महमदास** समजून आलें. मारेकऱ्यांचें सर्व चित्त त्या अंथरुणाकडेसच लागलेलें रहावें ह्मणून परिधान करण्याचें आपलें हिरवें वस्त्र आपल्या ठायीं तल्लीन असलेल्या **अली**च्या अंगावर घालून **महमदानें** त्यास असें सांगितलें कीं, तूं असाच या बिछान्यावर निजलेला रहा;अशी त्यास आज्ञा देऊन आपण दुसऱ्या बाजूनें खिडकीवाटे घराच्या बाहेर पडला. तेथून तसाच तो **अबूबकर** याच्या घरीं गेला, आणि ते दोघेजण मिळून आपल्या प्राण घेणाऱ्या जन्मपुरीचा त्याग करिते झाले. **मक्के**च्या दक्षिण भागीं **थौर** नांवाचा लहानसा डोंगर आहे, त्यांत एक गुहा आहे, त्या ठिकाणीं ते दोघेजण बरेच दिवस लपून राहिले. इकडे मारेकरी अपजय पावून रिकामे हातांनीं परत आले, व **महमद** हा नकळत निघून गेला हें पाहून **कुरेश** लोक अधिकच चवताळून गेले. आतां त्यांचा क्रोध अनिवार झाला; व **महमदा**चा पत्ता लावण्यासाठीं सर्व प्रांतभर त्यांनीं घोडेस्वार पाठविले. जो कोणी **महमदास** जीवंत धरून आणील, अगर त्याचें प्रेत आणील त्यास १०० उंट देण्यांत येतील, असें त्यांनीं जाहीर केलें. या दोघां फिरस्त्यांवरील दोन तीन प्रसंग फार भयाचेच गेले. एके प्रसंगीं **अबूबकर** भयानें घाबरून गेला होता. तो **महमदास** ह्मणाला आपण दोघेजणच या ठिकाणीं आहों.

**महमद** ह्मणाला असें ह्मणूं नको. आपण तिघेजण आहों. ईश्वर आपल्या संनिध आहे. तीन दिवस लोटल्यावर **कुरेश** लोकांनीं तपास करण्याचें काम कमी केलें. **अबूबकर** याची मुलगी रात्रीं कोणाच्या दृष्टीस न पडतां जें अन्न आणून देई त्याजवरच या दोघांची या संकट प्रसंगीं उपजीविका होत होती. तिसरे दिवशीं रात्रौ त्या दोघांनीं ती गुहा सोडिली. मोठ्या प्रयासानें दोन उंट मिळवून ते **यस्रबास** आडवळणाच्या मार्गानें जाण्यास निघाले; परंतु ह्या रस्त्यांतहि धोके कांहीं कमी नव्हते. **महमदाचें** डोकें जो कोणी आणील त्याला फार मोलाची देणगी देण्याचें ठरलें असल्यामुळें ती मिळविण्याच्या लोभानें पुष्कळ घोडेस्वार बाहेर पडले होते. ते ह्या निराश्रित फिरस्त्यांचा फार बारकाईनें शोध करीत होते. एकदां तर एका रानवट व उग्र अशा घोडेस्वाराच्या दृष्टीस हे दोघेहि पडले. ही स्थिति पाहून **अबूबकर** याचा धीर सुटला, व तो ओरडूं लागला "आपण मेलों रे मेलों." **पैगंबर** बोलला, "धीर धर, **परमेश्वर** आपलें संरक्षण करील." घोडेस्वारानें **महमदाला** येऊन गांठलें; परंतु त्याच्या घोड्यानें पिछेहाट घेतली, व स्वार घोड्यावरून खालीं पडला. भयानें स्वाराच्या पोटांत धस्स झालें, आणि ज्या मनुष्याचा तो इतके दिवस पाठलाग करीत होता, त्याचीच तो आतां क्षमा मागूं लागला. माझा अपराध तुह्मीं क्षमा केला याबद्दल मला कांहीं तरी दाखला द्या, असें तो त्यास ह्मणूं लागला.

**अबूबकरानें** एक हाडाचा तुकडा घेऊन त्यावर त्याला क्षमा दिल्याबद्दलचा दाखला लिहून तें हाड त्याला दिलें.

हे फिरस्ते तसेच तीन दिवस प्रवास करीत राहिले. ह्या तीन दिवसांच्या प्रवासांत त्यांना कोणीं कोणत्याहि प्रकारें त्रास दिला नाहीं. तीन दिवसांनंतर त्यांस **यस्रब** प्रांत लागला. इ. स. ६२२ च्या जून महिन्यांत, **पैगंबर** आपल्या उंटावरून उतरून खालीं भूमीवर पाय ठेविता झाला. हीच भूमी पुढें त्याच्या आश्रयाची जागा व त्याच्या वस्तीचें स्थान झाली. एका **यहूदी** माणसानें **पैगंबरास** आपल्या गढीच्या बुरुजावरून पाहिलें; **महमद** व त्याचा दोस्त **अबूबकर** हे दोघेजण **कोबा** नांवाच्या गांवीं थोडे दिवस राहिले. ह्या गांवची जमीन सुपीक व गांवचा देखावा फार सुरेख होता. हा गांव **यस्रबाच्या** दक्षिणेस दोन मैलांच्या अंतरावर आहे. **महमद** आपल्या हातांतून निसटून गेला, ह्मणून मूर्तिपूजकांनीं **अलीला** चांगलाच ठोक दिला. त्यांच्या तावडींतून सुटल्यावर तो **मक्का** सोडून निघाला. पुढें थोड्याच दिवसांनीं त्याची व **पैगंबराची** गांठ ह्याच गांवीं पडली. **अली** या गांवीं पायीं पायीं आला. त्यानें रात्रीची मजल करावी व दिवसा छपून लपून रहावें. त्याला **कुरेश** लोकांच्या हातीं पडण्याचें फार भय होतें. **कोबा** हें गांव **बनूअम्र** बिन **अफ** याचे मालकीचें होतें. आमच्या गांवीं आपण कांहीं दिवस जास्त मुक्काम करावा अशी या गृहस्थानें **महमदास** विनंति

केली; परंतु त्यास **यस्रबास** लवकरच जावयाचें होतें. त्या कारणानें तो **कोबा** गांवीं फार दिवस राहिला नाहीं. पुष्कळ मोठ्या शिष्यसमुदायासह तो **यस्रब** शहरास जावयास निघाला. इ. स. ६२२ च्या जुलै महिन्याचे २ तारखेस तो या पुरींत प्रवेश करिता झाला. याप्रमाणें **हेजर**ची हकीकत आहे. या समयापासूनच **मुसलमान** लोक आपल्या संवत्सराची सुरवात करितात.

---

## अध्याय चवथा.

### मदीना येथें पैगंबराचें वास्तव्य.

मक्केपासून अकरा दिवसांच्या रस्त्यावर उत्तर दिशेस **मदीना** शहर वसलेलें आहे. **मदीना** या शब्दाचा अर्थ प्रकाशित. **पैगंबरा**च्या आगमनाच्या पूर्वीं हें शहर अगदीं उघड्यावर होतें व शत्रूंनीं हल्ला केल्यास तेथें बचावाची कांहीं-एक तजवीज करितां आली नसती. **पैगंबर** आल्यावर त्यानें मोठी दिवाल शहरासभोंवतीं बांधली, व दिवालीच्या भोंवतीं मोठा खंदक खणला. **कुरेश** लोकांपासून बचाव करण्यासाठीं त्यानें ही योजना केली होती. कोणी **अमलकी** सरदारानें या शहराची स्थापना केली असें ह्मणतात. **पैगंबरा**चें आगमन होण्यापूर्वी हें शहर त्या सरदाराच्या नांवानें चालत असे. **यस्रब** हें त्या सरदाराचें नांव होतें. फार प्राचीन काळीं,

**यस्रब** व त्याच्या आसपासच्या प्रांतांत **अमलकी** लोकांचीच वस्ती होती. एकामागून एक जसजशा **यहूदी** लोकांच्या टोळ्या वसाहत करण्यासाठीं आल्या, तसतसे **अमलकी** लोक नाहींसे होत गेले. **बाबीलोन**, **हेल्लेनी**, व **रोमी**, लोकांनीं **यहूदी** लोकांचा छळ मांडिला होता, त्यामुळें **यहूदी** लोकांस **अरबस्थानां**त शिरून **हिजाज**च्या उत्तरेकडील मुलखांत वस्ती करणें भाग पडलें. **खैबर** येथील **बनूनधीर**, **फिदेक** येथील **बनूकुरीझा** व **मदीने**च्या नजीकची **बनूकेनुका** ह्या तीन **यहूदी** लोकांच्या वसाहती मोठ्या महत्वाच्या ह्मणून मानीत. हे **यहूदी** लोक परगणोपरगणीं किल्ले बांधून बंदोबस्तानें राहत, व त्या योगानें आसपासच्या **अरब** लोकांवरतीं त्यांचा मोठा दरारा असे. **औस** व **खस्राज** या दोन **कहताणी** जाती **यस्रब** येथें आपली वसाहत करी-पर्यंत **यहूदी** लोकांचा असा दरारा असे. कांहीं दिवस या लोकांना **यहूदी** लोकांच्या हुकुमांत रहावें लागलें, परंतु पुढें हें पारडें पालटून **कहताणी** इतके पराक्रमी झाले कीं **यहूदी** लोकांना ह्यांचाच आश्रय धरून रहाणें भाग पडलें. ह्या दोन्ही जातींची स्थिति अशीच कायम राहिली नाहीं. तर पुढें परस्परांमध्येंच बेबनाव होऊन आपसांत मोठी दुही माजली. **पैगंबर मदीनेस** आल्यावर त्यानें आपल्या कामाची सुरवात करूं लागण्याच्या सुमारास ह्यांतली ही दुही बंद झाली, व त्यांनीं कसें तरी करून परस्परांमध्यें एकी करून

घेतली. **पैगंबर** आल्यानें तर शहरावर नूतन सूर्य उगवला असें झालें.

**औस** व **खस्राज** या दोन जातींच्या लोकांनीं **इस्लामा**चा अंगीकार केल्यामुळें त्यांचें आपसांतील हाडवैर ते विसरून गेले. पुढें जें जगभर **मुसलमानी** राष्ट्र झालें व त्यांत जी एकी होती तिचा प्रथमचा प्रारंभ हाच समजतात. **इस्लामा**वर संकटाची वेळ आली होती त्या वेळीं ज्या ज्या लोकांनीं त्याला सहाय्य केलें, त्या सर्वांना मदतगार असें सन्माननीय नांव पडलें. तेंच नांव या दोन जातींतील लोकांनीं आपणांला घेतलें, व पूर्वींच्या दोन निरनिराळ्या नांवांचा त्याग केला. ज्या भाविक लोकांनीं आपली प्रिय अशी जन्मभूमि सोडून दिली होती त्यांस फिरस्ते असें नांव पडलें.

**अन्सर** व **मुहाजरीन** ह्मणजे मदतगार व फिरस्ते यांची निकट एकी व्हावी ह्मणून **पैगंबरा**नें ह्या दोघांची एक मंडळी स्थापिली, व तिचा एक नियम असा होता कीं, सुखदुःखाच्या प्रसंगीं त्यांतील लोकांनीं एकमेकांस मदत करावी. पुरीचें प्राचीन **यस्रब** ह्मणून जें नांव होतें, तें बदलून टाकिलें, व तीस **मदिनत उन्नबी** ह्मणजे **पैगंबरा**ची पुरी असें नांव दिलें. **मदिनत उन्नबी** हें मोठें नांव आहे करितां थोडक्यांत **मदीना** असेंच ह्मणतात. पुढें थोडक्या दिवसांनीं एक मशीदहि तेथें बांधिली, हिचें बांधकाम **महमदा**नें आपल्या हातानें केलें आहे. फिरस्ते लोकांसाठीं लागलींच घरेंहि बांधून

घेतलीं. जी मशीद बांधावयाचें ठरलें होतें ती जागा कोणा दोघां भावांची मिळून होती. त्या दोघांनींहि मशीद बांधण्यासाठीं ह्मणून **पैगंबरास** ही जागा फुकट देण्याचा विचार केला होता, परंतु हे दोघे भाऊ अगदीं निराश्रित होते ह्मणून ती जागा फुकट न घेतां बाजारांत जी तिची किंमत झाली, ती किंमत देऊन **पैगंबरानें** ती जागा विकत घेतली.

**पैगंबरा**चा धर्म जसा साधा होता तशाच प्रकारचें हें साधेंसें मंदिर होतें. भिंती विटा-मातीच्या असून छपर ताडाच्या पानांचें केलें होतें. ज्या लोकांना घरें नव्हतीं, अशा लोकांची सोय व्हावी ह्मणून मशीदीचा कांहीं भाग राहण्याच्या सोयीकरितां राखून ठेविला होता. ईश्वरभक्ति करण्याच्या या गरीबशा जागेंत सर्व प्रकार फारच साध्या रीतीनें होत असत. नुसत्या जमिनीवर उभें राहून अगर ताडाच्या झाडाला टेंकून **महम्मद** या ठिकाणीं प्रार्थना व उपदेश करी; आणि श्रोतृजन त्याचीं तीं जागृत करणारीं वचनें मोठ्या भक्तिपूर्वक श्रवण करीत.

त्याचा उपदेश कधीं कधीं असा होई कीं, जो **ईश्वरा**च्या प्राणिमात्रावर व आपल्या लेंकरावर प्रेम करीत नाहीं, त्यावर **परमेश्वर** प्रेम करणार नाहीं. जो मुसलमान नागव्या उघड्या मनुष्यास वस्त्रप्रावर्ण देऊन त्याचें आंग झांकील त्याला **परमेश्वर** आपल्या स्वर्गांतील उत्तम अशा हिरव्या वस्त्राचा झगा देऊन त्याचें आंग आच्छादील.

एके प्रसंगीं उपदेश करितांना दानधर्माविषयीं **पैगंबरानें** असें सांगितलें कीं, जेव्हां **परमेश्वरानें** पृथ्वी उत्पन्न केली तेव्हां ती थरथर कांपत होती. मग देवानें तिजवर पर्वत ठेविले, मग पृथ्वी स्थिरावली. देवदूतानें **परमेश्वरास** असा **प्रश्न** केला कीं, या पर्वतापेक्षां बळकट अशी दुसरी वस्तु तुझ्या सृष्ट पदार्थांत आहे काय ? **परमेश्वराचें** प्रत्युत्तर असें होतें कीं, पर्वतापेक्षां लोखंड मजबूत आहे. कारण लोखंडानें पर्वताचे तुकडे करितां येतात. लोखंडापेक्षां मजबूत अशी दुसरी वस्तु या सृष्ट पदार्थांत आहे काय ? असा दुसरा **प्रश्न** देवदूतानें केला. होय, अग्नि हा लोखंडाहून मजबूत आहे, कारण तो लोखंडास वितळून टाकितो, असें प्रश्नाचें **उत्तर** दिल्यावर अग्नीपेक्षां मजबूत अशी दुसरी वस्तु तुझ्या सृष्ट पदार्थांत आहे काय ? असा देवदूताचा तिसरा प्रश्न झाला. **परमेश्वरानें** सांगितलें कीं, अग्नीपेक्षां मजबूत असें पाणी आहे. कारण पाणी अग्नीस विझवून टाकतें. नंतर पाण्यापेक्षां मजबूत अशी दुसरी वस्तु तुझ्या सृष्ट पदार्थांत आहे काय ? असा चवथा प्रश्न देवदूतानें केला. त्याला **परमेश्वरानें** असें उत्तर दिलें कीं, वारा हा पाण्यापेक्षां मजबूत आहे. कारण त्याचा जोर पाण्यावर चालतो व तो पाण्यास गति देतो. हे आमच्या संरक्षणकर्त्या, वाऱ्यापेक्षां बळकट अशी दुसरी वस्तु तुझ्या सृष्ट पदार्थांत आहे काय ? असा पांचवा प्रश्न देवदूताचा झाला. त्यावर **परमेश्वराचें** उत्तर असें होतें कीं,

दानधर्म करणारा सज्जन वाऱ्यापेक्षां बळकट आहे. माणसानें उजव्या हातानें दानधर्म करून डाव्याहि हातास जर त्यानें तो कळविला नाहीं, तर तो माणूस सर्व वस्तु आपल्या हुकुमांत ठेवितो, असा परमेश्वराचा जबाब झाला.

**पैगंबराच्या** मतें दानधर्म ह्मणजे सर्वप्रकारचें सत्कृत्य. तो ह्मणे, हास्यवदनानें आपल्या भावाकडे पहाणें ह्मणजे धर्म होतो. आपल्या बांधवांस सदाचरणाकडे वळा ह्मणून बोध करणें ह्मणजे धर्म करणें होय. वाट चुकलेल्यास नीट वाटेवर लावणें ह्मणजे धर्म होतो. अंधळ्यास साह्य करणें ह्मणजे धर्म होतो. रस्त्यावरून दगड, धोंडे, कांटे व दुसरे पदार्थ काढून टाकून रस्ता साफ करणें ह्मणजे धर्म होतो. जल देऊन तृषार्ताची तृष्णा भागविणें ह्मणजे धर्म होतो. आपल्या बांधवांचें इहलोकीं कल्याण करणें ह्मणजे परलोकीं संपत्ति सांठवून ठेवणें होय. सज्जनाचें देहावसान ज्या वेळीं होतें, त्या समयीं जगांतील लोक आपसांत अशी विचारपूस करितात कीं, या मनुष्यानें आपल्या मागें कांहीं धन ठेविलें आहे काय ? परंतु देवदूत त्या मनुष्याची चौकशी जेव्हां कबरस्थानांत करितात त्या वेळीं त्याला असें विचारतात कीं बाबारे, कोणतीं सत्कृत्यें तूं आपल्या मरणाच्या अगोदर पुढें रवाना केलीं आहेस ?

एके समयीं त्याचा एक शिष्य त्याला विचारूं लागला, हे **पैगंबरा** ! माझी आई **उम्मसाद** ही आतां मरण पावली

आहे; तर तिच्या आत्म्याचें कल्याण होईल अशा प्रकारचा मीं कोणता धर्म करावा? जंगलांतील उष्णतेच्या तडाख्यामुळें पाणी पाणी करीत जी प्राण्यांची तळमळ होते तिचा विचार करून **महमद** बोलला, तूं जलदान कर ह्मणजे झालें. तिच्या नांवानें एक विहीर खण, आणि तृषितांस पाणी पाज. या आज्ञेप्रमाणें त्या मनुष्यानें आपल्या आईच्या नांवानें एक विहीर खणिली, अशासाठीं कीं तेथें पाणी पिणाऱ्या लोकांच्या आशीर्वादानें तिच्या आत्म्याचें कल्याण व्हावें.

आपल्या शब्दांनीं कोणाहि मनुष्याचें मन दुखवूं नका, अशाविषयीं **पैगंबराचा** कडकडीत उपदेश असे. **अबूजरिया** नांवाचा **बस्त्रा** येथें राहणारा एक मनुष्य होता. तो **मदीना** येथें **पैगंबराकडे** आला. **महमद** हा देवानें पाठविलेला **पैगंबर** आहे, असा त्याचा पक्का निश्चय झाल्यावर तो **पैगंबरास** अशी विनंति करिता झाला कीं, तुम्ही मला एखादा सदाचरणाचा उत्तम नियम सांगून द्या. कोणाविषयींहि वाईट बोलूं नको. आपल्या शब्दांनीं कोणाहि मनुष्याचें मन दुखवूं नको. असें **पैगंबरानें** त्यास सांगितलें. **अबूजरिया** म्हणतो त्या दिवसापासून स्वतंत्र मनुष्याला किंवा गुलामाला मी कधींहि अपशब्द बोललों नाहीं. शिष्टाचार संप्रदाय कसा असावा याविषयीं सुद्धां **इस्लामाचें** सांगणें बोध घेण्यासारखें आहे. जेव्हां तुम्ही कोणाच्या घरांत प्रवेश कराल अथवा तेथून बाहेर निघाल तेव्हां त्या घरांतील माणसांस सलाम

( वंदन ) करा. तुमचे मित्र, ओळखीचे लोक व वाटसरू हे तुम्हांस रस्त्यावरून चालतांना सलाम करतील तर त्यांस उलट सलाम तुम्ही करीत जा. जो घोड्यावर बसून जात असेल, त्यानें पायीं चालणाऱ्यास प्रथम नमन करावें. जो चालत जात आहे त्यानें बसलेल्या लोकांस प्रथम नमन करावें. थोड्या जमावाच्या लोकांनीं पुष्कळ जमावाच्या लोकांस प्रथम नमन करावें; व तरुणांनीं प्रथमतः वृद्धांस नमन करावें.

**पैगंबराचें मदीना** पुरींतलें वास्तव्य कोणत्या प्रकारचें होतें याविषयीं येथें सांगणें जरूर आहे. याचें बालपण कशा प्रकारें गेलें तें मागें सांगितलेंच आहे. बापाच्या प्रेमाचें सुख ह्याला मिळालें नाहीं. तशीच आईहि त्याच्या बाळपणींच मरण पावली. त्याचें लहानपण तर पुष्कळच हृदयद्रावक गोष्टींनीं भरलेलें आहे. तो बालपणापासून विचारशील होता. तसाच तो पुढें तरुणपणांत तर जास्तच विचारशील झाला. जसा बाळपणीं निर्मळ व निर्दोषी होता, तसाच पुढें तारुण्यांतहि होता. तरुणपणीं तर तो भक्तिपरायण व गंभीर असे. पुढें प्रौढ वयांतहि तो तसाच होता. त्याला लोकांचें दुःख पाहून दुःख होई, व त्याच्या अंतःकरणांत द्रव उत्पन्न होई. त्याचें वर्तन शुद्ध व गरीबीचें असल्यामुळें त्याच्याकडे लोक बोट दाखवून असें म्हणत कीं पहा हो हा विश्वासू माणूस. ह्याची मैत्री निष्कपट असे. कृतकर्माचा कसा व किती मोबदला मानवास द्यावा

लागणार, मानवजन्माचा उद्देश कोणता व मरण म्हणजे काय या गोष्टींच्या विचारांत त्याचें मन गुंतून गेलें असे.

आपल्या देश-बांधवांस परमेश्वराच्या भक्तिमार्गास लावण्याचा व देशाची सुधारणा करण्याचा त्यानें पत्कर घेतला होता. ह्या कामांत साह्य करणारी व प्रसंगीं शांतवन करणारी त्याची बायको **खदीजाबाई** होती. नेमून दिलेलें काम शेवटास नेण्याचा त्याचा प्रयत्न त्यानें मोठ्या धीरानें सतत चालविला होता. त्याचें शुद्ध व उदात्त वर्तन, त्याचा परमेश्वराच्या दयेवर निःसीम भाव हे गुण पाहून बरेच लोक त्याला येऊन मिळाले. आपणावर व आपल्या शिष्यांवर जेव्हां संकटें आलीं, तेव्हां शेवटपर्यंत आपण **मक्केस** राहून आपल्या शिष्यांची सुरक्षित स्थळीं त्यानें रवानगी केली; व नंतर तो स्वतः तिकडे जाण्यास निघाला. **मदीना** येथें आल्यावर त्याची स्थिति पूर्वीसारखी गरीबीची व निराश्रितपणाची नसून तो येथें राजा, न्यायाधीश, धर्मशास्त्री व धर्माध्यक्ष अशा मोठ्या पदवीप्रत पावला होता. जो मनुष्य आजपर्यंत आपल्या हातांनींच आपले कपडे शिवीत होता, तोच या पुरींत बलाढ्य राजाहूनहि पराक्रमी झाला. यापुढें त्याचें चरित्र म्हणजे सर्व **अरबी** राष्ट्राचाच इतिहास समजला पाहिजे. लोक याची आज्ञा जितकी शिरसावंद्य मानीत व याचा शब्द जितका झेलून घेत, त्याप्रमाणें आजपर्यंत रत्नजडित मुगुट धारण करणाऱ्या सार्वभौमराजांच्या आज्ञेस देखील कोणींहि मान

दिला नाहीं व त्यांचा शब्द अशाप्रकारें झेलून घेतला नाहीं. त्याची आज्ञा लोक मोठ्या प्रेमानें मानीत व त्याच्या आज्ञा लोकहिताच्याच होत्या.

---

## अध्याय पांचवा.

### कुरेश व यहूदी यांच्याशीं तंटा.

इ. स. ६२२ ता. ९ एप्रिल ते मे इ. स. ६२४ पर्यंत.

या वेळीं **मदीना**पुरींत तीन तट होते. फिरस्ते व मदतगार मिळून एक तट. हे दोघेहि **इस्लामा**चा जीव कीं प्राण. ह्या दोघांची **पैगंबरा**वरची भक्ति अत्यंत असे. फिरस्त्यांनीं आपल्या घरादाराचा, आप्तवर्गाचा धर्मासाठीं त्याग केला होता. **परमेश्वरा**ची सेवा करितां यावी म्हणून त्यांनीं हा दुःखभार सोशिला; व ते कोणत्याहि मोहाला भुलले नाहींत. त्यांच्यापैकीं पुष्कळ जणांजवळ उपजीविकेचें कांहीं एक साधन नसतां, सुरक्षितपणासाठीं ह्मणून ते या शहरीं आले होते. **मदीना** येथील भाविक लोकांनीं त्यांचा आदरसत्कार फार केला. फिरस्त्यांमध्यें जे गरीब होते त्यांना तर कित्येक तद्देशीयांनीं आपली ऐहिक संपत्ति विभागून दिली. या दोघांमध्यें परस्परांविषयीं मत्सरभाव मुळींच नव्हता. फिरस्ते लोक म्हणत, **पैगंबरा**वर आमचें प्रेम जास्त आहे, व मदतगार लोक म्हणत कीं आमचें जास्त आहे. अशी त्या दोघांची

या बाबतींत प्रतिस्पर्धा चाले. या दोन्ही वर्गांतील स्त्री-पुरुषांचा नूतन धर्माविषयीं फारच उत्साह असे, व प्रसंग पडल्यास ह्यांतील स्त्रीपुरुषें धर्मासाठीं आपले प्राण देण्यास तयार होतीं. दुसऱ्या तटांतील लोकहि **इस्लामी** होते, परंतु त्यांचा भाव इतक्या आस्थेचा नव्हता. ह्यांचा पुढाकार **अबदुल** बिन **उब्बे** याजकडे होता. ह्या सरदाराचें शहरांत बरेंच वजन होतें. **मदीनेचें** राज्य आपणास मिळावें ह्मणून यानें बराच प्रयत्न पूर्वींपासून चालविला होता. हा उद्देश सिद्धीस नेण्याकरितां **अबू सुफयान** वगैरे मंडळीस त्यानें आपल्या पक्षास बळकटी आणण्याकरितां **मक्के**हून बोलाविलें होतें. राज्याचीं सूत्रें हातीं येण्याची वेळहि आली होती, इतक्यांत **पैगंबराचें मदीनेस** येणें झालें. त्यामुळें त्याचा बेत फसला. प्रारंभीं या तटाचें बरेंच महत्व होतें. लोकांची **महमदा**कडे इतकी ओढ झाली कीं, या पक्षांतील लोकांस नामधारी तरी **इस्लामी** बनणें भाग झालें. तरी उचित वेळ आल्यास **मुसलमानां**वर उठावें, असा त्यांचा विचार सदा जागृत असे, त्यामुळें **पैगंबरास** त्यांच्या वर्तनाकडे अक्षयीं लक्ष ठेवावें लागे. त्यांच्याकडून नव्या बनविलेल्या राष्ट्रास दगा होण्याची भीति असे. तथापि हे कधींनाकधीं तरी खरेपणानें विश्वास धरतील अशी उमेद तो शेवटपर्यंत बाळगून होता. पुढें जें घडून आलें त्यावरून त्याची ही उमेद वृथा होती, असें ह्मणतां येणार नाहीं. **अबदुल** बिन **उब्बे** ह्याच्या मरणानंतर हा पक्ष अगदीं

अस्तास गेला. ह्या पक्षास **मुनाफिकीन** ह्मणजे दांभिक असें म्हणत असत.

तिसरा तट म्हटला म्हणजे **मदीनें**तील **यहूदी** लोक. ह्या तटाकडून धोका होण्याची फारच भीति होती. ह्या लोकांची व्यापाराची देवघेव **कुरेश** लोकांबरावर पुष्कळ असे; आणि नूतन धर्मास प्रतिकूल असे जे देशाचे भाग होते, त्यांत तर ह्या लोकांच्या पोटजाती पसरून गेल्या होत्या. प्रथमतः **महमदा**च्या उपदेशास हे प्रतिकूल नसत. त्यांचा समज असा झाला होता कीं, हा जरी आमचा येणारा मशिहा नाहीं, तथापि हा साधा भोळा उपदेशक आहे. **औस** व **खस्राज** ह्मणून जे लोक आमच्या आश्रयानें आहेत, यांच्याच बळावर हा सर्व प्रकारें अवलंबून आहे. **अरब** लोकांना जिंकून **यहूदा**चें राज्य स्थापन करण्यांत हा आमच्या उपयोगीं पडण्यासारखा मनुष्य आहे. या उद्देशानें **मदीने**-करांसह हे लोक **पैगंबरास** स्वागत देण्यास तयार झाले होते. कांहीं काळ त्यांनीं शांतपणाची वृत्ति धरली होती. पण हा स्वस्थपणा क्षणिक होता. **पैगंबर** आल्यावर एक महिना लोटला नाहीं तोंच त्यांच्यांत फंदफितूर करण्याची प्रवृत्ति उद्भवली आहे असें दिसूं लागलें. पुढें त्यांनीं उघडपणें फितूर मांडिला, व गुप्तपणें दगलबाजी कशी करावी याविषयीं त्यांच्यांत विचार सुरू झाला. **मदीनें**त जे निरनिराळे तट होते, त्या सर्वांची एकी करून त्यांच्यांतले सर्व तंटे नाहींसे करून

सर्वांचें संगनमत करावें या हेतूनें **महमदानें मदीनेस** आल्यावर थोडेच दिवसांनीं एक आज्ञापत्र प्रसिद्ध केलें. ह्या आज्ञापत्रांत **मुसलमानांनीं** आपसांत परस्परांशीं कसें वागावें, **मुसलमान** व **यहूदी** यांनीं परस्परांशीं कसें वर्तन ठेवावें, प्रत्येकांचे हक्क कोणते, व परस्परांचीं कर्तव्यें कोणतीं ह्याविषयीं खुलासेवार लिहिलें होतें. **महमदा**कडे लोकांचा अनावर ओढा आहे, असें पाहून **यहूदी** लोकांनीं ह्या आज्ञापत्रांतील हक्क व कर्तव्यें कबूल केलीं. ह्या आज्ञापत्रावरून **पैगंबरा**चे अंगीं चातुर्य, राज्यकार्यदक्षता, लोकसमाजाचें धुरीणत्व इत्यादि अनेक गुण वसत होते हें स्पष्टपणें दिसून येतें. ह्या आज्ञापत्राचा अंशतः भाग याप्रमाणें आहे. " दयाळू व करुणामय **परमेश्वरा**च्या नांवानें **पैगंबर महमदा**कडून जाहीर आज्ञापत्र. **कुरेश** लोक **यस्रब** येथील भक्तजन, व त्यांच्याबरावर संगनमतानें राहण्याचें ज्या ज्या निरनिराळ्या धर्मांच्या लोकांनीं पत्करिलें आहे, असे सर्व लोक मिळून एक राष्ट्र बनविलें आहे. इतर राष्ट्रांच्या लोकांबरावर लढाई करणें अथवा त्यांबरावर तह करणें तर सर्व **मुसलमानांनीं** आपलें प्रत्येकाचें ह्यांत नफानुकसान आहे, असें समजून काय करणें तें जुटीनें करावें. आपल्या स्वधर्मीयांच्या शत्रूबरावर तह करणें अगर त्यांच्यावर लढाई सुरू करणें ही गोष्ट **मुसलमान** लोकांतील एकाद्या व्यक्तीच्या अधिकारांतील नाहीं. जे **यहूदी** लोक आमच्या राज्याला चिकटून राहतील त्यांना कोणत्याहि प्रकारची इजा

अथवा त्यांचा अपमान झाला न पाहिजे. आमच्या हातून मदत मिळण्याचा व आमची कृपा संपादून घेण्याचा हक्क जितका आमच्या लोकांस आहे, तितकाच या **यहूदी** लोकांस आहे. **अफ, नज्जर, हरिस, जश्म, सलब, औस** इत्यादि **यहूदी** लोकांचे जे पोटभेद या शहरांत वस्ती करून आहेत, त्यांचें व **मुसलमान** लोकांचें मिळून एक मिश्र-राष्ट्र आम्हीं बनविलें आहे. **मुसलमान** लोकांस आपला धर्म पाळण्याची जशी सर्व प्रकारची मोकळीक आहे तशी **यहूदी** लोकांसहि आहे. तसेंच **यहूदी** लोकांच्या आश्रयानें रहाणारे जे त्यांचे दोस्त वगैरे इतर लोक आहेत त्या सर्वांच्या जीविताचें व वित्ताचें संरक्षण केलें जाईल, व त्यांना आपल्या धर्मानें रहाण्याची मोकळीक दिली जाईल. अपराधी लोकांचा शोध लावून त्यांस शासन दिलें जाईल. **मदीना**-पुरीचा बचाव करण्याचे कामीं **यहूदी** लोकांनीं **मुसलमानांशीं** जूट केली पाहिजे. ज्या लोकांना हें आज्ञापत्र कबूल आहे, त्यांस **मदीना** पुरीचा मध्यभाग म्हणजे पवित्र भूमी-प्रमाणें मान्य असला पाहिजे. अवल दरजाचे **मुसलमान** व अवल दरजाचे **यहूदी** यांस जे जे हक्क दिले आहेत ते ते हक्क त्यांच्या आश्रितांसहि दिले आहेत. अपराध, अन्यायाचें काम अथवा अव्यवस्थेचें कृत्य केलें असेल त्याचा तिटकारा सर्व **मुसलमान** लोकांनीं केला पाहिजे. एखादा अपराधी मनुष्य जरी तो जवळचा आप्त असला, तरी त्याचा पक्ष घेऊन

कोणींहि त्यास आश्रय देऊं नये. यापुढें आपसांत जे जे तंटे होतील त्यांचा निर्णय **परमेश्वराचा पैगंबर** याच्याकडे सोंपविला पाहिजे." या आज्ञापत्रांत निरनिराळ्या टोळींतल्या लोकांनीं परस्परांचा जर खून केला तर त्याबद्दल किती किती दंड द्यावा याविषयीं सांगितलें आहे. तसेंच **मुसलमान** लोकांचे परस्परांतील दळणवळणाच्या संबंधानें कोणकोणते नियम पाळावे ते नियमहि सांगितले आहेत. राज्याची अंतस्थ व्यवस्था कशी ठेवायाची याविषयींहि यांत सांगितलें आहे.

**अरबी** लोकांत आतांपर्यंत अशी चाल होती कीं, एखाद्या मनुष्याला कोणीं इजा केली अथवा त्याच्याशीं कोणीं अन्यायानें वर्तन केलें, तर अशा मनुष्याचा सूड घेणें अथवा त्यास शासन करणें, हीं कामें, तो आपल्या आंगीं जोर असल्यास आपण स्वतः करी, अथवा आपल्या आंगीं बळ नसलें तर आपल्या आप्तवर्गाकडून करवी. ही जी बेबंदशाई आजपर्यंत जारी होती, तिचा अंत **महमदानें** या आज्ञापत्रानें केला; व इजा करणाऱ्यांस शासन देण्याचें काम **महमदानें** आपल्याकडे घेतलें. तो **परमेश्वराचा पैगंबर** होता ह्मणून व लोकांमध्यें व आपल्यामध्यें या आज्ञापत्रानें त्यानें कौल करून घेतला होता ह्मणून राष्ट्राचें न्यायाधीशत्व **महमदाकडेच** आलें होतें.

**बनी नधीर, बनी कुरीझा** व **बनी केनुका** ह्या नांवांच्या **यहूदी** लोकांच्या तीन टोळ्या **मदीनापुरीच्या** आसमंतांत

राहत होत्या. ह्या आज्ञापत्रांत प्रथमतः त्यांचा समावेश केला नव्हता, परंतु पुढें त्यांनींहि ह्या आज्ञापत्रांतील कौलाचा आभारपूर्वक स्वीकार केला. **यहूदी** लोकांस जरी इतक्या सवलती दिल्या होत्या, तथापि त्यांच्या जीवास संतोष नसे. त्यांच्या अंतःकरणांत जी द्वेषबुद्धि जडली होती ती कांहीं केल्यानें जाईना. **अरबस्थानांत यहूदी** धर्माची स्थापना व त्याचा प्रसार करण्याचे कामीं **महमद** आपल्या कामीं येईल, असा जो त्यांचा समज होता, तो व्यर्थ आहे असें पाहून ते निराश झाले. **तलमुदां**[1]तील दंतकथेपेक्षां **महमदा**चा धर्म सोपा आहे असें पाहून त्यांच्या मनांत **महमदा**विषयीं त्वेष उत्पन्न झाला, आणि त्यांनीं त्याचा पक्ष सोडिला; व ते शत्रूच्या पक्षास जाऊन मिळाले. ते आणखी असेंहि ह्मणूं लागले कीं **इस्लामा**पेक्षां आह्मांस मूर्तिपूजा अधिक पसंत. त्यांनीं **महमदा**ची कुटाळी करणें मांडिलें. त्यांनीं तोंडें वेडीं-वांकडीं करून **कुराना**तील वचनांचा विपरीत उच्चार करावा, त्यांतील प्रार्थना त्यांनीं भलत्या रीतीनें ह्मणाव्या, ह्मणजे त्या शब्दापासून कांहीं अर्थबोध होऊं नये. **यहूदी** लोकांच्या बायकांनीं व पुरुषांनीं भलतीं भलतीं कवनें करून **मुसलमानी** बायकांची टवाळी करावी. हे अपराध कमी दरजाचे झाले. ज्या संस्थानाचें प्रजापण त्यांनीं स्वीकारिलें होतें, त्या संस्थानाच्या शत्रूकडे त्यांनीं आपले दूत पाठविले.

---

१ **तलमूद** या नांवाचा यहूदी लोकांचा एक धर्मग्रंथ आहे.

ज्या **कुरेश** लोकांनीं **महमदा**चा प्राण घेऊं अशी शपथ घेतली होती त्यांस **यहूदी** लोकांच्या मार्फतीनें व **अबदुल** बिन **उब्बे** याच्या द्वारें **मुसलमान** लोकांचें किती बळआहे हें चांगलें समजून गेलें होतें. त्यांस असेंहि पक्कें ठाऊक झालें होतें कीं ज्या **यहूदी** लोकांनीं **महमदा**चा कौल कबूल केला आहे, तो क्षणभरासाठीं केलेला आहे; आम्ही **मदीने**च्या समीप गेलों कीं ते आम्हांस येऊन मिळतील.

**पैगंबर** यानें **मदीने**चा बचाव करण्याची तयारी केली, व भाविक लोकांच्या राहण्याच्या व कामाच्या संबंधानें व्यवस्था लावली. **मदीना**पुरींत फितुरी माजल्यामुळें जर आंतून बंड झालें, व बाहेरून शत्रूनें चाल केली, तर शिष्य-मंडळीचा कहर उडेल ह्मणून शहरांत जे दांडगे लोक आहेत त्यांची व्यवस्था पहिल्यानें लावावी असा **महमदा**चा विचार झाला. **पैगंबरा**कडे उपदेश करण्याचेंच काम नसून आपल्या आश्रित लोकांचें संरक्षण करण्याचेंहि त्याच्यावर येऊन पडलें होतें. तो संस्थानाचा अधिपति होता व सैन्यांचा नायक असल्यामुळें **मदीना**पुरी किल्ल्यासारखी बंदोबस्तानें ठेवणें त्यास भाग पडलें; ह्मणून शहरांतल्याशहरांत दगलबाजी चालली असतां तिजकडे कानाडोळा त्याच्यानें करवेना. जे लोक शत्रूला सामील झाले असते व ज्यांनीं शत्रूच्या सैन्यास मदत केली असती त्यांचें पारिपत्य करणें **महमदास** भाग पडलें. जे राजद्रोही लोक शत्रूस बातमी

नेऊन पोंचवीत व शहरांतल्या शहरांत लोकांना फितूर देत त्यांचा बंदोबस्त करणें संस्थानाच्या सुरक्षितपणास अवश्य होतें; ह्मणून असे राजद्रोही सहाएक असामी निवडून काढून त्यांस त्यानें फांशीं दिलें.

थोड्याच दिवसांनीं आपले दोस्त घेऊन **मक्केकर** लोक **मदीने**च्या आसमंतांत लुटालूट करीत आले. **मुसलमान** लोकांचीं जीं फळझाडें होतीं त्यांचा त्यांनीं नाश केला. त्यांचे कळप लुटून नेले. **अबूजहल**च्या हाताखालीं एक हजार शस्त्रधारी माणसें शत्रूंनीं ठेविलीं होतीं. हीं माणसें घेऊन तो **मदीने**वर चाल करून आला; त्याचा उद्देश असा होता कीं लढाईची सामग्री घेऊन जे तांडे येत होते त्यांचा बचाव करावा, व **मदीना**पुरींतील **इस्लामी** लोकांचें पारिपत्य करावें, या हेतूनें तो **बदर**ची खिंड हस्तगत करून घेण्यासाठीं कूच करीत चालला. शत्रु कोणीकडे जात आहे याची बातमी **मुसलमानांस** वेळेवर मिळून ३०० शें शिष्यमंडळ लढाईस तयार झालें. आणि **बदर**ची खिंड शत्रूच्या ( मूर्तिपूजकांच्या ) हस्तगत होण्यापूर्वीं ह्या ३०० लोकांनीं ती ताबडतोब जाऊन घेतली. काफराचें सैन्य खिंडीमध्यें मोठ्या डौलानें चाल करून येत आहे, असें पाहून **महमदानें** हात जोडून आकाशाकडे वर तोंड फिरवून **परमेश्वरा**ची प्रार्थना केली कीं, "हे परमेश्वरा, तूं मदत देण्याचें जें अभिवचन दिलें आहेस तें विसरूं नको. हे प्रभू, जर ह्या

माझ्या लहानशा टोळीचा नाश झाला तर तुझी विमल भक्ति करणारे या भूलोकावर कोणी राहणार नाहींत."

**कुरेशां**पैकीं तिघे असामी दोन सैन्यांच्या मध्यें जें मैदान होतें त्याजवर येऊन उभे राहिले, व ह्मणाले **मुसलमानां**तील तिघां असामींनीं येऊन आम्हांतील एकेकाबरोबर लढाई करावी. **मुसलमानां**तील **हमजा, अली** व **ओबयदा** या तिघांनीं विडा उचलला, व युद्ध करून हे तिघेजण विजय पावते झाले. असें झाल्यावर लढाई सर्व जमलेल्या सैन्यांत पसरली; व **मुसलमानां**स जय मिळतो किंवा नाहीं याची कांहीं वेळ वानवाच होती. **महमदा**नें आपल्या लोकांस धीर देऊन वीरश्रीवर आणलें, आणि **मुसलमानां**चा जय झाला. लढाईचा दिवस हिंवाळ्याचा असून ते दिवशीं तुफान झालें. गारगार अंगास टोंचणारा वारा खिंडींतून जोरानें वाहत होता. वारा व रेती हीं **परमेश्वरा**च्या शत्रूवर उठलीं आहेत व हींच **परमेश्वरा**कडून आह्मांस मदत मिळाली आहे. वाऱ्यावर बसून विश्वासघातकी मूर्तिपूजकांस हांकलून देण्यास देवदूत आले आहेत, असें **महमद** व त्याच्या शिष्यमंडळीस दिसलें. शत्रूच्या सैन्याची दाणादाण झाली. **मक्के**करांकडील पुष्कळ लोक रणावर पडले, व बाकीच्यांस मागें परतावें लागलें. त्यांच्या सरदारांपैकीं पुष्कळ सरदार मारले गेले. त्यांत **अबूजहाल** हाहि मरण पावला. **मुसलमानां**च्या हातीं पुष्कळ लोक सांपडले; परंतु त्यांपैकीं दोघांसच फांशीं दिलें. हे दोघे

नूतन धर्माचा अघोर रीतीनें छळ करीत असत. **अरबस्थानां**तील रिवाजाप्रमाणें बाकीच्या कैद्यांची हालअपेष्टाच करावयाची; परंतु त्यांच्यावर दया करून त्यांच्या जीवाची हालअपेष्टा केली नाहीं. **पैगंबरानें** उलटी सक्त ताकीद दिली कीं, ह्या दुर्दैवी लोकांवर दया करावी. ज्या **मुसलमानां**च्या स्वाधीन लढाईंत सांपडलेले लोक दिले होते, त्यांनीं **पैगंबराच्या** सांगण्याप्रमाणें शब्दशः वर्तन ठेविलें. ह्या लोकांनीं आपल्या अन्नाच्या वांट्यांतून त्यांस खावयास द्यावें. खारका खाऊन ते आपली स्वतांची उपजीविका करीत व भाकरी कैद्यांस देत. **मदीनें**त ज्या लोकांचीं घरें होतीं त्यांत **मदीने**कर लोकांनीं कैद्यांचा सत्कारपूर्वक पाहुणचार केला. पुढें कांहीं दिवस लोटल्यावर ह्या कैद्यांपैकीं एक जण असें बोलला कीं, **मदीने**करांचें देव कल्याण करो. हे लोक स्वतः पायीं चालतात पण आम्हांस बसावयास घोडे देतात. आम्हांस गव्हांची पोळी खावयास देतात पण आपण स्वतः खारका खाऊन उपजीविका करितात.

लढाईमध्यें मिळालेल्या लुटीची वांटणी कशी करावी, ह्याबद्दल या वेळीं शिपाई लोकांत तंटा उपस्थित झाला. तंटा फार माजूं नये ह्मणून **महमदानें** त्या वेळीं असें ठरविलें कीं, लुटीचे सारखे हिस्से करून सर्वांनीं सारखे वांटून घ्यावे. बहुकमी लोकांत या बाबतींत अनावर तंटे माजतील व त्यापासून फार नुकसान होईल, ह्मणून **पैगंबरानें** निराळा कानून पुढें फर्माविला. या कानूनानें असें ठरलें कीं, लढाईंत मिळालेल्या

लुटीची वांटणी जो राज्यसत्ता चालवील त्याचे इच्छेवर अवलंबून असावी. लुटीचा पांचवा हिस्सा मात्र अनाथ व गरीब यांच्या साह्याकडे लावण्यासाठीं संस्थानच्या खजिन्यांत भरला जावा.

**महमदानें** आजन्म शस्त्र कधीं हातीं धरलें नव्हतें. मानव प्राण्यास झालेलें दुःख पाहून त्याच्या जीवास अत्यंत दुःख होई, व करुणेनें त्याचें अंतःकरण भरून जाई. त्याचीं स्वतांचीं लेंकरें मरण पावलीं त्या समयीं तो अतोनात रडला. हें त्याचें करणें **अरबी** रिवाजाविरुद्ध होतें. त्याचा स्वभाव इतका मायाळू असे कीं, त्याचे शत्रु त्याला बायक्या ह्मणून ह्मणत. अशा मनुष्याला आतां शस्त्र धरावें लागलें; व शत्रूंनीं आपल्यावर चाल केली ह्मणून त्यांच्यावर उलट चाल करणें भाग पडलें **अरबी** लोक रात्रीं किंवा पहांटेस एकदम नकळत हल्ला करीत, ह्मणून शत्रु आसपास आला आहे काय व रात्रीं किंवा पहांटेस हल्ला होणार आहे काय ह्याची बातमी ठेवण्यासाठीं तो निरनिराळे वेळीं चौकस टोळ्या चोहों दिशांस पाठवीत असे.

**बदर**च्या लढाईत जो जय मिळाला त्यावरून त्याच्या शिष्यांच्या मनावर मोठा उत्तम ग्रह झाला. जें वादळ व तुफान लढाई चालत असतां सुरू झालें होतें, तें देवानें पाठविलें; व त्यानेंच शत्रूंचा पराजय झाला अशी त्यांच्या मनाची पक्की खात्री होऊन गेली. देवदूत येऊन आपणास लढाईत मदत. करितात असें त्यांस निश्चयानें वाटूं लागलें.

---

# अध्याय सहावा.

## अरब व यहूदी यांच्याशीं तंटा.

**महमद बदरच्या** लढाईंत गुंतला असतां त्याची **रुकया** नांवाची मुलगी मरण पावली. इचें लग्न **उस्मान**बरोबर झालें होतें. **कुरेशी** लोकांचे शिपाई **बदरहून** पराजय पावल्यावर आपापल्या घरीं जाऊन पोंचले नाहींत तोंच **अबुसुफयान** हा २०० शें घोडेस्वार घेऊन **महमद** व त्याचे शिष्य यांना चांगली शिक्षा दिल्यावांचून परत येणारच नाहीं, असा विडा उचलून **मक्केहून** निघाला. **मदीनेच्या** प्रदेशांत टेहळून तो बेसावध असलेल्या **मुसलमानांवर** एकदम चाल करून आला. त्यानें पुष्कळ लोकांस क्रूरतेनें मारिलें. त्यांचीं खजुरींचीं वनें उजाड करून टाकिलीं. **अरबांचा** खजुरीवर बराच उदरनिर्वाह चालतो. घोड्यांस चारा देण्यासाठीं **मक्केकरांनीं** सविक धान्याच्या थैल्या भरून घेतल्या होत्या. इकडे **मदीनेकर मुसलमान मक्केकरांचा** सूड घेण्यासाठीं व त्यांना चांगला चोप देण्यासाठीं **मदीनेहून** निघाले. हे गांवाबाहेर निघतात तोंच **मक्केकरांनीं** माघारी पाठ फिरविली. घोडे पळवितांना अडचण होऊं नये ह्मणून **मक्केकरांनीं** सविक धान्याचे थैले खालीं फेंकून दिले; यावरूनच **मुसलमान** या लढाईस **गजवत उस सविक** ह्मणजे सविक धान्याचा संग्राम असें थट्टेनें ह्मणतात. ह्या संग्रामाच्या

समयीं **पैगंबरा**च्या संबंधानें एक ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट घडून आली. ती अशी. **मदीनेकरां**च्या तळापासून बऱ्याच अंतरावर **महमद** एका झाडाच्या तळीं निजला होता. कांहीं खडबड झाल्यामुळें तो जागा होऊन पहातो तों **दरथुर** नांवाचा शत्रूकडील बलाढ्य योद्धा तरवार घेऊन छातीवर बसलेला आहे. **दरथुर महमदा**स बोलतो—**महमदा,** आतां तुझा बचाव करणारा कोण आहे? **पैगंबरा**नें उत्तर दिलें कीं **परमेश्वर** माझा बचाव करील. हें ऐकतांच तो रानटी **बदवी** एकदम भयभीत झाला व त्याच्या हातांतून तरवार सुटली, ती तत्क्षणींच **महमदा**नें हातीं घेऊन इकडे तिकडे फिरवून तो त्या योद्ध्यास उलट विचारता झाला, " अरे **दरथुरा,** आतां तुझें संरक्षण कोण करील?" **दरथुर** उत्तर देतो, 'गड्या, कोणी नाहीं रे.' **महमद** ह्मणाला, 'बरें तर दयाशील कसें असावें, हें मजकडून शिकून घे.' असें ह्मणून **महमदा**नें ती तरवार त्याच्या स्वाधीन केली. हें पाहून त्या **बदवी** माणसाचें हृदय मोहून गेलें, व पुढें तो **पैगंबरा**चा मोठा निष्ठावंत शिष्य झाला. ही गोष्ट इ० स० ६२४ च्या एप्रिल महिन्याच्या १ ल्या तारखेस घडून आली. असो. मूर्तिपूजक व **मुसलमान** यांच्यांत जी ही चकमक झाली ती ह्या लढाईचा शेवट नव्हे; पुढें होणाऱ्या, मोठ्या युद्धाचा हा प्रवेश होय.

**महमदा**चा सूड उगविण्याविषयीं मूर्तिपूजक टपून होते.

**मुसलमानां**वर पुनः स्वारी करण्याच्या उद्देशानें त्यांनीं मोठी तयारी एक वर्षभर चालविली होती. त्यांनीं आपले हेर पाठवून **तिहेमा** व **किनेना** या दोन जातींचें सहाय मिळविलें. सर्व मिळून उत्तम शस्त्रधारी असे तीन हजार लढाऊ शिपाई तयार झाले. त्यांपैकीं ७०० योद्धयांचे अंगांत चिलखतें होतीं. **मुसलमानां**चा मोड करावा व आपला सूड उगवावा एवढाच काय तो या सैन्याचा उद्देश होता. निर्दय **अबूसुफयान** याच्या अमलाखालीं एवढें सैन्य होतें; तें जिकडे जाई तिकडे त्यांला मार्ग मोकळाच होता. त्यामुळें **मदीना**पुरीच्या ईशान्य कोनावर जें उंच व सुरक्षित स्थळ होतें तें त्यांना प्रयास न पडतां घेतां आलें. ही जागा व **मदीना**पुरी ह्यांच्या दरम्यान काय तें **ओहद**चें टेंकाड व एक खिंड अशीं दोनच स्थळें होतीं. या सुरक्षित व उंच जागेवरून ते खालीं उतरून मजेनें **मदीनेकरां**चीं शेतें व त्यांचे फळमळे निर्धास्तपणें नासून टाकीत. आपल्या शिष्यांचा आवेश पाहून व त्यांच्या मालमत्तेचा विध्वंस झाल्यामुळें त्यांस जो त्वेष आला होता तो पाहून सैन्य घेऊन लढाईस जाणें **महमदास** उचित गोष्ट आहे असें वाटलें. ह्मणून तो एक सहस्त्र सैन्य घेऊन **मदीना**पुरीच्या बाहेर पडला. **यहूदी** लोकांच्या वैरामुळें **मुनाफिकीन** ( ह्मणजे दांभिक ) शिष्यांचा नायक ३०० शें सैन्यासह फितूर झाला. त्यामुळें **महमदा**जवळ ७०० शें सैन्य राहिलें. एवढ्या सैन्यांत घोडे ह्मणाल तर दोनच. पण लहानशी ही शूर टोळी एकसारखी

पुढेंच कूच करीत चालली. मुकाट्या मुकाट्या हें सैन्य फळ-मळ्यांच्या बाहेर पडून **ओहद** टेंकाडावर चढून गेलें. नंतर खालीं उतरून खिंडींतच त्यांनीं रात्रीची वेळ काढिली. सकाळ झाल्यावर शस्त्रास्त्रासकट सज्ज होऊन त्यांनीं परमेश्वराची प्रार्थना केली; व नंतर मैदानावर उतरले. ज्या टेंकाडावर **मक्केकरांचें** सैन्य होतें, त्याचा तळचा भाग **महमदानें** लागलाच हस्तगत करून घेतला. सैन्याची छावणी होती त्याच्या पिछाडीस उंचशा जागेवर कांहीं तिरंदाज ठेवून त्यांस अशी आज्ञा दिली कीं तुह्मी शत्रूंच्या घोडदळावर सतत तीरांचा मार ठेवा, व **मुसलमानी** सैन्याची पिछाडी रक्षण करा. तीरांचा मारा चालला असतां प्रतिकूळ गोष्टी कितीहि घडून आल्या तरी त्यांस भिऊं नका. इकडे मूर्तिपूजकांनीं आपल्या देवतांच्या प्रतिमा सैन्यांच्या मध्यंतरीं ठेवून सरदारांच्या बायकांना संग्रामगीत खंजिरीच्या तालावर गावयास लाविलें. आपलें सैन्य अधिक आहे तर आपणांस विजयच मिळेल असा मनाचा निश्चय करून ते लोक सैन्य घेऊन मैदानावर उतरले. **कुरेशी** लोकांचा पहिला जबरदस्त हल्ला **मुसलमानांचा** कप्तान **हमजा** यानें मोठ्या आवेशानें मागें हटविला. शत्रूच्या सैन्यांत दाणादाण झालेली पाहून **हमजा** त्यांच्यावर तुटून पडला; व चोहों बाजूंस सपासप तरवार चालवून त्यानें शत्रूच्या सैन्यांत प्रळय करून सोडला. आतां **मुसलमानांचा**

विजय होणार; परंतु तिरंदाज लोकांना **पैगंबराच्या** आज्ञेचा विसर पडला, व शत्रूनें पळ काढलेला पाहून लूट मिळविण्याच्या उद्देशानें ते तिरंदाज लोक आपली नेमलेली जागा सोडून इकडे तिकडे निघून गेले. तिरंदाजांची चूक शत्रूकडील **खलीद** बिन **वलीद** याच्या एकदम लक्षांत आली. त्यानें आपलें घोडदळ सावरून घेतलें व वळसा घेऊन तो **मुसलमानांच्या** पिछाडीवर तुटून पडला. अघाडीच्या बाजूनें शत्रूचें पायदळहि लढण्यास सज्ज झालें. मग दुतर्फा **मुसलमानांच्या** सैन्यावर मार सुरू झाला. तेव्हां एवढ्या प्रचंड सैन्याबराबर पुनः संग्राम करणें त्यांस भाग पडलें. त्यांचे शूर शूर सरदार रणांगणीं लढतां लढतां मृत्युमुखीं पडले. **हमजा** मरण पावला. **अली, उमर,** व **अबूबकर** यांस फार जखमा लागल्या. मूर्तिपूजकांचा सर्व मार **महमदावर** होता. त्याची व त्याच्या सैन्याची तुटातूट झालेली होती. त्याच्याजवळ थोडेसे शिष्य राहिले होते. त्याच्या दोस्तांनीं लगेच त्याच्या भोंवतीं गरका घातला. त्याच्या डोक्यांतून रक्ताच्या धारा चालल्या होत्या, व त्यास बऱ्याच जखमाहि लागल्या होत्या. त्याचे डोक्यांतून रक्त वहात होतें तें बंद करावें, ह्मणून त्याचे मित्रांपैकीं एकानें उपाय चालविले. **महमदानें** त्याला आशीर्वाद दिला. आतां बचाव होणें अशक्य अशी निराशा होऊन **अली** संग्रामाच्या मध्यभागीं जिवावर उदार होऊन लढत होता. ज्या ठिकाणीं शत्रूचा मार चालणार नाहीं, असें एक सुरक्षित स्थळ टेंकाडावर आहे

असें जाणून लढत लढत **अली** व त्याचे दोस्त तिकडे जाऊन पोंचले. आपण सुरक्षित आहों खरें पण आपला गुरु मात्र रणांत पडला ह्मणून ते दुःखसागरांत बुडून गेले. रणाच्या दुसऱ्या बाजूकडे आपले लोक लढत आहेत असें इतक्यांत त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां लागलीच त्यांनीं मूर्तिपूजकांच्या समुदायांत उडी घातली, व ज्या ठिकाणीं थोडे **मुसलमान** लोक **पैगंबरा**चा बचाव करण्यासाठीं मोठ्या आवेशानें लढत होते त्या ठिकाणावर ते कसेबसे गेले. नंतर त्याला घेऊन ते मोठ्या प्रयासानें **ओहद** पर्वताच्या शिखरावर एका सपाट्यांत गेले. तेथें पोंचल्यावर त्यांनीं दम घेतला. डोंगरावर एका खडकाच्या कपारींत पाणी होतें तेथें जाऊन **अलीनें** आपल्या ढालींत थोडें पाणी आणिलें. त्या पाण्यानें त्यानें **पैगंबराचें** तोंड धुतलें; व त्याच्या जखमाहि धुतल्या. नंतर **अलीनें** दोनप्रहरची प्रार्थना केली.

**कुरेशी** लोकांच्या बाजूचे लोकहि अगदीं दमून गेले होते. त्यामुळें त्यांस मिळालेल्या जयाचा उपयोग करून घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं उरलें नव्हतें. **मदीनेवर** तावडतोब चाल करणें अगर शत्रूंस **ओहद** पर्वतावरून हांकलून देणें त्यांच्यानें झालें नाहीं. **मदीने**च्या मुलखांतून ते परतले. परत जातांना शत्रूकडील लोक जे मरून रणांगणीं पडले होते, त्यांच्या प्रेतांच्या हालअपेष्टा मात्र त्यांनीं फार केल्या. प्रेतें छिन्नभिन्न केलीं. **अबूसुफयान** याची बायको,

**उतबा**ची मुलगी व इतर **कुरेशी** बायका यांनीं तर क्रूर-पणाची हद्द करून सोडिली. **हमजा**चें प्रेत पडलें होतें, त्याच्या अंगांतून त्याचें काळीज काढून घेऊन त्यांनीं तें खाल्लें. इतर प्रेतांचे नाक कान तोडून गळ्यांत व हातांत अलंकार ह्मणून त्यांनीं भूषणें घातलीं.

हें अघोर कृत्य पाहून **मुसलमानां**स फारच चीड आली. **महमदा**ला सुद्धां इतका त्वेष आला कीं, **कुरेशी** लोकांचीं प्रेतें आपणहि अशींच छिन्नभिन्न करावीं असें त्याच्या मनांत आलें. असें करण्याची त्यानें प्रथमतः आज्ञा फिरविली होती; परंतु पुढें त्यानें हा हुकूम रद्द केला. कारण लागलेंच त्याच्या लक्षांत आलें कीं आपणावर कोणीं दुष्टाई केल्यास ती शांतपणें सहन करणें यांतच खरोखर आपलें कल्याण आहे. **मदीने**स परत आल्यावर **पैगंबरा**नें एक लहानशी टोळी शत्रु परत जात असतां त्यांचा पाठलाग करण्यास पाठविली. असें करण्यांत **महमदा**चा असा उद्देश होता कीं जरी **मुसलमानां**चा पराजय झाला होता, तरी त्यामुळें त्यांचा धीर खचला नव्हता, व मूर्तिपूजकांनीं पुनरपि चाल केल्यास त्यांस चांगला चोप देण्याची ताकद आमच्यांत अजून राहिली आहे असें शत्रूस समजावें. पाठलाग झाला आहे असें **अबूसुफयान** यास कळतांच तो त्वरेनें **मक्के**स चालता झाला. वाटेंत दोन **मदीनेकर** त्याला भेटले. त्यांचा त्यानें जीव घेतला. **मक्के**स पोंचल्यावर **पैगंबरा**स त्यानें असा

निरोप पाठविला कीं, तुला व तुझ्या लोकांना निर्मूळ करण्यास मी पुनः आपले लोक घेऊन येतों. **पैगंबरा**नेंहि उत्तर पाठविलें कीं, "परमेश्वर आमचा पाठिंबा पुरा आहे. तो आमचा उत्तम त्राता आहे."

या अपजयाचा परिणाम लगेच अनुभवास येऊं लागला. **मदीने**च्या आसपासचा मुलूख रानटी उडाण-टप्पू लोकांनीं लुटला. हें पाहून **महमदा**नें खबरदारी घेऊन चोहों बाजूंस बंदोबस्ताच्या तजविजी केल्या, परंतु ह्या प्रतिकूळ जातींच्या लोकांनीं **इस्लामी** धर्माच्या उपदेशकांस आह्मी तुमच्या धर्माचा स्वीकार करितों; तुह्मी आमच्यांत या व आह्मांस उपदेश करा अशी भुलथाप देऊन ते **इस्लामी** उपदेशकांस घेऊन गेले, व त्यांस त्यांनीं ठार मारून टाकिलें. **बनी अमीर** व **बनी सुलेमा** या दोन जातींच्या मुलखांतून **वीर मऊना** नांवाचा एक ओढा वाहतो, तेथें विश्वासघात करून ७० **इस्लामी** धर्मोपदेशकांचा या दुष्ट लोकांनीं जीव घेतला. ही गोष्ट **बनी सुलेमा** यांच्या सहयानें झाली. या उपदेशकांपैकींच दोघेजण निसटून गेले. त्यांच्यांपैकीं एकजण **मदीने**कडे चालला होता. वाटेंत त्यास **बनी अमीर** जातीचीं दोन निःशस्त्र माणसें भेटलीं. हीं माणसें शत्रूच्या पक्षाकडील आहेत, असें या उपदेशकास वाटून त्यानें त्यांचा प्राण घेतला. ह्या दोघांस **महमदा**चें अभयपत्र मिळालें होतें, व त्याच्याच बोलावण्यावरून ते **मदीने**कडे चालले होते. त्यांच्या मरणाची

बातमी **महमदास** जेव्हां समजून आली, तेव्हां त्याला अत्यंत दुःख झालें; व तो ह्मणाला ह्यांत गैरसमजूत तर खरीच, पण आपल्या पक्षाकडून अपराध झाला आहे; त्याकरितां जे दोन असामी मरण पावले आहेत, त्यांच्या आप्तांची झालेल्या नुकसानीबद्दल भरपायी केली पाहिजे. ही दियत जमा करण्याच्या बुद्धीनें **महमदानें** सर्व लोकांवर वर्गणी बसविली व अशी आज्ञा फिरविली कीं ज्या ज्या लोकांनीं माझा कौल कबूल केला आहे, त्या त्या लोकांनीं आपापल्या वांट्याची वर्गणी द्यावी. **बनी नधीर, बनी कुरीझा** ह्या व इतर दुसऱ्या **यहूदी** लोकांच्या जातींकडून वर्गणी येणें ती **मुसलमानांच्या** वांट्यांस आलेल्या वर्गणीइतकी होती, व ती देणें त्यांचें कर्तव्य होतें. थोडासा शिष्यांचा समुदाय आपल्या बराबर घेऊन **बनी नधीर** यांच्याकडून वर्गणी मागण्याकरितां ह्मणून **महमद** स्वतः त्यांच्याकडे गेला. त्यांनीं वरकांतीं वर्गणी देण्याचें कबूल करून **महमदास** थोडे दिवस वाट पहाण्यास सांगितलें. एके प्रसंगीं **महमद** त्यांच्याशीं बोलत होता, त्या वेळीं तो भिंतीशीं टेंकून बसला होता. आपल्याला ठार करण्याचें या लोकांच्या मनांत आहे असा संशय घेण्यासारखें त्यांचें कांहीं वर्तन **महमदाच्या** दृष्टीस पडलें. तेव्हां त्यांचा मतलब आपणास समजला आहे, असें त्यांस कळूं न देतां तो मोठ्या युक्तीनें तेथून निघून गेला. त्यानें आपले कांहीं शिष्य त्या ठिकाणीं ठेविले व आपण कोठें जातों हें कोणास

न कळवितां एकटाच उठून चालता झाला. यावरून **यहूदी** लोकांचा असा समज झाला कीं, **महमद** फार दूर गेला नाहीं; पण लवकरच परत येण्याच्या उद्देशानें तो गेला आहे. आपला विचार काय आहे हें **महमदा**स समजलें आहे, ही गोष्ट जर **यहूदी** लोकांच्या ध्यानांत आली असती तर ते एकदम बिथरून गेले असते, व त्यांनीं कदाचित् तत्क्षणींच **महंमदा**चा जीव घेतला असता.

**यहूदी** लोकांनीं **महमदा**चा इतका द्वेष करण्याचीं कारणें बहुत आहेत; व याविषयीं मागें सांगितलेंच आहे. **मदीना-पुरीं**त **महमद** आल्या दिवसापासून त्यांनीं त्यास त्रास देण्याचें आरंभिलें. त्याच्या लोकांत दुफळी, तंटे उपस्थित केले. त्याची व त्याच्या शिष्यमंडळीची निर्भर्त्सना केली. **कुराना**ंतील शब्दांचा व वाक्यांचा वेडावांकडा उच्चार करून त्यांचा भलताच अर्थ करण्याचा प्रयत्न त्यांनीं चालविला. **पैगंबरा**नें जें संस्थान फार मेहनतीनें उभारलें होतें, त्याजला या लोकांपासून धक्का मिळण्याचें फारच भय होतें. कारण त्यांच्यांत जशी एकी असे तशी एकी **मुसलमान** लोकांत नव्हती. त्यांच्यांत शहाणपण व हुशारी जास्त; त्यांची व **मुनाफिकीन** ( खोटे इस्लामी ) यांची एकी इत्यादि गोष्टींमुळें त्यांचें प्रावल्य फार होतें. कमी सुधारलेल्या व रानटी लोकांत कवन रचणाऱ्याचा फारच बडेजाव असतो; ह्मणून **यहूदी** कवन रचणाऱ्यांचें **मदीने-करां**त बरेंच महत्व होतें. याचा सदुपयोग न होतां दुरुपयोग

मात्र झाला. त्यामुळें **मदीने**करांचा परस्परांमध्यें द्वेषभाव मात्र वाढला; व **महमदा**विरुद्ध फितुरी माजली. **बदर**च्या पराभवामुळें **मक्के**करांस तर वाईट वाटलेंच; परंतु ज्या **यहूदी** लोकांनीं **महमदा**चा कौल कबूल केला होता त्यांसहि दुःख झालें, ही आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट नाहीं काय? **नधीर** जातीच्या **यहूदी** लोकांपैकीं कोणी **काब** बिन **आश्रफ** नांवाच्या नामांकित मनुष्यानें मूर्तिपूजकांचा या लढाईंत विनाश झालेला पाहून आपल्या मनास फार दुःख झालें आहे असें चार लोकांत जाहीर केलें; व तो पुढें **मक्के**कडे सरसावला. तेथें जाऊन त्यानें तेथील नाउमेद झालेल्या लोकांना फार आश्वासन व धीर दिला. त्यानें **पैगंबर** व त्याचे शिष्य यांजवर निंदेचे पोवाडे रचले व लढाईंत मेलेल्या **मक्केकरां**च्या संबंधीं शोककवनें केलीं, त्यामुळें **कुरेशी** लोकांना **बदर**च्या लढाईंत पराभव झाल्याबद्दल सूड केव्हां घेऊं अशाविषयीं वेडें करून सोडलें, व पुढें **ओहद**ची लढाई यामुळेंच घडून आली. **मक्केकरांस** असें चिथावून तो **मदीनेस** आपल्या घरीं परत आला. येथें आल्यावरहि त्यानें निंदेचे पोवाडे करणें कमी केलें नाहीं. **मुसलमानां**च्या बायकांवरहि त्यानें अभद्र गाणीं रचलीं. ज्या राज्यापासून आपलें संरक्षण होणार त्याच्या मुख्याची व त्याच्या शिष्यांची त्यानें खोडी केली. याच **यहूदी** टोळींत दुसरा कोणी एक **अबुरफी सलम** या नांवाचा मनुष्य होता. तोहि **महमद** व त्याचे अनुयायी यांचा असाच द्वेष करी. **मदीने**पासून

चार पांच दिवसांच्या मजलेवर वायव्येकडे **खैबर** प्रांताच्या एका गांवीं तो रहात असे. त्यानें **सुलेम** व **घटाफन** नांवांच्या नजीकच्या **अरबी** जातींत **महमद** व त्याचे अनुयायी यांसंबंधी द्रोह उत्पन्न केला. **महमद्दानें** जें संस्थान एवढ्या प्रयासानें तयार केलें होतें, व ज्या लोकांपासून साह्य मिळालें नाहीं तरी पण ज्यांनीं तटस्थ राहून शत्रूकडे जाऊन मिळूं नये ह्मणून ज्यांना पुष्कळ सवलती दिल्या होत्या, त्यांच्याहि मनांत जेव्हां इतकी द्वेषबुद्धि आली तेव्हां ही सर्व गोष्ट पोटांत घालून सहन करणें ह्मणजे फारच कठीण काम होय. सहन केल्यानें संस्थानाचा विनाश होणार. तेव्हां अशा दुष्टांचा गुप्तपणें संहार करणें हेंच उचित होईल असें समजून **महमदानें** ह्या दोघांला राजरक्षणांतून दूर करून एकास आपल्या शिष्यांपैकीं **औस** जातीच्या मनुष्याकडून व दुसऱ्यास तसेंच आपल्या शिष्यांपैकीं **खस्रज** जातीच्या मनुष्याकडून ठार मारविलें. या संबंधानें **महमदानें** **बनी केनुका** या जातीच्या **यहूदी** लोकांसहि **मदीना**-पुरीच्या बाहेर हांकलून दिलें. त्याची हकीकत माहीत होणें अवश्य आहे; ह्मणून ती थोडक्यांत येथें सांगतों. हे लोक शेतीभाती करून आपली उपजीविका न करितां हस्तकौशल्याचीं कामें करून आपला निर्वाह चालवीत. हे बंडखोर व अनावर असत. एवढेंच नाहीं, तर यांचें नैतिक आचरण सुद्धां फार ढिलाईचें असे. फेब्रुआरी इ. स. ६२४ चे एके दिवशीं

एक तरुण मुलगी एका खेड्याहून बाजारांत दूध विकण्यासाठीं ह्मणून आली. **यहूदी** तरुणांनीं तिची फारच टवाळकी केली. रस्त्यानें एक **मुसलमान** जात होता, त्याला त्या तरुण मुलीची कींव येऊन तो तिच्या वतीनें त्या दांडग्या पोरांशीं भांडला. कज्जा व मारामारी झाली. त्यांमध्यें ज्या एका तरुणानें तिची अब्रू घेतली होती तो मारला गेला. त्यावरून जमलेल्या सर्व **यहूदी** लोकांस त्वेष येऊन त्यांनीं त्या **मुसलमानास** ठार केलें. नंतर उभय पक्षांची चांगली चकमक होऊन दोहों बाजूंकडील बरेच लोक मरण पावले. ह्याची बातमी **महमदाचे** कानीं जाऊन पडतांच तो ताबडतोब तंट्याच्या जागीं गेला, व त्यानें आपल्या शिष्यांना आवरून घेतलें; व तंटा मिटविला. पण त्यावरून हें उघड झालें कीं, या गोष्टीचा बंदोबस्त जर ताबडतोब केला नाहीं, तर **मदीना**पुरींत कोणत्या प्रसंगीं रण माजेल व किती जीवांची हानी होईल हें सांगवत नाहीं. **यहूदी** लोकांनीं तर **महमदाचा** कौल आतां उघडपणें नाकबूल केला; जर आतांच याचा कडकपणें बंदोबस्त केला नाहीं, तर शांतता व सुरक्षितपणा रहाण्याची आशाच धरणें नको; ह्मणून **महमद** हा **बनी केनूका** यांच्या महल्यांत गेला, व त्या लोकांस त्यानें निक्षून सांगितलें की, **इस्लामी** धर्माची दीक्षा घेऊन तुह्मीं आमच्या राज्याचा सर्वप्रकारें प्रजाधर्म स्वीकारणें हें तुह्मांस प्रशस्त व उचित आहे. ही शर्त तुह्मांस पटत नसल्यास **मदीना**पुरी

सोडून तुह्मीं निघून जावें. या सांगण्यास **यहूद्यांनीं** मोठें उद्दामपणाचें व राग येण्यासारखें उत्तर दिलें. तें असें कीं, " हे **महमदा**, तूं आपल्या जातीच्या **कुरेशी** लोकांवर जय मिळविलास ह्मणून फुगूं नको. ज्या लोकांना युद्ध कसें करावें हें माहीत नाहीं, अशांबराबर तो प्रसंग होता. जर आमच्यांशीं युद्धप्रसंग करावयाचा असला तर ये. आह्मी माणसें आहों; अशी तुझी बालंबाल खात्री करून देऊं." नंतर हे लोक आपल्या गढींत जाऊन राहिले; व **महमदाच्या** हुकुमास न जुमानते झाले. परंतु त्यांचें पारिपत्य करणें हें फारच इष्ट असल्यानें **मुसलमानांनीं** त्या गढीस लागलाच वेढा घातला. पंधरा दिवस लोटल्यावर ते **यहूदी** शरण आले. त्यांस चांगलें शासन द्यावें असा **महमदाचा** प्रथमतः विचार होता; परंतु पुढें त्याला दया येऊन त्यानें ह्या **बनी केनुका** जातीस हद्दपार केलें.

**बनी नधीर** लोकांजवळ वर्गणी देण्याबद्दल गोष्टी सांगत असतां आपल्याला मारण्याचा या लोकांचा बेत आहे असें पाहून तो मुकाट्यानें घराकडे एकटाच निघून गेला, असें मागेंच सांगितलें आहे. घरीं आल्यावर त्यानें त्यांस असा निरोप पाठविला कीं, **इस्लामी** धर्माची दीक्षा घेऊन तुह्मीं आमच्या राज्याचा सर्वस्वीं प्रजाधर्म स्वीकारणें, हें तुह्मांस प्रशस्त व उचित आहे. ही गोष्ट कबूल नसल्यास **मदीना**पुरी तुह्मीं सोडून जावें. **मुनाफिकीन** लोक व त्यांचा नायक

**अबदुला** बिन **उब्बे** हे आपणांस साह्य देतील ह्या भरंवशावर ह्या लोकांनींहि दांडगाईचें उत्तर पाठविलें. हें साह्य त्यांस मिळालें नाहीं; व **बनी कुरीझा** ह्यांच्याकडून वेळेवर साह्य न मिळाल्यामुळें हे लोक निराश झाले; व पंधरा दिवसांच्या वेढ्यानेंच जर्जर होऊन आह्मी तुह्मांबरावर तह करण्यास कबूल आहों, असें **महमदास** त्यांनीं सांगून पाठविलें. पहिल्या प्रमाणेंच **महमदानें** त्यांस निरोप पाठविला, व **बनी नधीर** लोकांनीं आह्मी **मदीना** प्रांत सोडून देतों असें कबूल केलें. शस्त्रास्त्राखेरीज जो तुमचा जंगम माल असेल तो तुह्मीं घेऊन जावें, असाहि परवाना **महमदानें** त्यांस दिला होता. आपलीं रहातीं घरें **मुसलमानां**च्या उपयोगास न यावीं ह्मणून शहर सोडून जाण्यापूर्वीं तीं ह्या लोकांनीं जाळून टाकिलीं.

**महमदानें** ह्या **बनी नधीर** लोकांचा जमीनजुमला व लढाईचें सामान **अन्सर** (मदतगार) लोकांच्या सल्ल्यानें **मुहाजरीन** (फिरस्ते) यांस इ. स. ६२५ जून व जुलई महिन्यांत देऊन टाकिलें. आतांपर्यंत **मुहाजरीन** लोक हे **अन्सरां**च्या साह्यावरच विशेषतः अवलंबून असत. या दोघांचें आपसांत मोठें सख्य होतें, तरी **मुहाजरीन** लोकांचा निर्वाह मोठ्या कष्टानें होत असे. ह्मणून **महमदानें** मदतगार लोकांतील चार प्रतिष्ठित लोकांस बोलावून विचारिलें कीं, **मक्केहून** जे लोक मजबरावर आले आहेत त्यांस **बनी नधीर** लोकांचा जमीन-जुमला दिल्यास तुमची कांहीं हरकत आहे काय? **मदतगार**

लोकांनीं एकच सांगितलें कीं, **यहूदी** लोकांची चीजवस्त आमचे भाऊ **मुहाजरीन** यांस द्या, व आमच्याहि द्रव्याचा कांही अंश त्यांस दिल्यास आमची मनाई नाहीं. ह्मणून **पैगंबरानें मुहाजरीन** लोकांत व दोन अति दरिद्री मदतगार लोक होते ह्यांच्यांत ह्या सर्व मालाची वांटणी केली.

**बनी नधीर** लोकांना देशाबाहेर हांकलून देणें **हेजराच्या** चौथे वर्षाच्या रबिलावर महिन्यांत झालें. उरलेल्या वर्षांत व पुढील सालच्या पहिल्या भागांत **मुसलमान** लोकांचे जे जे निरनिराळे रानोमाळ फिरणारे द्वेष्टे होते त्यांस जर्जर करण्यांत व त्यांस शासन देण्यांत दिवस गेले. **मदीने**च्या प्रांतांत लुटालूट करणाऱ्यांचेंहि पारिपत्य त्याच समयास करण्यांत आलें. दुसरीकडचे **इस्लाम**द्वेष्टे स्वस्थ बसले नव्हते. दूर दूर प्रांतांतून मूर्तिपूजक लोकांनीं आपले हेर पाठवून निरनिराळ्या जातींच्या लोकांना **मुसलमानां**चें पारिपत्य करण्यासाठीं ह्मणून उठावणी देण्याचा क्रम चालविला. **खैबरा**च्याहि पलीकडे कांहीं **बनी नधीर** जातीचे **यहूदी** वस्ती करून होते. **इस्लामा**च्या लोकांचा विनाश करण्यासाठीं ह्मणून त्यांनींहि एक कट करून कंबर बांधिली. त्यांचे प्रयत्नास यशहि आलें. दहा हजार सैन्य एकत्र गोळा होऊन **मदीने**वर स्वारी करण्यास तयार झालें. सैन्याचें आधिपत्य **अबूसुफयान** याजकडे सोंपविलें होतें. सैन्यास मध्यंतरीं कोणत्याहि प्रकारची अडचण न होतां **मदीने**च्या जवळ कांहीं मैलांवर तें येऊन थडकलें. **ओहद**च्या

बाजूनें मदीनेवर हल्ला करणें सोपें होतें, ह्मणून या सैन्यानें ओहद्च्या बाजूकडे तळ दिला. या सैन्याबरोबर टक्कर देण्यास मुसलमानांजवळ काय ते तीन हजार शिपाई. सैन्य कमी, मुनाफिकीन (दांभिक इस्लामी) यांची द्रोहबुद्धि इत्यादि अनेक प्रतिकूळ गोष्टींमुळें सामना न करितां मदीनापुरीच्या ज्या भागाचें रक्षण करणें दुरापास्त होतें, त्या बाजूकडे मोठा थोरला खंदक खणून जीं घरें किल्ल्यासारखीं मजबूत होतीं, त्यांत बायकापोरांना ठेवून मुसलमान लोक शहराबाहेर पण खंदकाच्या आंत तळ देऊन राहिले. ज्या बाजूला शत्रूचा तळ होता त्याच्या उलट दुसऱ्या बाजूचें रक्षण बनी कुरीझा करतील असा मुसलमानांचा अंदाजा होता. यांनींहि महमदाचा कौल कबूल केला होता; असें असतांहि मूर्तिपूजकांनीं या जातीचें मन कुरेशी लोकांचा पक्ष घेण्यास वळविलें. ह्या फितूराची बातमी कळतांच महमदानें सा आद बिन मुवाज व सा आद बिन उबैदा यांस बनी कुरीझांकडे पाठवून आपल्या कर्तव्यास जागें होण्याविषयीं विनंति केली. त्याचा जबाब उद्धटपणाचा व खुळेपणाचा आला. तो असा कीं "महमद कोण आहे हें आपणांस माहीत नाहीं, ज्याची आज्ञा ऐकिली पाहिजेच असा परमेश्वराचा पैगंबर कोण आहे, हें आह्मांस ठाऊक नाहीं. त्याच्या बरोबर आह्मीं कौल वगैरे कांहीं केला नाहीं." बनी कुरीझा लोकांना गुप्त वाटा वगैरेंची माहिति चांगली होती, व कोणकोणत्या ठिकाणीं शहरावर हल्ला करितां येईल, हें

जर शत्रूस यांनीं कळविलें तर आपली अवस्था ठीक नाहीं अशी **मुसलमान** लोकांस मोठी धास्ती पडली. शहरांत फितूरी लोक होते यामुळें तर ही धास्ती अधिकच वाढली. वेढा घालणारे लोकांत अशी कुरकूर झाली कीं, मैदानावर लढाई करण्यास कांहीं केल्यानें **मुसलमान** लोक पुढें येत नाहींत, व **यहूदी** वाटाड्याचा सल्ला मिळाला होता, तरी सुद्धां शहर हस्तगत करून घेतां येत नाहीं. शहरास वेढा घालून २० दिवस अगोदरच झाले. तशांत जे रानांतले रहिवासी आह्मां **कुरेशी** व **यहूदी** लोकांस साह्य देण्याचा पत्कर घेऊन जमा झाले आहेत त्यांस असें वाटत आहे कीं, लढाई लवकर संपली ह्मणजे आपणांस लूट लवकर मिळेल; ही त्यांची आशा लवकर पूर्ण होत नाहीं ह्मणून हे लोकहि त्रासून गेले आहेत. या सर्व गोष्टींमुळें खंदकास ओलांडून **मुसलमानांच्या** लहानशा टोळीवर हल्ला करावा, असा त्यांनीं बेत केला. तो सर्व फसला. **महमदाच्या** लोकांनींहि अविश्रांत श्रम करून शत्रूला हार न जाण्याचा निश्चयच केला होता. इकडे शत्रूचे घोडे एकामागून एक मरूं लागले. अन्नाचा पुरवठा कमी झाला. आपसांत दुफळी झाली. तिला उत्तेजन **महमदानेंच** दिलें. मग एके रात्रीं पर्जन्य, वारा व वादळ यांचा जोर फार झाल्यानें शत्रूकडील तंबू उडून गेले. दिवे विझून गेले.— अशा घोर प्रसंगीं **अबुसुफयान** व त्याच्या हाताखालचें सैन्य पळून गेलें. ज्या सैन्याकडून **महमद** व त्याचे शिष्य

अगदीं रसातळास जाऊन पोंचले असते तें सैन्य एकदम नाहींसें होऊन गेलें. **महमदानें** अगोदरच असें भविष्य सांगून ठेविलें होतें कीं, आज रात्रींच शत्रूच्या सैन्याचा नाश होईल. प्रातःकाळ होतो तों भविष्य खरें झालें, आणि **मुसलमान** लोक आनंदानें शहरांत परत आले. **बनी कुरीझा** लोकांनीं फितूर केला होता, तेव्हां त्यांचा बंदोबस्त झाल्यावांचून उपाय नाहीं असें **मुसलमानां**स वाटत होतें. कारण ते शहरच्या नजीकच्या भागांत रहात होते. शिवाय त्यांनीं कबूल केलेल्या कौलाच्या शर्तीहि पाळिल्या नव्हत्या. ह्मणून शहरास वेढा पडला असतां तुमचें वर्तन फितूरी कां होतें असें **मुसलमानां**कडून त्यांस विचारणें झालें. याचें उत्तर आह्मी देत नाहीं ह्मणून **कुरीझा** लोकांनीं सांगितलें. असें झाल्यावर **मुसलमान** लोकांनीं लागलाच त्यांच्या रस्त्यांस वेढा घालून त्यांस जेरीस आणलें. तेव्हां ते लोक शरण आले व ह्मणाले, आह्मांला शिक्षा देणें, ती **सा आद बिन मुवाज** ह्मणून जो **औस** जातीचा मुख्य आहे तो सांगेल तीच द्यावी ह्मणून **कुरीझा** लोकांनीं अट घातली. वेढा पडला होता त्या वेळीं ह्या सरदाराला जखमा लागल्या होत्या. ह्या क्रूर सरदारास ह्या लोकांचे फितूरी वर्तनानें अगोदर संताप आलेला होता, तेव्हां त्यानें असा निकाल केला कीं, **कुरीझा** लोकांच्या पोराबाळांनीं **मुसलमानांचे** दास बनावें, व लढाऊ माणसांस देहांत शासन

द्यावें. हा त्याचा निकाल शब्दशः अमलांत आणला गेला. सुमारें २०० अगर २५० माणसें ठार मारावीं लागलीं.

---

## अध्याय सातवा.

### महमदाची भूतदया.

सन ६२७ इसवीपासून सन ६२८ इसवीपर्यंत.

मूर्तिपूजक व **यहूदी** लोकांनीं एकत्र मिळून जो मोठा कट **मदीना** येथील या नूतन राष्ट्राचा मोड करण्याकरितां रचला होता, त्या कटाचा सर्वस्वीं विध्वंस चमत्कारिकपणें झाला. परंतु **मदीने**च्या मुलखावर आसपासच्या जंगलांत रहाणारे क्रूर व रानटी लोक हल्ले करीत, व त्या हल्ल्यांत पुष्कळ प्रसंगीं खूनहि होत. राष्ट्र जर सुरक्षितपणें राखणें होतें तर अशा लोकांचें पारिपत्य करण्यासाठीं कडक उपाय योजणें भाग होतें. ह्या मारेकऱ्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं पुष्कळ लहानमोठ्या स्वाऱ्या पाठविल्या, परंतु हे जंगली लोक **मुसलमान** जवळसे आले ह्मणजे निसटून जात. **महमदा**जवळ **बनी लिहान** लोकांनीं धर्मोपदेश करून घेण्यासाठीं त्याचे कांहीं शिष्य मागून घेतले होते. हे त्यांच्या प्रांतांत जाऊन पोंचल्यावर त्यांनीं त्या धर्मोपदेशकांना ठार मारलें, व त्यांच्याबरोबर जे दुसरे लोक गेले होते त्यांना गुलामांप्रमाणें विकून टाकिलें. **बनी लिहान**

यांस या त्यांच्या कृत्याबद्दल कोणत्याहि प्रकारचें शासन मिळालें नव्हतें. हा मोबदला देण्याची आतां वेळ आली होती. ह्मणून **महमद** स्वतः आधिपत्य घेऊन एक सैन्याची टोळी घेऊन त्यांच्यावर स्वारी करण्यास निघाला. **पैगंबर** सैन्य घेऊन जवळ येऊन पोंचला आहे असें यांस कळतांच ते डोंगरवाटांतून पळून गेले. त्यामुळें स्वारीचा उद्देश सिद्धीस न जातां **मुसलमानांस** **मदीनेंत** परत यावें लागलें. थोडे दिवस लोटले नाहींत तोंच **बनी घटाफन** नांवाच्या लोकांचा सरदार हा **मदीनेच्या** आसपासच्या भागावर एकाएकीं येऊन पडला. त्यानें उंटांचा मोठा कळप हांकलून नेला. कळपाच्या रखवाल-दारास ठार मारून त्याच्या बायकोलाहि पळवून नेलें. **मुसलमानांनीं** लागलाच त्याचा पाठलाग केला; व कांहीं उंटहि परत आणले, परंतु लुटून नेलेल्यापैकीं पुष्कळशी लूट घेऊन तो जंगलांत निसटून गेला.

ह्याच सुमारास **काथरीन** नांवाच्या मठांतील संन्याशांस व सर्व ख्रिस्ती लोकांस **पैगंबरानें** एक सनद दिली. हा मठ **सिनाई** पर्वताजवळ आहे. ह्या सनदेनें ख्रिस्ती लोकांस पुष्कळच हक्क व परवाने **पैगंबरानें** दिले, व असेंहि लिहून ठेविलें कीं, ह्या सनदेंत जे हक्क व जे परवाने दिले आहेत, त्यांचा दुरुपयोग किंवा त्यांचा भंग जर एखाद्या **मुसलमानानें** केला तर त्याजला परमेश्वराच्या लेखाचा भंग

केल्याचें व त्याची आज्ञा मोडल्याचें व त्याच्या धर्मास तुच्छ करण्याचें पाप लागेल. शत्रूपासून ख्रिस्ती लोकांचा प्रतिपाळ करण्याचा, त्यांच्या देवळांचा व त्यांच्या धर्मोपदेशकांच्या घरादारांचा बचाव करण्याचा, पतकर त्यानें स्वतः आपल्या अंगावर घेतला; व तसेंच आपल्या शिष्यांनीं करावें, ह्मणून त्यांस आज्ञा दिली. ख्रिस्ती लोकांपासून वावग्या प्रकारें कर घेण्याची त्यानें मनाई केली. **मुसलमानांनीं** **बिशप** लोकांस त्यांच्या प्रांतांतून किंवा कोणत्याहि संन्याशास त्याच्या मठांतून हांकलून देऊं नये ह्मणून आज्ञा फिरविली. ख्रिस्ती यात्रेकरूंस यात्रेच्या मार्गांत अडवून धरूं नये ह्मणून सांगितलें. **मुसलमानांचीं** देवळें किंवा त्यांचीं रहाण्याचीं घरें बांधण्यासाठीं ह्मणून ख्रिस्ती लोकांचीं देवळें पाडावयाचीं नाहींत, असा हुकूम दिला. एखाद्या ख्रिस्ती बायकोचें लग्न **मुसलमाना**-बरोबर झालें असल्यास तिचा धर्म तिनें पाळावा; त्याजबद्दल तिच्यावर कोणत्याहि प्रकारचा जाच होतां कामा नये. ख्रिस्ती लोकांस त्यांचीं देवळें अगर मठ दुरुस्त करण्यासाठीं अथवा धर्माच्या इतर बाबतींत साह्याची जरूरी असल्यास हें साह्य **मुसलमानांनीं** दिलें पाहिजे. ह्यामुळें ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यासारखें न होतां, परमेश्वर व त्याचा **पैगंबर** ह्यांनीं दिलेल्या आज्ञांचा प्रतिपाळ मात्र होतो. परकीय ख्रिस्ती लोकांशीं **मुसलमानांचा** तंटा चालला असतां **मुसलमानांमध्यें** राहणाऱ्या ख्रिस्ती लोकांचा छळ होऊं नये; जो कोणी छळ करील त्यानें

**पैगंबराचा** अपमान केल्याचा अपराध होईल, असें त्यानें जाहीर केलें.

अनावर रानटी **अरबी** लोकांवर ज्या अनेक स्वाऱ्या **मुसलमान** लोकांनीं केल्या त्यांपैकीं एका स्वारींत **सुमेमा** नांवाच्या **हनेफा** लोकांच्या सरदारास **मुसलमानांनीं** कैद करून आणिलें. **मदीनेस** आल्यावर **पैगंबराची** भूतदया पाहून त्याचें अंतःकरण फारच द्रवून गेलें, व तो **पैगंबराचा** निःसीम भक्त झाला. पुढें तो आपल्या लोकांत परत आल्यावर त्यानें **मक्केस** जाणाऱ्या मूर्तिपूजकांच्या तांड्यास अडविलें. हा तांडा **यमनाहून** अन्नसामग्री घेऊन **मक्केस** चालला होता. हा तांडा अडविल्यानें **मक्केकरांची** फारच दुर्दशा झाली. तांडा अडवून न धरितां सोडवून देण्याविषयीं **मक्केकरांनीं हनेफा** लोकांची फारच विनवणी केली. पण ती व्यर्थ गेली. शेवटीं **मक्केकर** लोक **महमदाकडे** गेले, व त्यांनीं त्यास सांगितलें कीं, तूं तरी मध्यें पडून **हनेफा** लोकांस तांडा सोडण्याविषयीं सांग. **पैगंबरास** त्यांची दया आली, व त्यानें **सुमेमास** विनंति केली कीं, **मक्केकरांस** जें लागेल तें घेऊं दे. तांडा अडवूं नको. **पैगंबराच्या** शब्दास मान देऊन **सुमेमानें** तांडा **मक्केला** जाऊं दिला.

**महमदाच्या** भूतदयेचीं अशीं असंख्य उदाहरणें देतां येतील. पुढें दिलेलीं उदाहरणें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत. **हुडीबा** येथें **मक्केकर** व **मदीनेकर** यांचा तह झाल्यावर त्याची आवडती मुलगी **मक्का** सोडून निघून चालली होती. ती गरोदर होती. ती

उंटावर बसून निघाली होती. ती जेव्हां **हब्रार** नांवाच्या **कुरेश** मनुष्याच्या दृष्टीस पडली, तेव्हां त्यानें आपल्या भाल्याचें टोंक तिच्या आंगांत खुपसलें, व ती त्यामुळें खालीं जमिनीवर पडली, व शेवटीं त्या दुखापतीमुळें ती मरण पावली. पुढें जेव्हां **महमदानें मक्का** सर केली, तेव्हां ह्या खुनी मनुष्याला हद्दपार करण्याची शिक्षा ठरविली. अशा शिक्षेचा परिणाम असा होतो कीं, अशा मनुष्यास कोणीहि मनुष्यानें मारल्या-बद्दल तो मारणारा कोणत्याहि शिक्षेस पात्र होत नाहीं. **हब्रार** बरेच दिवस लपून राहिला होता. शेवटीं तो **पैगंबरा**-पुढें उभा राहिला, आणि मजवर दया कर असें त्या दुःखी बापास ह्मणाला. त्याच्या हातून नुकसान तर फार झालें होतें, व अपराधहि फार भयंकर होता, परंतु हें नुकसान **महमदाचें** स्वतःचें होतें. **हब्रार** याला झालेला पश्चात्ताप मनापासून आहे व त्यानें **इस्लाम** धर्माचा अंगीकार मना-पासून केलेला आहे असें पाहून कोणत्याहि प्रकारची अट न धरतां **पैगंबरानें** त्याला माफी दिली. तसेंच एका **यहूदी** बाईनें **खैबर** मुकामीं अन्नांत विष घालून **महमदाचा** प्राण घेण्याचा एकदां यत्न केला होता. तिला **महमदानें** माफी दिली. **अबूजहल**चा मुलगा **पैगंबराचा** हाडवैरी होता तरी ह्यासहि **महमदानें** अट न ठेवितां माफी दिली.

**बदवी** जातीचे ख्रिस्ती लोक **दुमात उज्जंडल** प्रांताच्या आसपास वस्ती करून राहिले होते. ते गांवोगांवची लुटालूट

चालवीत असतां **मदीने**च्या मुलखांत लूट करण्यास आले. ही बातमी **महमदास** समजली. त्यानें त्यांच्यावर स्वारी पाठविली. स्वारीचा उद्देश असा होता कीं, त्यांनीं आपला लुटारूपणाचा धंदा सोडून द्यावा, व **इस्लामी** धर्माची दीक्षा घ्यावी. स्वारीचें सैन्य ज्या कप्तानाच्या ( नायकाच्या ) स्वाधीन केलें होतें, त्यास **महमदानें** असा हुकूम दिला होता कीं " कसाहि प्रसंग आला तरी कपट अथवा विश्वासघात करूं नकोस; व लेंकरांचा जीव घेऊं नकोस. "

लुटारू लोकांवर व निरनिराळ्या जातींतील वैऱ्यांवर **पैगंबरानें** ज्या ज्या प्रसंगीं स्वाऱ्या पाठविल्या त्या सर्व प्रसंगीं त्याची अशी सक्त ताकीद असे कीं दुर्बळांवर हात टाकूं नका. **बायझेंशियम** येथील लोकांवर स्वारी पाठवितांना ज्या सैन्याची रवानगी त्यानें केली त्या सैन्यास त्यानें असें सांगितलें कीं आपल्याला इजा अगर दुखापत झाली असेल तर त्याचा मोजबा देतांना घरांतल्या घरांत राहणाऱ्या निरुपद्रवी लोकांस छळूं नका. अबलांवर हात टाकूं नका. स्तनपान करीत असलेल्या लेंकरांस अथवा बिछान्यावर पडलेल्या लोकांस इजा करूं नका. जे रहिवासी तुमच्या स्वारीच्या आड आले नाहींत त्यांचीं घरें कदापि पाडूं नका. त्यांच्या उपजीविकेच्या साधनांची अथवा त्यांच्या फळफळावळीच्या झाडांची नासाडी करूं नका. त्यांच्या ताडवृक्षांस हात लावूं नका.

**शबान** महिन्यांत ह्मणजे इ. स. ६२७ च्या नोवेंबर डिसेंबर महिन्यांत **बनी मुस्तालिक्** यांच्यावर **महमदानें** एक स्वारी केली. हे लोक इतके दिवसपावेतों **मुसलमानांशीं** दोस्तीनें वागत असत, परंतु अलीकडे त्यांनीं दोस्ती सोडून दिली होती, व ते वैर करूं लागले होते. असें करण्यास त्यांचा सरदार **हरिस** याजकडून त्यांस उठावणी मिळाली होती. वैर करूं लागल्यापासून **मदीने**च्या आसपासच्या प्रांतावर त्यांनीं धाड घालावी व माल लुटून न्यावा. ह्या स्वारींत **पैगंबरास** सर्वस्वीं जय मिळाला. शत्रूकडील पुष्कळ लोकांस कैद केलें. ह्या कैद्यांत **जुवेरिया** नांवाची एक फारच सुंदर अशी **हरिस** सरदाराची कन्या होती. तिला एका **मुसलमानानें** धरून कैद केलें होतें. त्याजबरोबर तिनें कांहीं पैसा भरून आपली सुटका करून घेण्याचा करार केला होता. **महमदा**जवळ तिनें ही रकम मागितली. त्यास तिची दया येऊन त्यानें ती मागितलेली रकम तिला दिली. ही दया **महमदानें** आपल्यावर केली, व त्यामुळेंच कैदेंतून आपली सुटका झाली, असें तिला वाटून कृतज्ञ बुद्धीनें ती त्याला ह्मणाली कीं, तूं मला वर. **महमदानें** तें तिचें ह्मणणें मान्य केलें व त्यानें तिजबरोबर लग्न लावलें. **महमदानें** आपली सोयरीक **बनी मुस्तालिक** लोकांबरोबर केली ह्मणून इतरांस असें वाटूं लागलें कीं, आपणहि या लोकांशीं स्नेहानें वागावें; ह्मणून ज्या **मुसलमानांनीं बनी मुस्तालिक** लोकांपैकीं

कांहीं लोक कैद केले होते, त्यांनीं आपापल्या कैद्यांस बंदींतून सोडविलें. या प्रकारें १०० कुटुंबांस स्वातंत्र्य मिळालें.

**महमदाला मक्कापुरी** सोडून सहा वर्षें होऊन गेलीं. तो व त्याचे शिष्य हे **मक्केला** जाण्यासाठीं फार उतावीळ झालेले होते. **पैगंबराचें** वचन श्रवण करण्याकरितां लोकांचे थवेचे थवे **अरबस्थानांतून** चोहों दिशांकडून येत व आपल्या घरगुती गोष्टींत सल्ला त्यास विचारीत. एवढा जरी लौकिक त्याचा झाला होता, तथापि आपल्या जन्मभूमीस पुनः आपण जावें ह्मणून त्याची व त्याच्या शिष्यांची मनीषा कमी झाली नव्हती. त्यांना आपल्या घरादाराचा त्याग करून **मदीनेंत** वस्ती करून राहणें भाग पडलें होतें. **मक्का** व **मदीना** या दोन्ही शहरांतील लोकांचें प्राचीन काळापासून मोठें वैर होतें. आणि ते **मदीनेस** जाऊन राहिल्यापासून **मक्केकरांच्या** भीतीमुळें तिकडे जाण्याची त्यांस मनाईच होती. **काआबा** मंदिराकडे त्यांचें चित्त सर्वोपरी गुंतून गेलें होतें. त्याची आठवण झाली, ह्मणजे त्यांस आपल्या बालपणाची आठवण होई. त्या शहराच्या इतिहासांत ज्या अनेक गोष्टी घडून आल्या त्यांची आठवण त्यांला होई. सहा वर्षें लोटून गेलीं, पण त्यांस या मंदिराचें दर्शन अथवा तेथील यात्रा झाली नाहीं. फार पुरातन काळापासून हें मंदिर पवित्र मानलेलें होतें. त्या मंदिरावर मालकी सर्व **अरबांची** होती. **कुरेशी** लोकांकडे त्याच्या बंदोबस्ताचें काम असे.

पूजा अर्चा करण्याच्याच इराद्यानें शत्रु जरी आला तरी त्याला मनाई करण्याचा अधिकार कोणत्याहि देशी कानुनांत अथवा रिवाजांत सांगितला नव्हता. लढाई करण्याच्या उद्देशानें कोणीहि आला तरी मनाई करण्याचा अधिकार **कुरेशांस** असे वार्षिक यात्रेचा काळ जवळ येऊन ठेपला होता, ह्मणून **पैगंबरानें** असें जाहीर केलें कीं, आपण पवित्र भूमीच्या दर्शनास जाणार आहों. तेव्हां पुष्कळ लोकांनीं आह्मांस तुझ्या बरोबर यावयाचें आहे ह्मणून सांगितलें. तावडतोब यात्रेस जाण्याची तयारी झाली. मदतगार व फिरस्ते मिळून ७०० शें लोकांस घेऊन तो **मक्केस** जाण्यास निघाला. **कुरेशी** लोकांचें वैर अजून कमी झालें नव्हतें. मोठें सैन्य जमा करून बऱ्याच अंतरावर येऊन **मुसलमानांस** अडविण्याच्या हेतूनें ते तळ देऊन राहिले. परंतु थोड्याच दिवसांनीं शहराकडे ते मागें वळले, व शहरांत जाण्याचा हरएक रस्ता त्यांनीं अडवून धरिला. यात्रेस जाण्याची आह्मांस परवानगी मिळावी ह्मणून विनंति करण्यास **मक्केकरांकडे** **पैगंबरानें** आपला वकील पाठविला. **मक्केकरांनीं** वकीलास चांगला चोप दिला, आणि आह्मी **पैगंबराच्या** शिष्यांस मंदिरांत प्रवेश करूं देणार नाहीं, असा त्यांनीं पण केला. **मक्केकरांची** एक टोळी **पैगंबराचे** छावणीभोंवतीं टेहळण्यास गेली होती. त्यांनीं **पैगंबरावर** दगडांचा भडिमार केला, व बाणांचा वर्षाव केला. मूर्तिपूजकांच्या मनांत फेर

पडत नाहीं; व ते आपला केलेला पण सोडीत नाहींत असें पाहून त्यानें त्यांचे जवळ तहाचें बोलणें सुरू केलें. पाहिजेल त्या अटींवर मी तुम्हांबरोबर तह करण्यास कबूल आहें असें त्यानें **मक्केकरांस** सांगून पाठविलें. शेवटीं मोठ्या कष्टानें तहाच्या अटी ठरल्या. **मदीनेकर** व **मक्केकर** यांच्यांत तह झाला. तहाच्या अटी येणेंप्रमाणें ठरल्या. सर्व प्रकारचें परस्परांचें वितुष्ट १० वर्षें तहकूब व्हावें. पाळकाच्या अगर जमातीच्या सरदाराच्या परवानगीशिवाय जर एकादा **कुरेशी** मनुष्य **पैगंबराकडे** आला तर त्याला पुनः **कुरेशी** लोकांकडे परत करावें. **मुसलमानांतून** जर एकादा मनुष्य **मक्केकरांकडे** गेला तर त्याला **मुसलमानांकडे** परत करूं नये. एकाद्या जातीच्या लोकांची **कुरेशी** लोकांबराबर अथवा **मुसलमानांबराबर** दोस्ती करण्याची इच्छा असल्यास त्यास कोणंत्याहि प्रकारचा अडथळा न व्हावा. या प्रसंगीं पुढें न सरसावतां **मुसलमानांनीं** आलेल्या मार्गानें परत वळावें. पुढल्या वर्षीं **मुसलमानांस** यात्रेकरितां **मक्केस** येण्याची परवानगी आहे, व त्या वेळीं आपली प्रवासाची व शस्त्रांची सामग्री बरोबर घेऊन तीन दिवस त्यांनीं तेथें मुकाम करावा.

हा तह करून घेण्यामध्यें **महमदाचा** नेमस्तपणा व उदात्तपणा जो दिसून आला त्यामुळें त्याच्या शिष्यांमध्यें जे तापट स्वभावाचे होते त्यांना थोडासा असंतोष झाला. कारण **कुरेशी** लोकांनीं जो जुलूम मांडिला होता, व ज्या दुखापती

केल्या होत्या त्यांचा चांगला मोजबा त्यांस द्यावा, असें ह्या तापट लोकांचे मनांत होतें. ह्या तहानें तसें करण्यास त्यांस संधी मिळाली नाहीं. तहाच्या तिसऱ्या शर्तीप्रमाणें ठरलें होतें कीं, **कुरेशी** लोकांपैकीं जे आपल्या पाळकाच्या अथवा जमातीच्या सरदाराच्या परवानगीशिवाय **मुसलमानां**स जाऊन मिळतील अशा सर्व लोकांस **कुरेशी** लोकांकडे परत पाठवावें. ह्या शर्तीप्रमाणें **कुरेशी** लोकांनीं मागणी केली. ती **महमदानें** तावडतोब मान्य केली व **मुसलमानांच्या** कुरकुरीस न जुमानतां **कुरेशी** लोकांनीं ज्यांना मागितलें होतें त्यांस त्यांच्याकडे परत केलें.

**महमदाची** अशी उदात्त इच्छा होती कीं, सर्व मानवजातीनें आपल्या धर्माचा अंगीकार करावा. तेव्हां तो हेतु पूर्ण करण्यास्तव त्यानें आसपासच्या राजांकडे आपले वकील पाठविले. वकीलांच्या हातीं असा निरोप पाठविला कीं, तुह्मीं व तुमच्या प्रजांनीं मी जो तुह्मांस जीवनाचा प्याला देतों, त्याचें प्राशन करावें. ह्या राजांमध्यें दोन सुप्रसिद्ध राजे होते. एका राजाचें नांव **हिराक्लियस,** व दुसऱ्याचें नांव **खिसरव परविझ**. **हिराक्लियस** हा **रोमी** लोकांचा **बादशहा,** आणि **खिसरव** हा **इराणचा केस्रा** ह्मणजे बादशहा. **खिसरव** ह्मणाला कीं **मकेहून** पळपट्यासारखा निघालेला हा **महमद** त्यानें मज राजाधिराजास बराबरीच्या नात्यानें पत्र लिहावें हें त्याचें धाडसाचें कृत्य आहे. ह्मणून

त्यानें संतापानें तें पत्र फाडून टाकलें. **महमदा**कडून आलेल्या वकीलाचा मानभंग करून त्यास आपल्या समोरून हांकलून लाविलें. आपल्या वकीलाची अशी निर्भर्त्सना केली याची बातमी **पैगंबरास** जेव्हां कळली तेव्हां त्यानें शांतपणें असे उद्गार काढिले कीं, **केस्रा**च्या बादशाहीचे असे तुकडे होतील. हें त्याचें भविष्य खरें झालें. ही गोष्ट इतिहासांत सुप्रसिद्ध आहे. **हिराक्लिअस** बादशहानें वकीलाचा आदर करून त्याज-बरोबर सुसमाचाराचा निरोप पाठविला. **सुर्या**प्रांत सोडण्या-पूर्वीं **महमदा**विषयीं बादशहानें विचारपूस करून घेतली. ही माहिती मिळविण्यासाठीं **गाझा** मुकामीं कांहीं अरबी व्यापारी आले होते, त्यांस त्यानें बोलावणें पाठविलें. त्यांत **अबूसु-फयान** नांवाचा **पैगंबरा**चा मोठा कट्टा द्वेष्टा होता. **रोमी** बादशहानें **अबूसुफयानास महमदा**संबंधी पुष्कळच प्रश्न विचारले. **अबूसुफयान** यानें जीं उत्तरें दिलीं तीं बहुतेक **हब-साण**च्या राजास **जाफरानें** उत्तरें दिलीं त्याप्रमाणेंच होतीं. **अबूसुफयानानें** असें सांगितलें कीं **महमद** आह्मांस असें शिकवितो कीं, "पूर्वापार चालत आलेल्या मूर्तिपूजेचा त्याग करून एका **परमेश्वरा**ची भक्ति करा. दानधर्म करा, शुद्धाचरण ठेवा, सत्याचा प्रतिपाळ करा, दुराचरण व शिंदळकी सोडून द्या, व अमंगलापासून दूर रहा." बादशहानें पुसलें, त्याचे शिष्य वाढत आहेत अथवा कमी होत आहेत. **अबूसुफयान** यानें उत्तर दिलें कीं, त्याचा शिष्यसमुदाय सतत वाढत आहे,

व जे त्याचे शिष्य एकदां झाले ते पुनरपि कधींहि त्याला सोडीत नाहींत. पुढें थोड्याच दिवसांनीं **पैगंबरानें** आपला एक वकील **घासंडी** कुलाच्या राजाकडे पाठविला. **दमास्कस** शहराच्या आसपास **बस्रा** ह्मणून जो प्रांत आहे त्याचा हा राजा. **हिराक्लिअस** बादशहाचा हा सामंत होता. पाठविलेल्या वकीलाचा आदरपूर्वक सत्कार न करितां त्याला ह्याच कुळांतील एका सरदारानें व ख्रिस्ती लोकांच्या एका अमीरानें ठार मारून टाकलें. हे ख्रिस्ती लोकहि **हिराक्लिअस** बादशहाच्या राज्यांतले होते. याचप्रमाणें **मिसर** देशाचा सुभेदार, **हबसाणा**चा राजा, व **यमना**चा **मालिक सरदार** यांजकडे **इस्लामा**चा स्वीकार करा ह्मणून पाचारण करण्याच्या हेतूनें **पैगंबरानें** आपले वकील पाठविले.

**मिसर** देशाच्या सुभेदाराचा असा जबाब आला कीं कोणीएक पैगंबर या पृथ्वीवर येणार आहे, पण मला वाटतें तो **सुर्या**प्रांतांत जाहीर होईल. आपल्याकडून आलेल्या वकीलाचें मी आदरपूर्वक आगतस्वागत करून त्याबरोबर आपल्याकरितां नजराणे पाठविले आहेत. त्याचा आपण स्वीकार करावा. **पैगंबरानें** या नजरांचा स्वीकार केला.

**हबसाण** देशाच्या राजानेंहि सलोख्याचीं पत्रें पाठविलीं; व मला आपला धर्म मान्य आहे असेंहि त्यांत लिहिलें होतें.

**यमना**च्या सुभेदाराकडून मात्र उद्धटपणाचें पत्र आलें,

त्याबद्दल **पैगंबरानें** त्याचा निषेध करून त्याला शाप दिला. थोड्याच दिवसांनीं पुढें हा सुभेदार मरण पावला.

आपल्या शत्रूचें वाईट करण्याचें सामर्थ्य अंगीं असून जो पुरुष तसें करीत नाहीं, त्यास आपण उदार मनाचा पुरुष आहे असें ह्मणतों. या प्रमाणानें पाहतां **पैगंबरा**चे अंगीं दोन भिन्न प्रकारचे गुण वसत होते. आपल्या स्वतःच्या शत्रूवर दया करावयाची, पण आपण उभारलेल्या राष्ट्राच्या शत्रूला योग्य शासन दिल्यावांचून राहायाचें नाहीं. या दोन भिन्न भिन्न गुणांचें संमेलन **पैगंबरा**चे अंगीं उत्तम प्रकारें झालेलें होतें. अशा प्रकारचा स्वभाव विरळाच दृष्टीस पडतो.

---

## अध्याय आठवा.

### धर्मप्रसार.

इ. स. ६२५ ते इ. स. ६२९ पर्यंत.

**यहूदी** लोकांचा यापूर्वी जरी पुष्कळसा मोड झाला होता, तथापि अद्याप त्यांची हिंमत खचली नव्हती; व त्यांच्यापासून धोका होण्याची भीति नाहींशी झाली नव्हती. **मुसलमानां**चा नाश होऊन जावा ह्मणून त्यांचा उद्योग चाललेलाच होता. **मदीना**पुरीच्या ईशान्येस चार दिवसांचे मजलेवर ह्या लोकांची आणखी एक वसाहत होती. तींत जिकडे तिकडे किल्लेच किल्ले पसरले होते. त्यांत मुख्य जो किल्ला होता तो

**अल्कमूस** या नांवानें प्रसिद्ध होता. हा ज्या टेंकाडावर होता, त्यावर जाण्याचे मार्ग दुर्गम होते. व त्यामुळें तो चढायास कठीण जाई. ह्या किल्ल्यांच्या रांगेस **खैबर** ह्मणून ह्मणत असत. **खैबर** या शब्दाचा अर्थ किल्ल्याची जागा असा होतो. **खैबर** येथें **बनी नधीर** व **बनी कुरीझा** या दोन जातींचे बरेच लोक आश्रयासाठीं ह्मणून येऊन राहिले होते. **महमद्** व त्याचे अनुयायी यांचा **खैबर** येथील **यहूदी** लोक फार द्वेष करीत. वर सांगितलेल्या जातींचे लोक तेथें आल्यापासून तर **खैबर**वाल्यांची द्वेषबुद्धि फारच वाढली होती. **बनी घटाफन** जातींतील **बद्वी** लोकांचें व इतर रानटी लोकांचें साह्य घेऊन **खैबर** येथील **यहूदी** लोकांनीं **मुसलमान** लोकांच्या विरुद्ध पुनः मोठा कट उभारण्याचा एकसारखा यत्न चालविला होता. **मुसलमानांस** हें पक्कें माहीत होतें कीं हे लोक आपलें फार नुकसान करितील. ह्मणून हा नवा कट जमून येणार नाहीं अशी तजवीज तावडतोब योजण्यांत त्यांचें चित्त लागून गेलें होतें. इ. स. ६२९ च्या मोहरम महिन्यांत, **मुसलमानां**नीं १४०० लोकांची टोळी **खैबरा**वर स्वारी करण्याकरितां पाठविली. ही बातमी **यहूदी** लोकांस समजल्यावर त्यांनीं आपल्या दोस्त टोळ्यांची मदत मागितली. **बनी फेजरा** हे **यहूदी** लोकांस साह्य देण्यास त्वरेनें आपल्या घरून निघाले, परंतु **मुसलमान** आपल्या पिच्छाडीवर रस्त्यांत हल्ला करितील व आपण आपल्या

मुलखांतून इकडे आल्यावर आपल्या मागें गुरांवर व मेंढ्यांवर एकदम पडून आपला सत्यनाश करून टाकितील अशी धास्ती त्यांस पडली होती. त्यामुळें ते आलेल्या मार्गानें त्वरेनें परत गेले. नंतर मग लढाईचा सर्व भार **यहूदी** लोकांवरच येऊन पडला. तह करून घेण्याविषयीं **मुसलमानां**नीं त्यांच्या-बरोबर बोलणें चालविलें; व कांहीं शर्तीहि त्यांजपुढें मांडल्या. परंतु ही गोष्ट **यहूदी** लोकांस मान्य होईना, व **मुसलमानां**-पुढें त्यांच्यानें टिकाव धरवेना. जरी त्यांनीं आपल्या कडून हवी तितकी कंबर बांधली, व **मुसलमानां**चा जोर न होऊं देण्याविषयीं पराकाष्ठा केली, तथापि एकामागून एक असे बरेच किल्ले **मुसलमानां**च्या हस्तगत झाले. सरते शेवटीं **अल्कमूस** नांवाचा किल्लाहि **मुसलमानां**च्या ताब्यांत आला. हा किल्ला **मुसलमानां**च्या हातीं जाऊं नये ह्मणून **यहूदी** लोकांनीं फारच श्रम घेतले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. हा किल्ला **मुसलमानां**च्या हातीं गेलेला पाहून दुसऱ्या तटबंदी शहरांतील **यहूद्यां**ची खात्री झाली कीं, **मुसलमानां**पुढें आपला टिकाव लागणार नाहीं, व त्यांच्या बरोबर युद्ध करण्यांत अर्थ नाहीं. ह्मणून त्या लोकांनीं **पैगंबरा** जवळ क्षमा मागितली; व ती त्यांस मिळाली. तुह्मी जर चांगल्या रीतीनें वागाल तर तुमच्या जमीन जुमल्यास कोणी हात लावणार नाहीं व तुमच्या धर्माच्या आड कोणी येणार नाहीं, असें **मुसलमानां**नीं त्यांस अभिवचन दिलें. इतर

लोकांस जसे कर द्यावे लागत तसे **यहूदी** लोकांस द्यावयाचे नसत. ह्मणून **पैगंबरानें** असें ठरविलें कीं, आपल्या राज्या-पासून जें संरक्षण यांस मिळतें, त्याच्याबदला या लोकांनीं यापुढें आपल्या जमिनीचें अर्धें उत्पन्न सरकारांत द्यावें. जे जे किल्ले वेढे घालून लढाई करून घेण्यांत आले त्यांमध्यें सांपडलेली जंगम जिनगी सैन्यांतील शिपायांस प्रत्येकाच्या शस्त्रसामग्रीप्रमाणें वांटून दिली. पायदळास एक वांटा तर घोडेस्वारांस तीन वांटे या प्रमाणानें वांटणी केली.

हेजराच्या सातव्या वर्षाच्या शेवटीं **महमद** व त्याचे शिष्य यांनीं पवित्रभूमीची ( **मक्केची** ) यात्रा करण्याची आपली मनीषा पूर्ण करून घेतली. **महमदाचा कुरेशी** लोकांबरोबर एक तह झाला होता; त्याविषयीं मागील अध्यायांत सविस्तर हकीकत दिली आहे. त्यांत असें ठरलें होतें कीं, या सालीं **महमद** व त्याचे शिष्य यांनीं **मक्केस** यात्रेकरितां जावें. तह झाला त्या वर्षीं मात्र जाऊं नये. ह्या ठरावाप्रमाणें ही यात्रा करून घेण्याचा योग आला. इ. स. ६२९ वे वर्षीं मार्च महिन्यांत **पैगंबर** दोन हजार लोक बरोबर घेऊन **मक्केस** जाण्यास निघाला. **कुरेशी** लोकांचा विचार झाला होता कीं, आपण **मुसलमान** यात्रेकरूंशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवूं नये; ह्मणून त्यांनीं **मुसलमान मक्केस** पोंचल्यावर तीन दिवस शहर सोडून दिलें, व जवळच्या डोंगरावरून **मुसलमान** लोक कोणकोणते व कसकसे विधि करितात हें पहात

बसले. हे विधि तीन दिवसपर्यंत एकसारखे चालले होते. सर्व विधि आटपल्यावर कराराप्रमाणें चौथे दिवशीं **मुसलमान** लोक **मक्का** सोडून निघाले. **मक्केस** जाऊन आपल्या बाळपणचीं घरेंदारें केव्हां दृष्टीस पडतील याविषयीं जी मोठी उत्सुकता झाली होती, व जी गोष्ट त्यांस जागृतींत व स्वप्नांत रात्रंदिवस दिसत होती, ती गोष्ट अशी उत्तम प्रकारें परिपूर्ण झाली हें पाहून **मुसलमानां**स फारच आनंद झाला. हें काम इतक्या सुरळीतपणें झाल्यामुळें **कुरेशी** लोकांच्या मनावर मोठा उत्तम ग्रह झाला, व त्यांच्यांतील बरेच ठळक ठळक लोकांनीं **इस्लाम** धर्माची दीक्षा घेतली. कराराच्या शर्तींप्रमाणें अक्षरशः वागल्यामुळें **इस्लामी** लोकांविषयीं त्यांच्या वैऱ्यांच्या मनावर सुद्धां फारच चांगला ग्रह झाला. ह्या वैऱ्यांमध्यें बरेच लोक प्रतिष्ठित व घरंदाज होते. पूर्वीं त्यांनीं **पैगंबरा**चा फारच छळ केला होता. त्यांनीं त्याच्या बरोबर युद्ध तर केलें होतेंच, त्याची नाना तऱ्हेनें निंदा तर केली होतीच, परंतु त्याच लोकांनीं जेव्हां त्याचें उदार अंतःकरण, व त्याची क्षमाशीलता, व आपलें स्वतःचें नुकसान कोणीं केलें तर तें निमूटपणें सहन करण्याची बुद्धि, इत्यादि गुण पाहिले तेव्हां हेच वैरी आश्चर्यभरित झाले, व त्यांनीं त्याच्या धर्माचा स्वीकार केला.

**ग्रीक** बादशहाच्या साम्राज्यांतील एका संस्थानिकानें **पैगंबरानें** पाठविलेल्या वकीलाचा खून केल्यामुळें त्याला दंड

करणें भाग झालें होतें, ह्मणून तीन हजार लोकांची एक मोठी फौज तयार करून त्या संस्थानिकावर वकीलाच्या खुनाबद्दल नुकसान भरून घेण्यासाठीं **पैगंबरानें** पाठविली. **ग्रीक** बादशहाच्या सुभेदारांनीं संस्थानिकानें केलेल्या गोष्टीचा निषेध न करितां झालें तें योग्य झालें असें ह्मणून **पैगंबरा**च्या सैन्याशीं संग्राम करण्याचा प्रसंग आणिला. **सूर्या** प्रांतांतील **बल्क** शहरानजीक **मूता** नांवाचें एक गांव आहे, त्या गांवाजवळ तुंबळ रणसंग्राम झाला. बादशहाच्या सुभेदारांनीं आपल्या सर्व फौजा एकत्र करून **मुसलमानां**च्या सैन्याबरोबर सामना केला. त्यांत बादशहाच्या फौजेचा मोड झाला. परंतु शत्रूकडे सैन्य फार अधिक आहे, असें पाहून **मुसलमान** लोक **मदीने**कडे परत चालते झाले.

ह्याच सुमारास **मक्केकर कुरेशी** व त्यांचे दोस्त **बनी बक्र** टोळींतील लोक यांनीं **बनी कुझा** नांवाच्या टोळींतील लोकांवर हल्ला केला. **बनी कुझा** ही टोळी **मुसलमानां**चा स्नेह धरून वागत असे, व ह्मणूनच **मुसलमान** लोक त्यांच्यावर प्रसंग पडल्यास त्यांनां मदत करीत, व त्यांचा बचाव करीत. **कुरेशी** व त्यांची दोस्त टोळी ह्यांचें हें करणें **हुडीबा** येथें जो तह झाला होता, त्या तहाच्या शर्तींच्या विरुद्ध होतें. **कुझा** टोळींतल्या बऱ्याच लोकांची **कुरेशी** लोकांनीं कत्तल उडविली, व बाकीच्यांस देशोदेशीं पळवून लाविलें. **बनी कुझा** लोकांनीं

**महमदा**कडे गाऱ्हाणें आणलें; व हा जो आमच्यावर जुलूम झालेला आहे, त्याची कांहीं तरी तजवीज लावून द्या, ह्मणून विनंति केली. **मक्कापुरी** येथें ह्मणाल तर आजपर्यंत बेबंदशाईच चालली होती. खास **मक्केकरांनीं** तहाच्या शर्ती मोडून दांडगाईचें वर्तन चालविलें होतें; व त्यांच्यांतील प्रमुख मंडळींचें अंग **कुझा** लोकांची जी कत्तल झाली तींत होतें. ह्या सर्व कारणांमुळें **कुरेशी** लोकांचें पारिपत्य करण्यासाठीं ह्मणून **पैगंबर** दहा हजार सैन्य बरोबर घेऊन **मक्कापुरी**वर स्वारी घेऊन गेला. **कुरेशी** लोकांपैकीं **इक्रमा** आणि **सेफान** या दोघांनीं आपापल्या टोळ्या घेऊन **महमदा**च्या फौजेशीं सामना केला, व ह्या सामन्यांत बरेच **मुसलमान** पडले. ह्याशिवाय **पैगंबरा**च्या आड दुसरे कोणींहि आले नाहींत. शेवटीं **पैगंबरा**चा जय झाला व **मक्का**पुरींत त्यानें जयजयकार करीत प्रवेश केला.

ज्याची थोड्या दिवसांपूर्वीं अगदीं दुर्दशा झालेली होती, ज्याला आपली जन्मभूमि सोडून परदेशीं जाऊन वस्ती करणें भाग झालें होतें, ज्याचा लोकांनीं फारच छळ मांडिला होता, तोच **पैगंबर** आतां विजयी योद्धा होऊन जयजयकार करीत ह्याच **मक्का**पुरींत प्रवेश करिता झाला. ह्याच पुरींतल्या लोकांनीं **महमद** व त्याचें विश्वासू मंडळ ह्यांच्याशीं क्रूरतेनें वागून त्यांनां पुरीच्या हद्दपार केलें होतें. जो कोणी त्याचें शीर आणील त्याला बक्षीस देण्याचा जाहिरनामा लाविला

होता. तेंच शहर व त्यांतील लोक या वेळीं त्याला शरण आले. ज्या लोकांनीं त्याचा व त्याच्या शिष्यांचा क्रूर रीतीनें पूर्वीं छळ केला, ज्यांनीं सांगूं नयेत अशीं निर्दयपणाचीं कृत्यें केलीं, निरपराधी बायकापोरांना ज्यांनीं छळलें व प्रेतांस सुद्धां छिन्नविच्छिन्न करण्यास ज्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं, ते लोक आतां **पैगंबरानें** दया केली तर वांचणार अशा स्थितीस येऊन पावले, व **पैगंबर** विजयी झाला. असा विजय जरी झाला होता तथापि या विजयांत मागें जें लोकांनीं त्याचें वाईट केलें होतें, व त्याला त्रास दिला होता तें सर्व तो या प्रसंगीं विसरून गेला. ज्यांनीं त्याला इजा केली होती, त्यांस त्यानें क्षमा केली; आणि सर्व **मक्केकर** लोकांस माफी केली आहे, असें त्यानें प्रसिद्ध केलें. जें शहर त्याच्या हाडवैऱ्यांनीं भरून गेलें होतें, त्या शहरांत **महमदानें** विजयी योद्धा ह्मणून जेव्हां प्रवेश केला, तेव्हां फक्त चारच माणसांस गुन्हेगार ठरवून त्यांस देहांत शासन दिलें. त्याच्या बरोबर जी फौज आली होती, त्या फौजेंतील माणसांनीं दंगा-धोपा न करितां शहरांत प्रवेश केला. कोणाहि मनुष्याचें घर लुटलें नाहीं. कोणाहि स्त्रीवर जुलूम केला नाहीं, अगर तिची अब्रू घेतली नाहीं. परंतु ह्या स्थळीं जितक्या मूर्ति होत्या, त्यांचा मात्र नाश केला. मूर्ति फोडतांनां मूर्तिपूजक लोक जवळ उभे राहून आपल्या देवतांचा विध्वंस पहात तटस्थ उभे राहिले. **पैगंबर** पूर्वींपासून जें सांगत होता, त्याच्या

खरेपणाविषयीं मात्र त्यांच्या मनाची खात्री झाली. “ शेवटीं सत्याचा जय झाला आहे, खरोखर असत्य हें क्षणिक आहे. ” हीं वचनें पुनरपि त्यांच्या श्रवणीं आलीं. मूर्तींचा विध्वंस करितांनां **महमदाच्या** मुखांतून हीं वचनें निघत होतीं.

ह्या पुरातन काळच्या मूर्तींचा विध्वंस केल्यावर **महमदानें** जमलेल्या लोकांस एक उपदेश केला. उपदेशास प्रारंभ करितांनां त्यानें प्रथमतः असें प्रतिपादन केलें कीं, सर्व मानव प्राण्यांचे हक्क एकसारखे आहेत, व त्यांचें परस्परांमधील नातें भावाचें आहे; उपदेश करितांनां तो ह्मणाला कीं, **कुरेशी** कुळांतील लोकांनो ! मीं तुह्मांशीं कोणत्या रीतीनें वागावें, याबद्दल तुमचें कांहीं ह्मणणें आहे काय ? त्यांनीं उत्तर दिलें कीं तूं आमचा दयाळू बंधु व पुतण्या आहेस. तूं आह्मांशीं दयेनें व मायेनें वाग. असे करुणेचे शब्द कानीं पडतांच **महमदाचे** डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या; आणि तो ह्मणाला, **मिसर** देशांत **युसफ** आपल्या भावांस जसें बोलला तसा मी तुमच्याशीं तुह्मांला भाऊ समजून बोलतों. आज मी तुह्मांस दोष देत नाहीं. परमेश्वर क्षमा करील, तो अत्यंत दयाळू व मायाळू आहे.

हें बोलणें झाल्यावर ध्यानांत ठेवण्यासारखी एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. ती अशी कीं, लोकांचे थवेचे थवे आले, व त्यांनीं **महमदाच्या** धर्माची दीक्षा घेतली. **महमद सेफा** टेंकडावर बसून राहिला, आणि लोकांचे जस-

जसे थवे जमत आले, तसतशी त्यांच्या कडून पूर्वी **मदीने**-करांपासून जशी शपथ वाहून घेतली होती तशी शपथ वाहून घेतली. "आह्मीं कोणत्याहि उत्पन्न झालेल्या पदार्थांची अर्चा करणार नाहीं, आह्मीं चोरी करणार नाहीं, परस्त्री-गमन करणार नाहीं, बालहत्या करणार नाहीं, असत्याचा मुखांतून उच्चार करणार नाहीं, बायकांविषयीं अभद्र बोल-णार नाहीं." अशी शपथ या लोकांनीं त्याच्यासमोर वाहिली, व त्याचें शिष्यत्व पतकरिलें.

**महमदा**च्या हातून जें कार्य व्हावयाचें होतें, तें आतां पूर्ण झाल्यासारिखें झालें. जंगलांतील रानटी लोकांनीं **इस्लामी** धर्म स्वीकारावा ह्मणून त्यांस पाचारण करण्यासाठीं **पैगंबरानें** आपले मुख्य मुख्य शिष्य चोहोंदिशांस रवाना केले. ह्या शिष्यांस अशी सक्त ताकीद होती कीं, तुह्मीं शांतीच्या व कल्याणाच्या गोष्टी लोकांस सांगा. जर कोणी तुमच्यावरतीं बळजबरी व जुलूम केला तर मात्र तुह्मीं आत्मसंरक्षण करावें. ह्या त्याच्या आज्ञा सर्व शिष्यांनीं एकनिष्ठपणें मान्य केल्या, व आपलें वर्तन तदनुरोधानें ठेविलें. एका शिष्यानें मात्र आज्ञेचा भंग केला. **खलीद बिन वलीद** हा मनुष्य आलीकडेसच शिष्यमंडळींत येऊन मिळाला होता. तो स्वभावानें क्रूर होता. त्याच्या हातीं जें सैन्य होतें, त्यास त्यानें गैरसमजानें असा हुकूम दिला कीं, **बनी जधीमा बदवी** टोळीस तुह्मी ठार करा. ही आज्ञा त्याच्या सैन्यानें

मान्य केली, आणि या **बद्वी** लोकांची कत्तल उडविण्यास सुरवात केली. हे लोक शत्रूकडील शिपायी आहेत अशी या सरदाराची चुकीनें समजूत झाली, व त्यानें हा चुकीचा हुकूम दिला. ही गोष्ट इतर **मुसलमानां**च्या लक्षांत आली, व त्यांनीं ती कत्तल बंद करून पुढें तिचा जास्ती फैलाव होऊं दिला नाहीं. ही गोष्ट **पैगंबरा**च्या कानीं येतांच तो ह्या विनाकारण झालेल्या रक्तस्रावामुळें बहुत कष्टी झाला, व आपले हात आकाशाकडे वर करून ह्मणाला, हे प्रभू, **खलीदा**च्या हातून जी गोष्ट झाली आहे, त्याचा अपराध मजकडे नाहीं, त्याबद्दल मी निर्दोषी आहें. **बनी जधीमा** लोकांवर जो हा कहर गुदरला व त्यांचें जें नुकसान झालें, त्याची भरपायी करून देण्यासाठीं **पैगंबरानें** लागलेंच **अलीला** त्यांच्याकडे पाठविलें. अशा सलोख्याच्या गोष्टी घडवून आणण्याची **अलीला** फार आवड होती व त्या योगानें त्यानें हें काम उत्तम प्रकारें बजाविलें. **खलीदा**च्या हातून किती माणसें मेलीं व तीं कोणत्या दर्जाचीं होतीं; व मारलेल्या माणसांच्या कुटुंबांचें किती नुकसान झालें ह्या सर्व गोष्टींची **अलीनें** फार बारकाईनें चवकशी केली, आणि ज्याचें जसें नुकसान झालें होतें, त्या मानानें त्यांस पैशाची रकम जिला **दियत** ह्मणून ह्मणतात ती दिली. झालेल्या नुकसानीची भरपायी **अलीनें** आपल्या सौम्य स्वभावानें व परोपकारबुद्धीनें केल्यावर त्या कामाकरितां

आणलेला जो पैसा उरला होता तो त्यानें कत्तल झालेल्या लोकांच्या नातेवाईकांस व त्याच जातींतील इतर लोकांस वांटून दिला. याप्रमाणें **अलीनें** सर्व लोकांस संतुष्ट केलें, व सर्व लोकांकडून दुवा घेऊन तो **पैगंबरा**कडे परत आला, त्याचा त्यानें आभारपूर्वक आदरसत्कार करून त्याची फार वाखाणणी केली.

**हवाझी, थकीफ** व दुसऱ्या **बदवी** लोकांच्या फार जबरदस्त टोळ्या **मक्के**च्या हद्दीवरच्या मुलुखांतून आपले गुरांचे कळप चारीत असत. ह्यांपैकीं कांहींकांच्या ताब्यांत मोठमोठाले मजबूत किल्ले होते. **मुसलमान** लोकांचा अंमल कबूल करणें त्यांस योग्य वाटत नसे. ह्मणून त्यांनीं एक आपसांत जूट तयार केली. जुटीचा उद्देश असा होता कीं, **महमदा**वर एकदम हल्ला करून घाला घालावा; आणि हल्ला इतक्या त्वरेनें करावा कीं, सामना देऊन तो हटविण्यास **महमदास** अवकाश सांपडूंच नये. परंतु **महमदानें** ह्या सर्व गोष्टींची बातमी अगोदरपासून मिळवून ठेविली होती, व तो सावधगिरीनें रहात होता; त्यामुळें **बदवी** लोकांनीं केलेली मसलत फसली. सरतेशेवटीं **हुनेन** ह्मणून **मक्कापुरी**च्या वायव्येस पांच कोसांवर अरुंद व खोलगट अशी एक दरी आहे त्या ठिकाणीं मूर्तिपूजकांचें व **मुसलमानांचें** मोठें तुंबळ युद्ध होऊन मूर्तिपूजकांचा अगदीं मोड झाला. मग मूर्तिपूजकांनीं आपल्या फौजेच्या निरनिराळ्या टोळ्या

केल्या. त्यांपैकीं एका तुकडीनें **तायफ** शहरांत प्रवेश केला, व तेथें आपल्या जातभाईंचा आश्रय धरून ती राहिली. आठ नऊ वर्षांपूर्वी **महमदा**चा याच शहरवाल्यांनीं अपमान केला होता; तो आश्रयास आला असतां, त्याची छीथू करून त्याला शहराबाहेर हांकलून लाविलें होतें. दुसऱ्या तुकडीचे लोक **औतस** दरींत एक मजबूत किल्ला आहे त्याच्या आश्रयानें राहिले. बाकी राहिलेले **हवाझी** टोळीचे लोक व त्यांच्या कुटुंबांतील सर्व माणसें **मुसलमानां**च्या हातीं सांपडलीं. त्यांची जंगम जिनगी व गुराढोरांचे कळप हे सर्व **मुसलमानां**च्या हातीं आले. नंतर **तायफ** शहरास **महमदा**नें वेढा घातला. **तायफकर** इतर लोकांची दशा पाहून रक्तपात न करितां ते आपण होऊन स्वाधीन होतील, अशी **महमदा**ची समज होऊन पुढें थोड्याच दिवसांनीं त्यानें तो **तायफा**स घातलेला वेढा उठविला. लढाईंत धरलेले **हवाझी** लोक पळून न जावे ह्मणून ज्या सुरक्षित स्थळीं ठेविले होते त्या ठिकाणीं **महमद** वेढा उठविल्यावर परत आला. कैद झालेल्या **हवाझी** लोकांनीं आपल्या तर्फे कांहीं लोक **महमदा**कडे पाठविले. त्यांच्या मार्फत त्यांनीं अशी विनंति केली कीं, आमची व आमच्या बायकापोरांची गांठ घालून द्या. आपल्या हक्कांच्या आड कोणीं न आलें पाहिजे व ते आपले आपणांस मिळाले पाहिजेत अशी आपल्या लोकांची पक्की समजूत आहे ती सहसा घालवितां येणार नाहीं ही गोष्ट **महमद**

पक्केपणीं जाणत होता. ह्मणून त्यानें **हवाझी** लोकांस ह्मटलें कीं, माझ्या लोकांनां कांहीं मोह दाखविल्यावांचून तुमचीं बायकापोरें तुह्मांस परत देण्याची मसलत त्यांस कबूल होणार नाहीं. ह्मणून जर तुह्मीं आपल्या जिनगीवरचा हक्क सोडून द्याल, तर तुमचीं बायकापोरें आह्मी तुमच्या स्वाधीन करूं. हा विचार त्या लोकांस कबूल झाला. दुसरे दिवशीं दुपारच्या वेळीं जेव्हां **पैगंबर** मध्यान्ह समयींची प्रार्थना करीत होता, त्या वेळीं हे लोक आले, व त्यांनीं आपलें ह्मणणें त्याला पुनः निवेदन केलें. ते ह्मणाले "आह्मीं **पैगंबरास** विनंति करून ह्मणतों कीं, त्यानें **मुसलमान** लोकांजवळ आमची मध्यस्ती करावी, व **मुसलमानां**नींहि आमच्याबद्दल त्याजजवळ रदबदली करावी, आमचीं बायकापोरें आह्मांस देववावीं."त्याजवर **महमदानें** प्रतिनिधी लोकांस जबाब दिला कीं लढाईत धरलेल्या लोकांवर माझा व **अबदुल मुत्तलिबा**च्या कुळांतील लोकांचा जो कांहीं हक्क आहे तो **अबदुल मुत्तलिबा**च्या कुळांतील लोकांच्या तर्फे मीच व माझ्या संबंधींहि मीच एकदम सोडून देतों. हें पाहून त्याच्या शिष्यांनीं त्याचें अनुकरण केलें व त्यांनींहि आपापले हक्क सोडून दिले, आणि त्यामुळें सहा हजार लोकांस एका क्षणांत सुटका मिळाली. हें उदार आचरण पाहून बऱ्याच **थकीफी** लोकांच्या अंतःकरणाचा पालट झाला. व त्यांनीं मनोभावानें **महमदा**च्या धर्माची दीक्षा घेतली. **हवाझी** लोकांच्या गुराढोरांची जी पुढें

वांटणी करण्यांत आली, त्यांतील बराच वांटा नूतन **मुसळमान** झालेल्या लोकांस मिळाला. **मदीनेकरांच्या** वांट्यास तितका भाग आला नाहीं. हें पाहून **मदीनेकरांस** या कामांत **महमदाच्या** हातून पक्षपात झाला असें वाटूं लागलें. ही गोष्ट **पैगंबराच्या** कानीं आली. तेव्हां त्यानें सर्व लोकांची सभा भरविण्याचा हुकूम दिला. लोक जमा झाल्यावर त्यांस तो येणेंप्रमाणें बोलला. "अहो मदतगार लोकहो, तुह्मीं परस्परांत जें संभाषण केलें त्याची गुणगुण माझ्या कानीं आली आहे. जेव्हां मी तुह्मांमध्यें येऊन राहिलों, तेव्हां तुह्मी अज्ञानांधकारांत भटक्या मारीत होतां. परमेश्वरानें तुह्मांस आतां सुखी केलें, आणि परमेश्वरानें तुह्मांस खरा मार्ग दाखविला; तुह्मी पूर्वीं दुःखांत बुडालेले होतां. तुह्मी आपसांत तंटे करीत होतां; परमेश्वरानें तुमच्या अंतःकरणांत आतां बंधुप्रेम व ऐक्यता ओतप्रोत भरून दिलीं आहेत. मी ह्मणतों हें खरें आहे किंवा नाहीं? याबद्दल तुमचें काय ह्मणणें आहे?" लोकांनीं उत्तर दिलें "होय. तूं जें ह्मणतोस तसेंच आहे. प्रभु परमेश्वर व त्याचा **पैगंबर** ह्यांच्यांतच भूतदया व कृपा नांदत आहे." **पैगंबर** ह्मणाला, "ईश्वराचें स्मरण करून मी तुह्मांला सांगतों कीं, तुह्मीं दुसऱ्या प्रकारचा जरी जबाब दिला असता, तरी चाललें असतें; व त्याच्या खरेपणाबद्दल मीं साक्ष दिली असती. 'तूं नाकारलेला व खोटा भविष्यवादी असा ठरलेला आह्मांमध्यें आलास, तथापि

आह्मीं तुझ्यावर विश्वास ठेविला. तूं निराश्रित असा पळपट्या होऊन आह्मांमध्यें आलास, आणि आह्मीं तुला मदत दिली. तूं दरिद्री व लोकभ्रष्ट होऊन आह्मांमध्यें आलास, आणि आह्मीं तुला आश्रय दिला. तूं कष्टी व दुःखी असा आह्मांमध्यें आलास, आणि आह्मीं तुझें शांतवन केलें. असा जर तुह्मीं जबाब दिला असता तर तुमचें ह्मणणें खरें आहे, असें मींच तुह्मांस ह्मटलें असतें. अहो मदतगार लोकहो, ह्या संसारांतील गोष्टींनीं तुह्मी आपली चित्तवृत्ति कां चंचल होऊं देतां? मला घेऊन तुह्मीं आपल्या घरोघरीं परत जावें, व इतरांनीं मेंढरांचे व उंटांचे कळप घेऊन आपल्या गांवाची वाट धरावी; ही गोष्ट तुह्मांस पसंत नाहीं काय? ज्या परमेश्वराच्या हातीं माझा जीव आहे, त्याच्या नांवानें मी तुह्मांस सांगतों कीं, मी तुह्मांस कधींहि सोडून जाणार नाहीं. सर्व मानवप्राणी एका रस्त्यानें जाऊं लागले व **अनसर** (मदतगार) लोक दुसऱ्याच मार्गानें जाऊं लागले, तर मी **अनसरांस** जाऊन मिळेन, व त्यांच्याबरोबर जाईन. प्रभु परमेश्वर त्यांच्यावर कृपा करो; त्यांच्यावर, त्यांच्या मुलांवर, व त्यांच्या मुलांच्या मुलांवर परमेश्वराचा आशीर्वाद असो." **पैगंबराचें** हें बोलणें ऐकून जमलेल्या लोकांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या; नंतर ते सर्व एकदम आरडून बोलले कीं "हे परमेश्वराच्या **पैगंबरा,** जो आह्मांस वांटा मिळाला आहे, त्यांत आह्मीं पूर्णपणें तृप्त आहों." नंतर ते संतुष्ट वृत्तीनें

आपापल्या घरीं **मदीनेस** परत गेले. पुढें **पैगंबर**हि थोड्या दिवसांनीं **मदीनेस** परत गेला.

---

## अध्याय नववा.

### निरनिराळ्या लोकांकडून आलेल्या वकीलाती.

इसवी सन ६३० ते इसवी सन ६३१.

**हेजरा**च्या नवव्या वर्षीं निरनिराळ्या प्रदेशांतून **इस्लामा**च्या **पैगंबरा**चा आदर करण्याकरितां ह्मणून **मदीना** मुकामीं पुष्कळ राजेरजवाड्यांकडून वकील आले. आजपर्यंत **अरबस्थानां**त मूर्तिपूजा, निष्कारण मानवहत्या, व बेबंद स्वयंवर यांचीं जीं अभ्रें दाटशीं जमलीं होतीं, तीं आतां नाहींशीं झालीं. रानटीपणाच्या काळाचा अस्त झाला. **मक्का**पुरी **महमदा**च्या हस्तगत झाल्यामुळें **अरबस्थानां**तून मूर्तिपूजा नाहींशी झाली. आजपर्यंत **मन्ना, लाट,** व **उझा** या सुंदर देवतांची जे जे लोक पूजा करीत होते व त्यांच्या आराधने-संबंधीं व्रतवैकल्यादि गोष्टी पाळीत होते, त्यांनीं जेव्हां **मक्का मुसलमानां**च्या हस्तगत झालेली पाहिली तेव्हां त्यांचे डोळे उघडले, व त्यांस समजून आलें कीं, या मूर्तींमध्यें अर्थ नाहीं. **अरबां**च्या ज्या टोळ्या जंगलांतून वस्ती करून रहात व जंगलांतील उत्पन्नावर आपली उपजीविका चालवीत त्यांच्या मनावर **मक्का मुसलमानां**च्या ताब्यांत गेल्यामुळें फारच ध्यानांत ठेवण्यासारखा परिणाम झाला. आजपर्यंत हे जंगली

लोक **मुसलमानां**चा द्वेष करीत असत; परंतु आतां त्यांनीं आपले प्रतिनिधी **महमदा**कडे पाठवून त्यास असें कळविलें कीं आह्मी तुला शरण आलों आहों; व आह्मी तुझ्या धर्माचा अंगीकार करतों. **महमदा**नें सांगितल्यावरून **मदीने**-करांतील मुख्य मुख्य रहिवाशी व **महमदा**च्या प्रमुख अशा मित्रांनीं त्या प्रतिनिधी लोकांचा आपापल्या घरीं फारच आदरसत्कार केला. परत जातांना रस्त्याच्या वाटखर्चाकरितां ह्मणून त्यांस बरीच मोठी रकम दिली, व ज्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणें त्यांस आणखी देणग्याहि दिल्या. काफल्याचे जे जे हक्क आहेत त्यांस कोणीहि अडथळा करणार नाहीं, अशा कबुलायतीचा एक करारनामा दिला, व धर्माची दीक्षा ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून नवीनच घेतली होती, त्यांस **इस्लामा**चे कोणकोणते आचार करावे लागतात, हें शिकविण्यासाठीं व मूर्तिपूजेचा राहिलेला अंश निर्मूळ करण्यासाठीं प्रत्येक टोळी-बरोबर **इस्लामी** धर्माचा एक एक उपदेशक पाठविला.

**बायझेन्शियम** येथील लोकांच्या मनांत **अरबस्थाना**वर स्वारी करावी, अशी कल्पना आली. **पारशी** लोकांवर विजय मिळविल्यामुळें **हिराक्लिअस** बादशहास आपला मोठेपणा फार वाटत होता. **अरबस्थानां**त त्या काळीं चाललेली चळवळ त्याला माहीत झालेली होती. थोडक्याशा **अरबांनीं** आपल्या मोठ्या फौजेचा पराभव केला ही गोष्ट त्याच्या मनाला डवचत होती. **सूर्या**प्रांतांत तो असतांना **अरबस्थाना**-

वर स्वारी करण्याच्या बेतानें त्यानें आपल्या आश्रित राजांस तुंबळ सैन्य जमविण्यासाठीं हुकूम दिला होता. ह्या गोष्टीची गुणगुण **मदीनेस** येऊन पोंचली, व **मुसलमानांस** बरीच दहशत पडली. त्या वेळीं उन्हाळ्याचे दिवस होते. उष्णतेचा कडकपणा, प्रवासाच्या यातना, व शिवाय **बायझेन्शियम** बादशाहीचें प्रबळ सामर्थ्य ह्या सर्व गोष्टींचा विचार मनांत आला ह्मणजे होणाऱ्या हल्ल्याचें पारिपत्य करण्यासाठीं **मुसलमानांनीं** जी तयारी चालविली होती तिच्यांत सामील होण्यास पुष्कळांचा जीव कांचावत असे. सरतेशेवटीं एक लहानसें सैन्य तयार केलें. **पैगंबरानें** सैन्याचें आधिपत्य स्वतः हातीं घेतलें व तयार झालेलें सैन्य घेऊन तो आपल्या मुलखाच्या सरहद्दीवर गेला. उष्णता व तहान या दोन गोष्टींमुळें सैन्याची फारच हालअपेष्टा झाली. **मदीना** व **दमास्कस** या दोन शहरांच्या दरम्यान **तबूक** ह्मणून गांव आहे, त्या ठिकाणीं तो मोठ्या कष्टानें जाऊन पोंचला. तेथें त्यानें तळ दिला. तेथें त्यास असें समजलें कीं, बादशहा आपल्या राज्याच्याच भानगडींत गुंतून गेला आहे, व त्याला फुरसत मिळणें फार कठीण आहे, ह्मणून सध्यां **अरबस्थाना**वर स्वारी होण्याचा कांहीं संभव नाहीं. ही गोष्ट ऐकून **महमदास** व त्याच्या सैन्यास आश्चर्य वाटलें, व एका अर्थीं आनंदहि झाला. लागलाच तो आपल्या सैन्यानिशीं परत निघाला. **तबूक** मुकामीं २० दिवस तो तळ

देऊन राहिला होता. या गांवीं पाणी, कडबा व गवत यांचा चांगला पुरवठा त्यास मिळाला; त्यामुळें त्याच्या बरोबर आलेल्या माणसांनां व जनावरांनां चांगलेंच सुख झालें. रमझान महिन्यांत तो **मदीनेस** परत आला. **पैगंबर मदीनेस** परत आल्यावर **तायफकरां**कडून प्रतिनिधी आले. ह्याच **तायफकरांनीं** पूर्वीं **पैगंबर** जेव्हां त्यांजकडेस गेला होता, त्या वेळीं त्याची फटफजिती करून त्याला मारहाण करून आपल्या गांवांतून काढून दिलें होतें. **ओरवा** नांवाचा **तायफकरांचा** एक सरदार होता, त्याला एकदां **कुरेशी** लोकांनीं आपला प्रतिनिधी ह्मणून **महमदाकडे मक्केस** पाठविलें होतें. **मक्केस** आल्यावर **पैगंबराच्या** वचनांनीं व त्याच्या दयाशील वर्तनानें **ओरवा** याच्या मनावर फारच चांगला परिणाम झाला. पुढें त्याचें काम संपल्यावर त्यानें **इस्लामाची** दीक्षा घेतली. तूं आपल्या शहरांत परत गेलास तर तुला हट्टवादी **तायफकरां**कडून फारच त्रास सोसावा लागेल, व पुष्कळदां तुझ्या जीवावर येऊन बेतेल असें **पैगंबरानें** त्यास बजावून सांगितलें होतें. तरी ह्या गोष्टीस न जुमानतां तो **तायफ** शहरास परत गेला व आपण मूर्तिपूजेचा त्याग केला आहे, व समाधानानें **महमदाच्या** धर्माचा अंगीकार केला आहे, तर तुह्मीं माझ्याप्रमाणें करावें असा तो लोकांस उपदेश करूं लागला. ज्या दिवशीं तो **तायफास** आला त्याच दिवशीं त्यानें लोकांस हा उपदेश केला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं

पुनः त्यानें तसाच लोकांस उपदेश केला; परंतु ह्या त्याच्या उपदेशानें मूर्तींच्या भक्तांस व उपाध्यांस चीड आली, व त्यांनीं त्याला धोंडमार करून ठार मारिलें. मरणसमयीं त्यानें अशी प्रार्थना केली कीं, मीं आपल्या मालकास आपलें रक्त माझ्या लोकांच्या कल्याणासाठीं अर्पण केलें आहे, व परमेश्वराचे ठायीं माझा भाव किती दृढ आहे हें दाखविण्याचा प्रसंग परमेश्वरानें घडून आणला ह्मणून मजवर परमेश्वराचे बहुत उपकार आहेत, असें ह्मणून त्यानें आपल्या मित्रांस सांगितलें कीं, **हुनेन**च्या लढाईंत जे **मुसलमान** लोक पडले, व त्यांस ज्या स्थळीं पुरलें त्यांच्या जवळच मलाहि पुरावें; असें ह्मणून त्यानें प्राण सोडला. **ओरवा**च्या ह्या मरतेसमयींच्या शब्दांनीं त्याच्या देशबांधवांच्या मनावर जितका उत्तम परिणाम झाला तितका त्याच्या जीवंतपणींच्या उपदेशानें झाला नव्हता. ह्या भक्ताच्या मरणानें त्याचा खून करणाऱ्यांच्या अंतःकरणांत विश्वास उद्भवला. आपल्या हातून अघोर कृत्य झालें असें वाटून त्यांनां एकदम पश्चात्ताप झाला. ह्याच प्रसंगीं दुसरीं कांहीं कारणें घडून आलीं होतीं त्या सर्व गोष्टींमुळें **तायफ**करांनीं आह्मी तुला शरण आलों, असें कळविण्याकरितां आपले प्रतिनिधी **महमदा**कडे पाठविले. "आह्मांस आमच्या अपराधांची क्षमा करा, आणि **इस्लाम** धर्माची दीक्षा घेण्याची परवानगी द्या," ह्या गोष्टी सांगण्यासाठींच वर सांगितलेले प्रतिनिधी आले होते. आमच्या मूर्तींचा मात्र

इतक्यांत नाश करूं नका, ह्मणून त्यांनीं **महमदा**जवळ प्रार्थना केली. प्रथमतः ते ह्मणाले दोन वर्षेंपर्यंत तरी मूर्तींचा नाश न होईल तर बरें. नंतर त्यांनीं एक वर्षाची मुदत मागितली, ती मिळत नाहीं असें पाहून त्यांनीं ६ महिन्यांची मुदत मागितली, तीहि गोष्ट कबूल होत नाहीं असें पाहून एक महिनाभर तरी अवकाश द्यावा असें मागणें केलें. **महमदानें** तें मागणें मान्य केलें नाहीं. तो म्हणे **इस्लाम** व मूर्ति ह्या दोन गोष्टी एकाच स्थळीं व एकाच वेळीं राहूं शकत नाहींत. **महमद** वळत नाहीं असें पाहून प्रतिनिधी म्हणाले आम्हांस दररोजच्या प्रार्थना करण्यापासून तरी सुटका मिळावी; **महमदानें** उत्तर दिलें कीं भक्तीवांचून धर्म व्यर्थ आहे. शेवटीं मोठ्या कष्टांनीं त्यांनीं सर्व गोष्टी करण्याचें कबूल केलें. त्यांनीं स्वतः आपल्या हातांनीं आपल्या मूर्तींचा विध्वंस करूं नये, एवढी गोष्ट काय ती त्यांस माफी म्हणून दिली गेली. मूर्ति फोडण्याचें काम त्यानें **अबू सुफयान** व **ओरवा**चा पुतण्या **मुघीरा** यांजकडून करविलें. त्यांनीं हें काम चालविलें असतां, **तायफकरांच्या** बायकांच्या रडण्याचा कल्होळ चालला होता. मूर्तींचा विध्वंस झालेला त्यांच्यानें पहावेना.

**टाय** नांवाच्या कुळाच्या लोकांनीं या वेळीं दांडगाई मांडली होती; आणि त्यांस त्यांच्या धर्मगुरूकडून मदत व सल्ला मिळत असे. **अलीच्या** हातीं थोडें सैन्य देऊन त्याजला

त्यांच्यावर स्वारी करण्यासाठीं पाठविलें. स्वारीचा उद्देश असा होता कीं ह्या लोकांस पादाक्रांत करून त्यांनां आपल्या हुकमांत आणावें, व ज्या त्यांच्या मूर्ति असतील त्या फोडून टाकाव्या. ह्या लोकांचा सरदार **आदी** नांवाचा मनुष्य होता. सुप्रसिद्ध उदार, दानशूर व पुण्यश्लोक **हातीम** याचा हा मुलगा होता. **अली** आपल्या राज्यालगत आला असें पाहून **आदी सूर्याप्रांतीं** पळून गेला, परंतु त्याची बहीण व कांहीं सरदार हे **मुसलमानां**च्या हातीं सांपडले. त्यांस **अलीनें** त्यांच्या दर्जाप्रमाणें मानमर्तबानें **मदीने**कडेस नेलें. **महमदानें** **हातीमा**च्या मुलीस व तिच्या लोकांस एकदम बंदमुक्त केलें, व त्यांस पुष्कळ मौल्यवान् देणग्या देऊन परत बोळविलें. ही **हातीमा**ची मुलगी आपल्या भावाकडे **सूर्या**प्रांतांत गेली; व **महमद** हा फार उदार व थोर मनाचा आहे असें तिनें आपल्या भावाला सांगितलें. **महमदा**चा आपल्यावर फार उपकार झाला आहे असें समजून **हातीमा**चा मुलगा एकदम **मदीने**स गेला, व त्यानें **महमदा**च्या पायांवर आपलें मस्तक ठेविलें व शेवटीं **इस्लामी** धर्माचा अंगीकारहि केला. मग जेव्हां तो आपल्या लोकांत परत आला तेव्हां त्यांनीं मूर्ति-पूजा सोडून द्यावी म्हणून त्यांची त्यानें फार मनधरणी केली व तेव्हांपासून **टाय**लोकांनीं मूर्तींचा त्याग केला, व त्यांनीं **महमदा**च्या धर्माचा निःसीम भावानें अंगीकार केला. ह्याच सुमारास दुसऱ्या एका सुप्रसिद्ध मनुष्यानें **महमदा**च्या धर्माची

दीक्षा घेतली. **मोझयन** लोकांच्या कुळांत **काआब बिन झोहेर** या नांवाचा कोणी विख्यात कवि होता. त्याचा आजपर्यंतचा उद्योग म्हटला म्हणजे **मुसलमान** लोकांच्या विरुद्ध इतर लोकांनां चिथवून द्यावयाचें. त्यामुळें **मुसलमानांस** तो अर्थातच अप्रिय झाला होता. त्याचा एक सख्खा भाऊ **मुसलमान** झाला होता. तूं ही मूर्तिपूजा सोडून दे, व **इस्लामी** हो असा उपदेश त्याचा भाऊ त्याला आग्रहपूर्वक करीत असे. ही गोष्ट **काआब**च्या मनास पटली. तो गुप्तपणें **मदीनेस** गेला, व ज्या मसजिदींत **महमद** उपदेश करीत असे तेथें तो गेला. त्या स्थळीं एक मनुष्य उपदेश करीत आहे व त्याचीं बोधपर वचनें मोठ्या भक्तिभावानें ऐकत पुष्कळ **अरब** लोक त्याच्या भोंवतीं जमलेले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. **पैगंबरास** त्यानें लागलेंच ओळखलें, व त्या जमावामध्यें जाऊन तो मोठ्यानें ओरडून म्हणाला "हे **पैगंबरा,** या क्षणीं **काआब** यास **मुसलमान** करून जर मीं तुजसमोर आणलें तर तूं त्या **काआबा**चा अपराध क्षमा करशील काय?" **महमद** बोलला "होय, मी त्याचा अपराध क्षमा करीन." हें अभिवचन मिळतांच **काआब** म्हणतो "मीच तो **झोहेर**चा पुत्र **काआब**" **पैगंबराच्या** जवळ उभे असलेल्या लोकांतून पुष्कळांची इच्छा होती कीं त्याला ठार मारून टाकावें, व तसें करण्यासाठीं आज्ञा व्हावी म्हणून **पैगंबराची** त्यांनीं प्रार्थनाहि केली, परंतु **पैगं-**

**बरानें** त्यांस उत्तर दिलें की मीं त्यास जीवदान दिलें आहे. नंतर **कसिदा** नांवाच्या लोकोत्तर काव्यांतून कांहीं कवन म्हणण्याची आज्ञा व्हावी म्हणून **काआबनें पैगंबरास** विनविलें आणि ती आज्ञा होतांच त्यानें म्हणण्यास सुरवात केली. म्हणतां म्हणतां तो त्या कवनांतील एक महत्वाचा भाग म्हणूं लागला. तो भाग असा आहे, "ज्या मशालीनें जगांत प्रकाश झाला आहे, ती मशाल **पैगंबरच** होय. नास्तिकपणा जगांतून नाहींसा करण्यास त्याजला परमेश्वरानें आपलें खड्ग करून ठेविलें आहे." हा भाग **पैगंबराच्या** कानीं येतांच त्यानें आपल्या आंगावरील झगा त्यास देऊन टाकिला. पुढें **काआबच्या** कुटुंबांतील माणसांनीं **मुआविया** नांवाच्या गृहस्थापासून ४०००० दर्मी नाणीं घेऊन तो झगा त्यास विकला. तोच पुढें **अब्बासादि** राजाच्या हातीं गेला, व सांप्रत समयीं तो तुर्कींच्या बादशहाच्या ताब्यांत आहे.

आजतागाईत मूर्तिपूजक लोकांनां **काआब** मंदिरांत जाऊन पिढ्यानपिढी चालत आलेले विधि करण्याची मनाई नव्हती; परंतु यापुढें ही अव्यवस्था न चालावी म्हणून ठराव झाला; व मनानें अशक्त असे लोक मूर्तिपूजेच्या पाशांत पडणारच नाहींत, अशी व्यवस्था करावयाचें ठरलें. त्या सालच्या वर्षाच्या शेवटीं यात्रा भरेल त्या वेळीं महायज्ञाचे दिवशीं एक जाहीरनामा सर्व लोकांस वाचून प्रसिद्ध करावा अशी **अलीस** आज्ञा झाली. या जाहीरनाम्यावरून मूर्तिपूजा

व तदनुषंगिक अनाचार बंद केले आहेत, असें प्रसिद्ध करण्यांत आलें. जाहीरनामा पुढें दिल्याप्रमाणें होता. "हें वर्ष संपल्यानंतर मूर्तिपूजकास ही यात्रा करण्याची मनाई झाली आहे. नग्न होऊन देवळास कोणींहि प्रदक्षिणा घालूं नये. **पैगंबरानें** लोकांशीं जे तह केले आहेत ते कायम रहातील; परंतु ज्या लोकांशीं तह झाले नाहींत अशा इतर लोकांनीं या चार महिन्यांत आपापल्या मुलखास परत जावें. हे चार महिने लोटल्यावर कोणताहि वायदा **पैगंबर** जुमानणार नाहीं असें समजावयाचें. फक्त ज्यांच्या बरोबर तह झालेला आहे त्या लोकांशीं मात्र त्याची वागणूक तह झाला असेल त्याप्रमाणें राहील."

या जाहीरनाम्यास बरतरफीचा जाहीरनामा असें म्हणतात. यांत **महमदा**चा फार दूरदर्शीपणा दिसून येतो. त्या समयीं लोकाचार जे जारी होते ते नैतिक आचरणाच्या अगदीं विरुद्ध होते. मूर्तिपूजकांस **मुसलमान**लोकांमध्यें मिसळूं देऊन सालच्यासालीं अनाचार जर चालू ठेवले असते तर एवढे कष्ट भोगून **महमदानें** जो जगाच्या कल्याणाचा कार्यभाग करून ठेविला होता तो अगदीं नष्ट झाला असता. **यहूदी** लोकांची **बाल**नामक देवतेची पूजाअर्चा प्रसिद्ध होतीच. या लोकांच्या धर्मांत एवढा मूर्तिपूजेचा निषेध झालेला असतां पुनः पुनः त्यांच्यांत अनाचाराच्या पूजांचा उद्भव व्हावा ही मोठी आश्चर्याची गोष्ट नाहीं काय? तेव्हां **महमदानें**

ही जी मनाई केली ती योग्यच होती. सकृद्दर्शनीं हें त्याचें कृत्य निष्ठुरपणाचें दिसतें, परंतु परिणामीं दयाळूपणाचेंच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो. ज्या प्रचंड लोकसमुदायास ही गोष्ट कळविली गेली तो लोकसमुदाय आपापल्या घरोघर गेला, व दुसऱ्या वर्षाचा आरंभ होण्यापूर्वींच त्यांतील बहुतेकांनीं **इस्लामा**ची दीक्षा घेतली.

---

# अध्याय दहावा.

## नेमलेल्या कार्याची परिपूर्णता.

इसवी स. ६३१ ते इसवी स. ६३२.

साल गुदस्तप्रमाणें या सालींहि **अरबस्थानां**तील बहुतेक लोकांकडून व बहुतेक जातींकडून **मदीना**पुरीस प्रतिनिधी आले. त्यांनीं **महमदास** येऊन सांगितलें कीं, आमच्या लोकांच्या मुख्य सरदारांनीं असा निरोप सांगितला आहे कीं, आह्मांस तूं सांगितलेला धर्म पसंत आहे, व त्याचा अंगीकार करण्यास आह्मी राजी आहों. तुझ्या सत्तेखालीं रहाणें आह्मांस मान्य आहे. प्रांतोप्रांतीं **महमदानें** जे जे आपले धर्मोपदेशक पाठविले, त्यांस त्याची अशी आज्ञा असे कीं, लोकांशीं सौम्यपणानें वागा. कठोरपणा बाळगूं नका. त्यांची निर्भर्त्सना न करितां त्यांच्या जीवास धीर येईल असें प्रोत्साहनपूर्वक त्यांच्याशीं तुमचें भाषण असूं द्या. आमचें धर्मपुस्तक हें ईश्वराकडून मिळालेलें आहे असें मानणारे ह्मणजे

किताबी लोक तुह्मांस पुष्कळ भेटतील व पुसतील कीं, स्वर्गास जाण्याचा दरवाजा कोठें आहे? अशा लोकांस सांगा कीं, परमेश्वराकडून आलेला बोध लोकांस विदित करणें व सदाचरणानें वागणें हाच स्वर्गाचा दरवाजा आहे.

ज्या राष्ट्रांतील लोक आजपर्यंत अज्ञानांधकाराच्या सागरांत बुडून गेले होते त्यांस आतां ईश्वराच्या खाणाखुणांविषयीं बोध करण्यास, त्यांस पावन करण्यास, त्यांस शास्त्र व ज्ञान हीं पढविण्यास एक जाज्वल्य असा धर्मोपदेशक त्यांच्यांत उपजला. ज्या वेळीं त्यानें आपल्या कार्यास सुरुवात केली, त्या समयीं तर ह्या लोकांचे धर्मसंबंधीं विचार अगदीं अडाणीपणाचे व मानवप्राण्यांस नीचावस्थेंत नेणारे असे होते. अशा लोकांसच त्यानें करुणामय, सत्यशील व अद्वितीय अशा परमेश्वराविषयीं बोध केला. हे लोक आपसांत तंटे माजवून सदोदित लढाया करीत असून आपसांत दुही माजवीत असत. अशा या लोकांत **महमदानें** बंधुप्रेम उत्पन्न करून सर्व राष्ट्रभर ऐक्यभाव केला. नैतिक आचारविचार यांच्या संबंधानें अनंतकालापासून राष्ट्रांत फारच गोंधळ होऊन गेला होता. पारमार्थिक जीवन काय असतें ह्याची तर त्यांस ओळख सुद्धां नव्हती. अनाचार, क्रौर्य, वेडगळ विचार यांची तर राष्ट्रभर धुमाळी माजली होती. व्यभिचार व स्त्रीहत्येची चाल जिकडे तिकडे पसरली होती. बाप मेल्यावर बापाची जायदाद वडील मुलास मिळे. या जायदादींत

बापाच्या बायकाहि वडील मुलांच्या वांट्यास येत. मुलींनां त्यांच्या बापांनीं जीवंतपणीं जाळावें, ही चाल **कुरेशी** व **किंद** या दोन जातींत फारच प्रचारांत असे. ह्या चाली-विषयीं त्यांस मोठा अभिमान वाटे. इहलोक सोडल्यावर परत्र जीवन आहे व त्या स्थळीं येथील बऱ्यावाईट कृत्याचा मोजबा द्यावा लागतो अशाविषयीं तर या लोकांस आजपर्यंत अज्ञान होतें. **अरबस्थाना**ची अशी दुर्दशा **महमदा**च्या उपदेशास सुरुवात झाली त्या वेळीं होती; आणि थोडकीं वर्षें लोटलीं नाहींत तोंच पुढें मोठा पालट झाला. खरोखर देवदूतच या भूमीवर आला; कारण ज्या स्थळीं अमानुष अशीं दुष्ट कृत्यें होत होतीं, दुराचाराचें जें माहेरघर होतें, परस्परांचा बेबनाव व दुही जेथें माजली होती, त्या ठिकाणीं आतां पहावें तों बंधुप्रीति व दयाधर्म हीं नांदूं लागलीं. जेथें बेबंदशाई व पापाचरण यांचें जंगल माजलें होतें त्याच ठिकाणीं आतां पहावें तों सदाचरण व राजनिष्ठा अशा सुवासिक व मधुर पुष्पांचा बगीचाच बनला. मूर्तिपूजा व तिच्या समागमानें असणारे अनेक अनाचार ह्या सर्वांचा विध्वंस झाला. **अरबस्थानां**त चोहोंकडे रानटी स्थिति पसरली असतां मूर्तिपूजा त्या लोकांतून समूळ नाहींशी व्हावी, ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट नाहीं काय? हें नवल घडवून आणण्याचें श्रेय सर्वतोपरी **महमदा**कडे आहे. **अरबी** लोकांनां मूर्तिपूजेपासून व अमानुष दुराचारापासून वळविण्याचा

प्रयत्न **ख्रिस्ती** व **यहूदी** लोकांनीं पूर्वीं पुष्कळ केला होता; पण त्यांस यश आलें नव्हतें. **महमदाच्याच** शिकविण्यानें त्यांस ईश्वराचें अगाध सामर्थ्य, त्याची अपार दया, व त्याचें अचिंत्य ज्ञान हीं समजलीं. आतांपासून त्यांचें चित्त इहलौकिक सुखाकडे न लागतां परलोकाकडे लागलें. दानधर्म करणें, सदाचारानें वागणें, न्याय करणें, प्राणिमात्रांवर दया करणें ह्या गोष्टींचें अवलंबन त्यांनीं केलें. देव ह्मणजे काष्ठपाषाणाचा बनलेला नाहीं व तो आज आहे तर उद्यां नाहीं असा नाहीं. परमेश्वर विश्वाचा कर्त्ता अनाद्यनंत असा आहे असें त्यांस एव्हांपासून समजूं लागलें. ह्मणूनच ते **महमदास** अत्यंत पूज्य मानीत. या सर्व लोकांच्या विचारांत विमल मनानें परमेश्वराची भक्ति करावी ही गोष्ट फारच बिंबून गेली, आणि आपल्या नित्याचरणांत त्याची आज्ञा पाळावी, हा निश्चय त्यांनीं केला. **महमदाचा** बोध, त्याचीं बोधवचनें आज वीस वर्षांच्या अवधींत जीं त्यांच्या कानीं आलीं तीं त्यांच्या अंतःकरणांत उत्तम प्रकारें रुजलीं; व त्यांच्या आचरणांतहि त्यामुळें तसा चांगला फरक दिसूं लागला. व्यवहार व नीति यांच्यांत लढा राहिला नाहीं. सांप्रतकाळपासून त्यांचा मिलाफ झाला. **ईसा पैगंबर** पृथ्वीतलावर असतांनां लोक अज्ञानांधकाराच्या निद्रेंतून जसे जागे झाले तशीच जाग लोकांस आज आली. आपल्या पुण्यशील विचारांसाठीं आपण सर्व संकटें भोगण्यास तयार राहूं, आपली धनदौलत

जरी नष्ट झाली, तरी पर्वा नाहीं. आपण दुःखांत राहूं, पण आपले विचार सोडणार नाहीं, असा दृढ विश्वास त्यांच्या ठायीं उत्पन्न झाला. **महमदानें** योजिलेल्या कार्याची सिद्धि त्याच्या हयातींत त्यानें घडवून आणिली, आणि यामुळेंच त्याची इतर महापुरुषांपेक्षां जास्ती योग्यता आहे, असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं; कारण बहुतेक मोठमोठाल्या आरंभिलेल्या कार्यांची पूर्णता ज्यांनीं तीं कार्यें आरंभिलीं त्यांच्या हयातींत न होतां त्यांच्या अनुयायांकडून झालेली आहे. **महमदा**च्या संबंधानें मात्र असें बिनधोक ह्मणतां येतें कीं त्यानें आरंभिलेल्या कार्याची परिपूर्ती त्याच्या हयातींतच घडून आली, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

थोड्याच दिवसांपूर्वीं ज्या गरीबशा उपदेशकास त्याच्या जन्मपुरीच्या बाहेर हांकलून लाविलें होतें, व जो **तायफ** शहराचा आश्रय धरून आपल्या उपदेशाचें काम चालवावें म्हणून तिकडे गेला होता व तेथूनहि ज्याला धोंडमार करून हांकलून लाविलें होतें, त्याच उपदेशकानें नऊ वर्षांच्या अवधींत **अरबस्थान**च्या लोकांस अज्ञानांधकाराच्या सागरांतून उचलून वर काढून नीति व न्याय यांच्या मार्गास लाविलें. ही **महमदा**ची मोठी थोरवी आहे.

**पैगंबरास** लिहितांवाचतां येत नव्हतें; तथापि विद्या व ज्ञान यांची योग्यता तो पूर्णपणें जाणत होता, व तो यांचें

गौरवहि करी. तो म्हणे—मानवांचीं कृत्यें लेखणीनें लिहिलीं जातात, लेखणीनेंच त्यांचा न्याय होणार आहे. अखेरीस लेखणीच मानवांच्या कृत्यांची झडती घेण्यांत पंच बनणार आहे. तसेंच तो सदांसर्वदां मानवांच्या अंतःकरणांतील सदसद्विचारशक्ति काय सांगते तें पहा असें म्हणे. मनुष्याच्या अंतःकरणांत जी धार्मिक वासना जागृत आहे तिच्याविषयीं **पैगंबरा**ची आदरबुद्धि, चमत्कारांचा अव्हेर, परमेश्वराचा मानवांशीं साक्षात् संबंध, मी जो धर्माचा उपदेश करितों तो यच्चयावत् मानवप्राण्यांनीं ग्रहण करण्यास योग्य आहे अशी त्याची दृढ समजूत, त्याचें साधेंसें आचरण, या सर्व गोष्टींवरून **महमदा**चे विचार आधुनिक कालच्या विचारांसारखेच होते अशी आपल्या मनाची खात्री होते. **अरबस्थानां**तील चोहों दिशांकडून त्याचा धर्म स्वीकारण्यास लोकांच्या झुंडी येऊं लागल्या, तेव्हां **पैगंबरास** समाधान वाटून त्याची खात्री झाली कीं, आपण आरंभिलेल्या कार्याची सिद्धि झाली. त्यास असेंहि वाटूं लागलें कीं, आपला अंत आतां समीप येऊन पोंचला आहे; म्हणून त्यानें **मक्केस** जाऊन शेवटची यात्रा करण्याचा निश्चय केला. झुलकाआद महिन्याचे २९ वे तारखेस म्हणजे ता. २३ फेब्रुआरी इ. स. ६३२ या सालीं **पैगंबरानें** मोठा थोरला जनसमूह बरोबर घेऊन **मक्के**च्या यात्रेस जाण्याच्या उद्देशानें **मदीना**पुरी सोडिली. **मक्केस** येऊन पोंचल्यावर व यात्रेच्या विधीची

सुरुवात होण्याचे अवल **जबलूल अरफात** या नांवाच्या टेंकडी-वर उभा राहून **महमदानें** खालीं जमलेल्या लोकांस उद्देशून जें भाषण केळें तें पुढें दिलें आहे. ज्या दिवशीं हें भाषण झालें, त्याची तारिख ७ मार्च इ. सन ६३२. ह्या यात्रेस **हज्जतुल इस्लाम** असें म्हणतात.

"अहो लोकहो, मी बोलतों तें लक्ष देऊन श्रवण करा. येत्या सालीं मी पुनः तुमच्या बरोबर यात्रेस जाईन याचा मला भरंवसा दिसत नाहीं."

"हा महीना व हा दिवस जसे पाक मानिले आहेत तसेंच तुमचें परमेश्वरासमोर जाणें घडे पर्यंत तुम्हांतील प्रत्येक-जणाचें जीवित व त्याची जायदाद हीं तुम्हीं पाक समजलीं पाहिजेत. हें तुम्ही पक्केपणीं लक्षांत ठेवा कीं, तुम्हांला परमेश्वरासमोर जावयाचें आहे! तो तुम्हांपासून तुम्हीं जीं जीं कृत्यें केलीं आहेत त्यांचा हिशेब घेईल, आणि तुम्हांस त्यांचा जबाब द्यावा लागेल. अहो लोकहो, तुमचा हक्क तुमच्या बाय-कांवरतीं आहे व तुमच्या बायकांचा हक्क तुम्हांवर आहे. आपल्या बायकांशीं प्रेमळपणें वागा. त्यांस जाच करूं नका. परमेश्वर तुमचा जामीनदार झाला आहे व त्याची जामीनकी आहे ह्मणून तुह्मांस त्यांस वरतां आलें. परमेश्वराच्या वचनामुळेंच त्यांचे देह तुमच्या स्वाधीन झालेले आहेत. जे तुमचे दास आहेत त्यांच्याकडे दुर्लक्ष करूं नका. त्यांच्याशीं तुम्ही पंक्तिभेद ठेवूं नका. जें अन्न तुम्ही खातां तेंच त्यांस देत जा. जसे

कपडे तुम्ही घालतां तसेच त्यांस द्या. तुमच्यानें क्षमा करवत नाहीं असा एखादा दोष त्यांच्याकडून झाला असला, तर त्यांस पाहिजे तर आपल्या पासून दूर करा; परंतु त्यांस कठोरपणें वागवूं नका. तेहि परमेश्वराचेच सेवक आहेत."

"अहो लोकहो, माझ्या बोलण्याकडे लक्ष द्या, आणि तें नीट समजून घ्या. पक्केपणीं लक्षांत ठेवा कीं, तुम्हीं सर्वजण **मुसलमान** आहां. तुम्ही परस्परांवर भावाप्रमाणें प्रीति करा. तुम्ही सर्व भावंडें आहां असें जाणा. जी वस्तु तुमच्या भावाची आहे तिजवर तुमची कोणत्याहि प्रकारची सत्ता नाहीं. जर भावानें आपण होऊन तुह्मांस ती दिली, तर अर्थात् ती घ्या. पण दिली नाहीं तर घेऊं नका. अन्यायानें न वागण्याविषयीं जपा. जो या स्थळीं हजर आहे त्यानें जो गैरहजर असेल, त्यास हा माझा निरोप सांगावा. कदाचित् असें होईल कीं, सांगणाऱ्याच्यापेक्षां ऐकणाऱ्याच्याच लक्षांत अधिक राहील." जमलेल्या अफाट जनसमूहाकडे पाहून **पैगंबराचें** अंतःकरण सद्गदित झालें, आणि भाषण समाप्त झाल्यावर तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, "हे परमेश्वरा, माझा निरोप मीं लोकांस सांगितला. माझ्या कामाची आतां समाप्ति झाली." जमलेल्या लोकांनीं एकदम उंच स्वरानें ह्मटलें "होय, खरोखर तूं आपला कार्यभाग संपूर्ण केलास." **महमद** बोलला "हे परमेश्वरा, मी तुला विनयपूर्वक ह्मणतों कीं, तूं या गोष्टींचा साक्षी आहेस." हें भाषण

फार गंभीर, रसभरित व उत्साहानें परिपूर्ण होतें. भाषण झाल्यावर थोड्याच वेळानें यात्रेचे सर्व विधि उरकून बरोबर आलेल्या लोकांसहवर्तमान **पैगंबर मदीना**पुरीस परत गेला. ज्या ज्या प्रांतांत **मुसलमानी** धर्माचा प्रसार झाला होता, त्या त्या प्रांताचा कोणत्या प्रकारें कारभार चालवावयाचा व ज्या ज्या जातींनीं धर्माचा अंगीकार केला होता व **मुसलमानी** संस्थेंत ज्या सामील झाल्या होत्या, त्यांची व्यवस्था कशी लावावयाची याविषयीं त्यानें योग्य तजवीज मरणापूर्वीं एक साल अगोदर सांगून ठेविली होती. या वेळीं **अरबस्थान**भर **इस्लामी** धर्मच प्रचलित असल्यामुळें **महमदानें** आपले कामगार प्रांतोप्रांतीं पाठवून निरनिराळ्या जातींतल्या लोकांनां धर्माचा उपदेश करण्यासाठीं त्यांच्याबरोबर त्यानें उपदेशकहि पाठविले. **इस्लामा**चे विधि कोणकोणते आहेत, व कोणकोणतीं कर्तव्यें करावयाचीं आहेत, ह्या गोष्टीचें ज्ञान उपदेशकांनीं लोकांस शिकवावें. त्यांनीं लोकांचे परस्परांमधील तंटे मोडावे, व जकात ह्मणजे उत्पन्नाचा चाळिसावा हिस्सा जमा करावा. **महमदानें मुवाजबिनजबाल** यास **यमन**प्रांताकडे पाठविलें, व त्याला निरोप देतांनां असें सांगितलें कीं, ज्या ज्या वेळीं कोणत्या एखाद्या बाबतींत तुला काय करावें याचा समज **कुरानां**त सांपडणार नाहीं, त्या त्या प्रसंगीं तुला जें योग्य वाटेल तें तूं कर. **अलीला यमा**प्रांताकडे पाठविलें, आणि जातांनां सांगितलें कीं, जेव्हां ह्मणून तुजकडे दोन पक्षांचे

लोक आमच्यांत लढा पडला आहे त्याचा न्याय करून तो लढा तुह्मी मोडून टाका, असें सांगतील त्या वेळीं तूं दोघांहि पक्षांकडून पूर्वपक्ष व उत्तरपक्ष ऐकल्यावांचून न्याय करूं नको. **झैद** याचा मुलगा **ओसेमा** याच्या हाताखालीं एक मोठें सैन्य देऊन **सूर्या**प्रांतांत ज्या वकीलाला **बायझेन्शियम** लोकांनीं ठार मारलें होतें, त्या कृत्याबद्दल त्यांचा सूड उगवावा ह्मणून त्यास पाठविण्याची तयारी चालली होती. सैन्याची तयारी होऊन सैन्य शहराबाहेर तळ देऊन स्वारीस जाण्याविषयीं हुकमाची वाट पहात होतें, परंतु **खैबर** गांवीं **पैगंबर** असतां त्याला एका **यहूदी**बाईनें अन्नांतून विष घातलें होतें, त्याचा परिणाम आतां **महमदा**च्या शरीरावर दिसूं लागला; आणि त्याची आयुर्मर्यादा आतां फार दिवस राहिली नाहीं, असें स्पष्ट दिसूं लागलें. यावरून वर सांगितलेली स्वारी थांबविण्यांत आली. त्याच्या दुखण्याची बातमी चोहोंकडे पसरली. आसपासच्या प्रांतांत कांहीं बेबंदशाई सुरू झाली. तिघांजणांनीं असें ढोंग माजविलें कीं, आह्मांस देवाकडून आदेश आलेला आहे. आह्मांस देवानें **पैगंबर** करून पाठविलें आहे. असें लोकांत जाहीर करून त्यांनीं आपल्या जातीवाल्यांचीं मनें आपणांकडें वळवून घेतलीं. ह्यांपैकीं फार भयंकर ह्मटला ह्मणजे **अह्मलाबिनकाआब** या नांवाचा मनुष्य होता. त्याची प्रसिद्धि **अलअस्वद** या नांवानें फार आहे. **अलअस्वद** ह्मणजे काळा. त्याच्याजवळ पुष्कळ

संपत्ति असून तो शहाणपणांतहि कमी नव्हता. त्याला जादुगिरीच्या कृतिहि माहीत होत्या; व त्याच्याकडे **यमन**प्रांताची सरदारी असे. त्यानें जादुगिरीच्या करामतीनें आपल्या साध्या भोळ्या जातीवाल्यांस आपलेकडे वश करून घेतलें, व त्यांच्या मनांत आपल्याविषयीं आपण दैविक पुरुष आहों असा भाव उत्पन्न केला. आपल्या लोकांच्या साह्यानें त्यानें आसपासचीं बरींच शहरें आपल्या हस्तगत करून घेतलीं. **यमन**प्रांताचा सुभेदार **बझन** या नांवाचा कोणी मनुष्य होता. तो नुकताच मरण पावल्यामुळें त्याच्या जागीं त्याचा मुलगा **शहर** यास तीच सुभेदारी **महमदा**नें दिली होती. या सुभेदारास **अल-अस्वद** यानें ठार मारून टाकिलें. **यमन**प्रांत **इराण**च्या **खसरवीस** नांवाच्या बादशहाच्या ताब्यांत होता. त्यावर **बझन** हा सुभेदार **इराण**च्या बादशहाकडून होता. **बझन** यानें **इस्लामा**चा स्वीकार केला; व त्यानंतर त्याची नेमणूक त्याच सुभेदारीवर **पैगंबरा**नें कायम केली. **बझन**चें लोकांत फार वजन असे. **यमन**प्रांतीं जे फार्शी ह्मणजे ज्यांस एबना ह्मणत ते वस्ती करून होते, त्यांच्यांत व तसेंच त्या प्रांतांतील अरबी लोकांमध्यें सुभेदार **बझन**चा मोठा मान असे. त्यानें **इस्लामा**ची दीक्षा घेतली ह्मणून **यमन**प्रांतांतील त्याच्या फार्शी जातभाईनींहि ह्या धर्माचा अंगीकार केला. **अलअस्वद** यानें **शहर** यास मारून त्याच्या **मर्झबान** नांवाच्या बायकोशीं बळजबरीनें विवाह लाविला. तो एकदां मद्यपान करून

बेशुद्ध होऊन पडला असतां **एबना** ह्मणविणाऱ्या फार्शी लोकांनीं **मर्झबान**बाईच्या मदतीनें **अलअस्वद** यास ठार मारिलें. **अबूबकर** याजकडे **खलिफी**चा अधिकार येईपर्यंत अशाच दोनतीन ढोंग्यांचें खूळ मोडलें गेलें नाहीं. यांपैकीं एका ढोंग्याची **मोसलीमा** या नांवानें लोकांत प्रसिद्धि असे. याच उद्धट माणसानें एकदां **पैगंबरास** पत्र लिहिलें तें, असें:— परमेश्वराचा पैगंबर **मोसलीमा** याजकडून परमेश्वराचा **पैगंबर महमद** यास सलाम.

" मी तुमचा शराकतदार आहें. अधिकारांची वांटणी तुमच्या माझ्यामध्यें सारखी झाली पाहिजे. अर्धी पृथ्वी मजकडे व अर्धी **कुरेशी**लोकांकडे राहील, परंतु **कुरेशी**लोक लोभिष्ट फार, त्यांस ह्या वांटणीनें संतोष होणार नाहीं. " याजवर **महमदानें** मोठा खणखणीत जबाब पाठविला. तो असा. परमेश्वराचा **पैगंबर महमद** याजकडून ढोंगी **मोसलीमा** यास; " जे सत्याच्या मार्गाचा अवलंब करितात त्यांस शांति असो. पृथ्वीचा धनी प्रभु परमेश्वर आहे, त्याची कृपा ज्यावर होते त्यास तो ती पृथ्वी देतो. जे परमेश्वराचें भय बाळगितात त्यांचीच भरभराट होते. "

**पैगंबराचे** इहलोक सोडून परत्र जाण्याचे जेव्हां दिवस आले, त्या समयास त्याच्या अंतःकरणांत शांति व समाधान फार असे. त्याची या वेळची प्रशान्त मुद्रा पाहण्यासारखी होती. त्याच्या मनाची तळमळ होत नसल्यामुळें त्याला

प्रार्थनादि उपासनेच्या कार्यांत अध्यक्षपणा घेतां येत असे. मरणाचे अगोदर तीन दिवसपर्यंत त्याच्या हातून प्रार्थनादि आचार झाले. एका रात्रीं मध्यान्ह समयीं तो उठून आपले जुने दोस्त ज्या स्थळीं अनंत कालची निद्रा घेत पडले होते, त्या ठिकाणीं गेला, व परमेश्वराची त्यानें अशी प्रार्थना केली कीं, "माझ्या निजलेल्या दोस्तांनां तूं आशीर्वाद दे," दुखणाईत असतां तो आपली बायको **आयेशा** इच्या घरींच रहात असे. हें घर मशिदीच्या अगदीं जवळ होतें. ह्या ठिकाणीं त्याला **अली** व **फझल** हे दोघे त्याचे चुलतभाऊ सर्व प्रकारें साह्य करीत. या वेळीं **महमदाच्या** मुखावर फारच विलक्षण शांतता दिसत असे. जे जे लोक त्याच्याजवळ असत त्यांच्या लक्षांत ही गोष्ट येत असे. एके दिवशीं परमेश्वराची प्रार्थना वगैरे विधि समाप्त झाल्यावर **पैगंबर** जनसमूहास उद्देशून असें बोलला, "अहो **मुसलमान** भाईहो, जर माझ्या हातून कोणाचा अपराध घडला असेल, तर त्यानें मजजवळून त्याचा मोजबा घ्यावा, मी देण्यास राजी आहें. जर मजला कोणाचें कांहीं देणें राहिलें असेल, तर त्यानें तें मागावें, व मजजवळ जी कांहीं जायदाद आहे, ती त्यांचीच आहे; त्यांतून त्यांनीं आपल्या ऋणाची फेड करून घ्यावी." हें ऐकून एकजण पुढें सरसावून उभा राहिला, व ह्मणाला तुह्मीं एके प्रसंगीं माझ्या जवळून भिकाऱ्याला

देण्यासाठीं ह्मणून तीन दमीं घेतल्या होत्या. हें ऋण **महमदानें** ताबडतोब फेडलें, व तो ह्मणाला, "परलोकीं फजिती होण्यापेक्षां इहलोकीं फजिती होणें बरें". अनंतर **महमदानें** देवाजवळ विनंति केली कीं, जे येथें हजर आहेत, त्यांच्यावर व शत्रूशीं लढतांनां जे माझे लोक मेले त्यांच्यावर तुझी कृपा होवो. लोकांस सांगितलें कीं, धर्माचे विधि व आचार पाळण्यांत तुह्मी तत्पर असा; व सर्व जगाशीं शांतीनें, व प्रेमानें वागा. शेवटीं **कुराना**तील कांहीं वाक्यांचा उच्चार करून त्यानें आपलें बोलणें समाप्त केलें. तीं **कुराना**तील वाक्यें हीं आहेत. "जे लोक आपणांस इहलोकीं मोठे करून घेत नाहींत, अथवा इतरांस इजा करीत नाहींत त्यांस **आह्मी** (परमेश्वर) परलोकीं वसतिस्थान देऊं. कारण पवित्राचरणी मनुष्यांस सुखलाभच होणार." या समयानंतर **महमद** हा सार्वजनिक प्रार्थना करण्यास गेला नाहीं. अति त्वरेनें त्याची शक्ति कमी कमी होत चालली, व सोमवारीं दोनप्रहरांचे समयीं रबिलावर महिन्याचे १२ तारखेस ह्मणजे जून ८ सन ६३२ इ. सालीं परमेश्वराची आग्रहपुर्वक प्रार्थना करीत असतां **पैगंबरा**चा आत्मा परमात्म्याशीं समागम करण्यास परलोकीं जाता झाला. **पैगंबरा**ची बायको **आयेशा**बाई हिचे मांडीवर मस्तक ठेविलें असतां तो मरण पावला. ज्या स्थळीं त्याचा प्राण गेला त्याच स्थळीं त्याला समाधि द्यावी असें **अबूबकर**

यानें सांगितल्यावर, **अली, ओसेमा, फझल** या सर्वांनीं मिळून **पैगंबराचे** प्रेतास स्नान घातलें. शुभ्र वस्त्रें प्रेतावर घातलीं व समाधि तयार होऊन त्यांत त्याचा प्रेतविधि करीपर्यंत प्रेतास एक दिवसभर तसेंच ठेविलें.

दुसरे दिवशीं ह्मणजे मंगळवारीं **मदीना**पुरींतील पुरुष, स्त्रिया, मुलें, व गुलाम असे सर्व प्रकारचे रहिवासी प्रेतदर्शनास आले. **अबूबकर** व **उमर** हे दोघेजण ज्या वेळीं प्रेतदर्शनास आले त्या वेळीं लोकांची अतोनात दाटी झालेली होती. या प्रसंगीं ह्या दोघांजणांनीं प्रार्थना केली ती अशीः— " हे परमेश्वराच्या **पैगंबरा,** तुला शान्ति असो ! तुजवर देवाची कृपा नांदो, व त्याचा तुजवर आशीर्वाद असो. परमेश्वराकडून आह्मां मानवांस विदित करण्याकरितां ह्मणून जो निरोप **पैगंबरास** आला होता, तो निरोप **पैगंबरानें** आह्मांस कळविला. परमेश्वर हा एक व अद्वितीय आहे असें मानावें व त्याचीच भक्ति करावी ह्मणून त्यानें आह्मांस शिकविलें, त्यानें आह्मांस आपलेसें करून घेतलें. तो भक्तांवर अत्यंत प्रेम ठेवीत असे, परमेश्वराचा सत्यधर्म त्यानें आह्मांस कळविला. त्याबद्दल आमच्यापासून द्रव्यप्राप्ति त्यानें करून घेतली नाहीं, अथवा द्रव्यलोभानें धर्माचा कडकपणा त्यानें कमी केला नाहीं. ही गोष्ट आह्मी लोकांस जाहीर करितों. " त्यावर "आमीन ! आमीन ! " ( सत्य आहे ! सत्य आहे ! ) असे जमलेल्या जनसमूहाच्या

मुखांतून उद्गार निघाले. नंतर शेवटला प्रेतसंस्कार झाल्यावर आयेशाबाईच्या घरांत खणलेल्या कबरींत प्रेत ठेविलें व त्यावर एक समाधि बांधिली.

ईश्वरभक्तींत निःसीम परायण व मानवांच्या कल्याणाकरितां सदा तत्पर असा मनुष्य आपलें काम बजावून जगांतून नाहींसा झाला. इतर कोणीहि मनुष्य त्याच्या बरोबरीला येऊन पोंचेल काय? याच्या इतक्या अडचणी, इतका जगाचा त्रास सहन करून अपवित्रतेचा लवलेश डाग न लागतां जगांत अनुकरणीय असा मानव कोणाच्या आढळांत आला आहे काय? गरीब व निराश्रित उपदेशकाचा जो पुढें **खसरवीस** आणि **कैसर** यांच्या योग्यतेचा झाला, राष्ट्राचीं राज्यसूत्रें ज्याच्या हातांत आलीं होतीं, तो जी करील ती पूर्व दिशा, एवढा मोठा अधिकार जरी त्याचा या जगीं झाला, तरी त्याच्या पूर्वींच्या व हल्लींच्या वर्तनांत किमपिहि फरक झाला नाहीं, ही मोठी आश्चर्य करण्यासारखी गोष्ट नाहीं काय? दरिद्री होता तेव्हां विनीत, उदात्त, पाक विचाराचा, कडक सदाचरणाचा, लोकांच्या मनाला यत्किंचितहि दुःख न देण्याविषयीं फार जपून वागणारा, कर्तव्यसंबंधी निःसीमपणें तत्पर, कठोरपणें आत्मनिरीक्षण करणारा, या सर्व गुणांवरून ज्याला **अल-अमीन** ह्मणून सर्व लोकांनीं ह्मणावें, असा हा **पैगंबर** पुढें राज्यारूढ व अधिकारारूढ झाला तरी जसा पूर्वीं होता

तसाच राहिला. एके प्रसंगीं मक्केंतील एका नामांकित व श्रीमान गृहस्थाबरोबर धर्मसंबंधी वादविवाद करीत असतां एका सत्याभिलाषी अंधळ्या दरिद्री माणसाकडे त्याचें दुर्लक्ष झालें; ह्याचा त्याला अत्यंत पश्चात्ताप झाला; व याच्याबद्दल तो आपल्याला पुनः पुनः टोंचून घेत होता. परमेश्वराला हें माझें दुराचरण पसंत झालें नाहीं, असें त्यानें लोकांस वारंवार सांगितलें. पुढें ज्या ज्या प्रसंगीं हा अंधळा माणूस त्याच्या दृष्टीस पडे त्या त्या प्रसंगीं **पैगंबर** त्याजकडे जाऊन त्याला ह्मणे "तुह्मी माझे अतिप्रिय अतिथी आहां. माझ्या घराचा दरवाजा सदा तुह्मांसाठीं मोकळा करून ठेविला आहे, कारण तुमच्या मुळेंच देवानें माझा निषेध केला होता." अशा मनुष्यावर भक्ति व प्रेम कसें जडणार नाहीं? **पैगंबरा**ची वागणूक श्रीमंतांशीं भलमाणसाईची, गरिबांशीं प्रेमळपणाची व मगरूर लोकांशीं सलाबतपणाची असे. त्यामुळें **पैगंबरा**वर जनसमूहाची मोठी भक्ति व प्रेम असे. त्याचें अंतःकरण फार उदार आहे असें त्याच्या मुद्रेवरूनच लोकांस दिसून येई. त्याचें अंतःकरण अद्भुत विश्वचमत्कृतींनीं परिप्लुत असल्यामुळें त्याचा आत्मा परमेश्वराच्याठायीं सदा रत असे. क्षुद्र विचारांस त्यांत रीघ मिळत नसे, आणि त्यामुळें जरी तो स्वतः अनक्षर असे तथापि विद्वान व अविद्वान या दोघांसहि त्याच्यापासून सारखाच बोध व लाभ होई, व त्यानें सांगितलेल्या गोष्टींची जरब बसे. शिवाय त्याच्या मुद्रेवर

जें तेज व जी सुबुद्धता दिसत असे त्यामुळें ज्या ज्या कोणास त्याच्या संगतीचा लाभ होई, त्यांच्या मनांत त्याविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि व प्रेम उत्पन्न होतच असे. आपल्याहून कमी दर्जाचे लोकांच्या अपराधाकडे तो अक्षयी दुर्लक्ष करी. अंगानें वांकडातिकडा असा एक त्याचा हुजऱ्या असे. त्याला कोणी बोललें तर **पैगंबरास** सहन होत नसे. **एनस** नांवाचा त्याचा एक सेवक होता, तो सांगे— मीं **पैगंबरा-**जवळ १० वर्षें चाकरी केली; परंतु त्यानें मला कधीं हं सुद्धां ह्मटलें नाहीं. त्याच्या कुटुंबांतील माणसांवर त्याचें अत्यंत प्रेम असे. एकदां त्याचा एक मुलगा दुखणाईत होता त्या वेळीं **महमद** त्यास पोटाशीं घेऊन बसला होता. आणि तो मुलगा **महमदाच्या** अंगावरच मरण पावला. त्याचें लेंकरांवर फार प्रेम असे. रस्त्यांतून जातांनां मुलें दिसलीं कीं, त्यांच्याशीं बोलण्याकरितां ह्मणून त्यानें उभें रहावें, आणि मुलांच्या तोंडांवरून हात फिरवून व त्यांस गोंजारून मग पुढें चालूं लागावें. कोणावरहि त्यानें आपल्या हयातींत हात उगारला नाहीं. फारच झालें ह्मणजे तो ह्मणे, ह्याला काय झालें आहे ? त्याचें कपाळ चिखलानें काळें होवो. कोणी एकजण त्याला एकदां ह्मणाला, तूं अमक्या अमक्या मनुष्याला शाप दे. **पैगंबरानें** उत्तर दिलें "मला परमेश्वरानें शाप देण्यासाठीं या धरित्रीवर धाडिलें नाहीं, परंतु मनुष्य जातीवर उपकार करण्यासाठीं पाठविलें आहे." तो दुखणेकऱ्यास भेटावयास जाई. प्रेतयात्रा

दिसली ह्मणजे त्या मंडळीबरोबर स्मशानांत जाई. एखाद्या गुलामानेंहि जेवावयास बोलाविलें तर तो अनमान न करितां खुशालपणें त्याच्या घरीं जेवावयास जाई. आपले कपडे त्यानें आपण शिवावे, बकऱ्यांचें दूध काढावें, आणि बहुत प्रसंगीं त्यानें आपलें आपणच चाकर व्हावें; व आपलें आपणच धनी व्हावें. एखाद्या मनुष्याची व त्याची रस्त्यांत गांठ पडली व दोघे हातांत हात घालून जर उभे राहिले तर **महमदानें** आपला हात प्रथमतः कधींहि काढून घेऊं नये. तो दुसऱ्या मित्रानें पाठ फिरविल्यावांचून आपण कधींहि अवल पाठ फिरवीत नसे. **पैगंबर** हाताचा मोकळा, मनाचा धीट, व जिभेचा सत्यशील होता. संभाषण अत्यंत मधुर व प्रिय, दिसण्यांत पूज्य, समागमांत अत्यंत प्रेमळ. ज्यानें त्याला पहावें त्यानें बोलावें असा मनुष्य आजन्म आपल्या पाहण्यांत आला नाहीं, व पुढेंहि येणार नाहीं. तो मोठें मौन धारण करून असे, व प्रसंग विशेषीं बोलणें भाग पडलें तर तें त्याचें भाषण पूर्वापार विचारपूर्वक असून त्यांत गुळमुळीत-पणा नसावयाचा व ऐकणारांस तर त्याचा विसर पडावयाचाच नाहीं. विनय, दया, शान्ति, आत्मसंयमन आणि औदार्य हे गुण त्याच्यांत सदा वसत, आणि यामुळें त्याच्या समागमांत असणाऱ्या मंडळींत त्याजविषयीं अत्यंत प्रेमभाव असे. जवळच्या आप्ताचे मरणानें कष्टी झालेल्या माणसां-विषयीं व संकटांनीं गांजून गेलेल्या मनुष्यांविषयीं **पैगंबराचें**

अंतःकरण फार द्रवत असे. महागाईंतहि त्यानें पुष्कळदां लोकांस जेवूं घालावें. ज्या ज्या गोष्टींनीं दुसऱ्याला सुख होईल तसें करण्यांत तो फार मेहनत घेई. रस्त्यांत जातां जातां जर एखादा गरीब मनुष्य भेटला तर त्याची दुःखाची काहाणी ऐकतच तेथें त्यानें उभें रहावें. तसेंच गरीबांच्या घरीं जाऊन त्यांचा समाचार घ्यावा व त्यांचें समाधान करावें. अगदीं हलक्या प्रतीच्या दासांनीं कधीं कधीं त्याचा हात धरून त्याला आपल्या धन्याकडे घेऊन जावें, आणि आपल्याला जो त्रास होत असेल, त्याचें गाऱ्हाणें त्यास सांगावें, व आपली त्या जाचांतून सुटका करून घ्यावी. भोजन करते वेळीं तो नित्यशः देवाचा आशीर्वाद मागे. तसेंच भोजन संपल्यावरहि देवाचा आशीर्वाद मागे. निरनिराळे कामांसाठीं निरनिराळी वेळ त्यानें नेमून ठेविली होती. दिवसा ज्या वेळीं प्रार्थना वगैरे कांहीं काम करावयाचें नसे, त्या वेळीं जे लोक त्याला भेटावयास येत, त्यांची तो भेट घेई, व संस्थानाचीं निरनिराळीं कामें उरकून टाकी. रात्रीचा वेळ बहुतेक प्रार्थना करण्यांत जाई. तो फारच थोडा वेळ निद्रा घेत असे. तो गरीबांवर फारच प्रेम करी, व त्यांचा आदरसत्कारहि फारच करी. ज्या कोणास स्वतःचें घर नसे, व कोठें थारा घेण्यास विसाव्याची जागा नसे, त्यांनीं पैगंबराच्या घराजवळल्या मशिदींत रात्रीं खुशालपणें निजावें. अशा कांहीं निराश्रित लोकांस तो दररात्रीं जेवावयास

बोलावी. बाकीच्या लोकांस त्याचे जे सधन शिष्य असत ते आपल्या घरीं जेवावयास घेऊन जात. आपल्या निष्ठुर व कठोर शत्रूशीं याचें आचरण मायेचें व सोशिकपणाचें असे. उभारलेल्या संस्थानाशीं जे लोक शत्रुत्व करीत, त्यांच्याशीं मात्र तो फार कडक रीतीनें वागे, परंतु जे कोणी त्याचा स्वतःचा द्वेष करीत, त्याची कुचेष्टा करीत, त्याचा उपमर्द करीत, व इतर प्रकारचे त्याचे छळ करीत, त्या सर्व गोष्टी तो निमूटपणें सहन करी. ह्या मोहजालांत पाडणाऱ्या गोष्टी आहेत, तेव्हां यांच्या वाटेस आपण जाऊं नये, त्या मुकाट्यानें सोसणें ह्यांतच थोरवी आहे, असें ह्मणून त्यानें सर्वांस क्षमा करावी. राज्याधिकार प्राप्त झाल्यावरहि **महमदा**ची राहण्याची रीतभात फारच साधेपणाची असे. त्याचा पोषाक साधा, घरांतील सामान साध्या प्रकारचें. पुष्कळदां **पैगंबरास** भुकेलेंच रहावें लागे. कधीं कधीं खजूर आणि पाणी यांवरच त्याला दिवस कंठावे लागत. महिन्याच्या महिने **महमदा**च्या घरची चूल पेटत नसे. परमेश्वरानें सर्व जगाची संपत्ति जरी त्याजपुढें ठेविली होती तरी ती त्यानें घेतली नाहीं. **पैगंबरा**चा देह-स्वभाव स्त्रियांच्या स्वभावासारखा कोमळ, व रणशूरा-सारखा धैर्यवान व धाडसी असे. ह्या दोन विरोध भावांमुळें त्याजविषयीं पूज्यता व प्रेम मनुष्यांच्या अंतःकरणांत उपत्न्न होई. लोकांकडून अनिवार त्रास

बरींच वर्षें मनाला धीर देऊन त्याला सोसावा लागला तरी लोकांवर त्याचें अत्यंत प्रेम होते. **पैगंबरा**चा आवाज फारच मधुर व चित्तवेधक असल्यामुळें त्याच्या तोंडचे शब्द ऐकल्यानें त्याचे वरतीं मुलांचें प्रेम फारच जडे. निष्कपट अशी **पैगंबरा**ची दोस्ती, त्याचें उदात्त औदार्य, त्याचें निःशंक धैर्य, व त्याची न खचणारी उमेद, अशा त्याच्या अनेक गुणांकडे दृष्टि गेली ह्मणजे दोषबुद्धि नष्ट होऊन पहाणाराची दृष्टि विस्मय व प्रेम यांनीं परिप्लुत होऊन तटस्थ अशी त्याच्या मूर्तीकडे अवलोकनच करीत राही. पृथ्वीवरील ज्या खारटपणामुळें (क्षारांमुळें) जितीं माणसें नासून जात नाहींत, तर जीवंत रहातात, तसा क्षार उत्पन्न करणारा त्याच्या आंगीं उदात्त उत्साह होता. त्याच्या आवेशापासून जगास जीवनाग्नीची ज्वाला मिळाली, व जगाचें कल्याणच झालें. ज्या थोड्याशा महापुरुषांनीं जगांत एकच सत्य गोष्ट प्रकट करून आपल्या आयुष्याच्या ज्योतीस तैलबिंदु दिला, व धन्य झाले त्यांपैकींच **महमद पैगंबर** होता. अद्वितीय परमेश्वराचा तो दूत होता. मी कोण आहें याचा त्याला कधींहि विसर पडला नाहीं. ज्या गोष्टींमुळें त्याचें जीवित टिकाव धरून राही असा जो देवाकडून आलेला निरोप याचाहि त्याला कधीं विसर पडला नाहीं. त्याचें निवेदन त्यानें मरे-पर्यंत केलें.

---

# अध्याय अकरावा.

## इस्लाम.

**महमद पैगंबर** यानें स्थापित केलेल्या धर्मास **इस्लाम** ह्मणतात. **इस्लाम** हा नामवाचक शब्द **सलम** या क्रियापदा पासून निघालेला आहे.

**सलम** ह्मणजे शांत होणें, विसावा घेणें, कर्तव्य करणें, ऋण-मुक्त होणें, आणि सर्व प्रकारें परमेश्वराच्या स्वाधीन होणें. **इस्लाम** या नामवाचक शब्दाचा अर्थ, शांति, नमस्कार, आश्रय-स्थान, मुक्ति, व सर्व प्रकारें ईश्वराच्या आधीन असणें असा आहे.

**कुरान** हा नामवाचक शब्द **करा** या क्रियापदा पासून निघालेला आहे. **करा** याचा अर्थ वाचणें असा आहे. तेव्हां **कुरान** ह्मणजे वाचन अथवा वाचनार्ह ग्रंथ असा अर्थ निघतो. **कुरान** ग्रंथ हा दुसऱ्याहि नांवांनीं प्रसिद्ध आहे. अल् **फुरकान**, अल् **मुसहफ**, अल **किताब** व **अज्जिक्र** हीं त्याचीं दुसरीं नांवें आहेत. **कुरानां**त सुरे ह्मणजे अध्याय ११४ आहेत. हे सुरे सारखे नसून लहानमोठे आहेत. प्रत्येक सुऱ्यांतील एखाद्या विशिष्ट शब्दावरून त्या सुऱ्यास तें विशेषनाम दिलेलें आहे. **कुरानां**तील कांहीं सुऱ्यांचें ज्ञान **पैगंबर मक्कें**त वास्तव्य करीत असतांनां झालें व कांहींचें ज्ञान तो **मदीना**पुरींत वास्तव्य करीत असतांनां झालें. कांहीं भागांचें ज्ञान इतर स्थळीं झालें. प्रत्येक सुऱ्यांत लहान मोठ्या

ओव्या ह्मणजे आयत आहेत. **कुरानां**त ६,२२६ आयत आहेत; व ७७,६३९ शब्द आहेत; व ३,२३,०१५ अक्षरें आहेत. **कुरानां**तील नववा सुरा खेरीजकरून बाकी सर्व सुऱ्यांचा आरंभ "दयाळू कृपा करणार व करुणामय परमेश्वराच्या नांवानें" हे शब्द लिहून केलेला आहे. हा ग्रंथ **अरबी** भाषेंत लिहिला आहे. तो पद्यात्मक नाहीं गद्यात्मक आहे; तथापि वाक्याची समाप्ति प्रासबद्ध केलेली आहे. ह्या ग्रंथाची भाषा फारच प्रौढ व रस-भरित आहे. त्यांतील भाषासौंदर्य फारच रमणीय व आल्हाद-दायक आहे. **इस्लामी** लोकांचा असा दृढ विश्वास आहे कीं **अरबी कुरान** ही एक अमानुष गोष्ट असून परमेश्वरानें केलेली चमत्कृति आहे. कित्येक प्रसंगीं **पैगंबरास कुरानां**तील भागाचा आदेश होत असतां तो भयभीत होई, त्याचा जीव कासावीस होऊन जाई, व कधीं कधीं तर तो बेशुद्ध होत असे. **इस्लामी** लोकांचा असा भाव आहे कीं **कुरानां**त जें जें लिहिलेलें आहे तें सर्व परमेश्वराकडून आलेलें आहे. हें ईश्वरी वचन **पैगंबरास गाब्रीएल** दूताकडून मिळत असे. **पैगंबराच्या** मरणकालपर्यंत परमेश्वराकडून त्यास आदेश होत असे. परमेश्वराकडून आलेलें वचन तो लोकांस सांगे व लोक हीं वचनें लक्षांत ठेवीत व त्यांचें टिपणहि करून ठेवीत. **कुरान** ग्रंथांत ह्या ईश्वरी वचनांचा संग्रह करून ठेविला आहे.

**इस्लामा**चीं मुख्य तत्वें संक्षेपतः **कुराना**च्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:— "दयाळू व सहृदय परमेश्वराच्या नामानें हाच ग्रंथ प्राप्त झाला आहे. ह्या **कुरानां**त संशययुक्त विचार सांगितला नाहीं. अदृश्य सृष्टि आहे असें जे मानितात, जे प्रार्थना करण्यांत तत्पर आहेत, आणि **आम्ही** (परमेश्वरानें) जें दिलें आहे त्यांतून जे धर्म करितात, **आम्हीं** तुला जें निवेदन केलें आहे तें सत्य आहे असें जे मानितात आणि तुझ्या पूर्वीं जें **आम्हीं** इतरांस कळविलें होतें तेंहि सत्यच आहे असें जे मानितात अशा जनांप्रत हा **कुरान** ग्रंथ बोध होण्यासाठीं मिळाला आहे." **अरबी** मूर्तिपूजकांस उद्देशून **कुरानां**त परमेश्वराचें वर्णन मोठ्या गंभीर शब्दांनीं केलेलें आहे. तुमचा परमेश्वर हा एकच आहे. तो अद्वितीय आहे. तो परम दयाशील आहे. आकाश पृथ्वी व दिन-रात्रीचें चक्र हीं त्यानेंच उत्पन्न केलीं आहेत. मानवांच्या उपयोगीं पडणाऱ्या पदार्थांनीं भरलेली समुद्रावर तरंगत जाणारी नौका, मृत भूमीस सजीव करणारा आकाशांतून पडणारा पर्जन्य, पृथ्वीवरील चराचर वस्तु, वायूचा वेग, आकाश व पृथ्वी यांच्या अंतरावकाशांत दोलायमान होणारीं अभ्रें या सर्वांवरून ईश्वराचें चातुर्य ज्ञाते लोकांस स्पष्ट दिसून येतें; असें असतांहि कांहीं लोक मूर्तींचे ठायीं भाव ठेवितात; व ईश्वराच्या ठायीं जो प्रेमभाव ठेवायाचा तोच प्रेमभाव मूर्तींच्या ठायीं ठेवितात. परमेश्वरच विजा

लवितो; आणि त्यामुळें तुम्हांस भय उत्पन्न होतें, व पर्जन्य पडण्याची आशाहि उत्पन्न होते. परमेश्वरच पर्जन्यानें भरलेले मेघ तयार करितो व त्यांस चालवितो.

आकाशांतील मेघ आपल्या गर्जनांनीं परमेश्वराची स्तुति गातात. देवलोकींचे जन परमेश्वराची स्तुति करितात. परमेश्वर आपलें वज्र फेंकून इच्छेस येईल त्याचा विनाश करितो; आपण परमेश्वराचाच धांवा केला पाहिजे. एखाद्या वस्तूला परमेश्वरासमान मानल्यानें त्या वस्तूचे ठायीं परमेश्वराची योग्यता यावयाची नाहीं. कारण कीं, कोणत्याहि वस्तूचा कितीहि मोठेपणा असला तरी परमेश्वर हा वस्तुमात्रा पेक्षां फारच उच्च आहे; त्यामुळें यच्चयावत् वस्तुमात्रास परमेश्वराची थोरवी येणार नाहीं. परमेश्वरानें मनुष्य प्राण्यास उत्पन्न केलें; आणि पहा मनुष्यप्राणी वितंडवादी निघाला आहे! परमेश्वरानें तुमच्या उपयोगासाठीं गो-वृषभादि जनावरें उत्पन्न केलीं, आणि सायंकाळीं जेव्हां तीं मेळ्यानें घरीं परत येतात व सकाळीं जेव्हां तीं रानांत चरावयास जातात तेव्हां तीं तुम्हांस मोठीं भूषणावह होतात. दिवस व रात्र हीं त्यानेंच तुमच्या उपयोगा करितां केलीं आहेत.

सूर्य, चंद्र, तारकासमुदाय, हीं सर्व त्यानें घातलेल्या गतीचें उल्लंघन करीत नाहींत. समुद्रहि त्यानें तुमच्या उपयोगीं होईल असा केला आहे. समुद्रावरून नौका चालतात. हें तुम्ही पाहातां तेवढ्या वरून देखील तुम्ही परमेश्वराचे

उपकार मानावे. तेव्हां जो परमेश्वर पदार्थमात्र उत्पन्न करितो त्याची योग्यता व ज्या मूर्ति कांहींहि उत्पन्न करूं शकत नाहींत त्यांची योग्यता समानच आहे काय? ह्या गोष्टीचें मनन करून तुम्ही सावध होणार नाहीं काय? तुमच्यावर ईश्वराचे उपकार इतके झाले आहेत कीं ते तुम्ही जर मोजूं लागलां तर तुमच्यानें ते उपकार मोजवले जाणार नाहींत. ईश्वर प्रेमळ आहे ही निर्विवाद गोष्ट आहे. जें तुम्ही गुप्त ठेवितां व जें जाहीर करितां तीं सर्व परमेश्वरास विदित आहेत. परमेश्वराला सोडून ज्या मूर्तींचें तुम्ही आवाहन करितां त्या मूर्ति तर हातांनीं बनविलेल्या आहेत. ह्या मूर्ति सजीव नसून निर्जीव आहेत. परमेश्वर एकच आहे; परमेश्वरा वांचून दुसरा कर्ता नाहीं, तो जाज्वल्य व अनाद्यनंत आहे. त्याला आलस्य व निद्रा वश करूं शकत नाहीं. आकाश व पृथ्वी यांत जें कांहीं आहे तें त्याचेंच आहे. त्याच्या आज्ञे वांचून त्याजपाशीं शिफारस कोणी करूं शकत नाहीं. त्याची कृपा झाली तरच त्याज-विषयींचें ज्ञान मानवांस प्राप्त होतें. आकाश व पृथ्वी यांचा भार परमेश्वराला वाटत नाहीं. सर्व सृष्टि व सर्व राष्ट्रें त्याचींच नाहींत काय? सर्व जगताचा धनी जो परमेश्वर त्याचें नाम सर्वत्र वंदनीय होवो. त्याच्या सारखा दुसरा कोणी नाहीं. तो अखेरीस न्याय करील त्या दिवशीं दयाशीलपणें तुमचा न्याय करील. हे परमेश्वरा, तुझेंच आम्हीअर्चन करितों; व आह्मांस साह्य मिळावें ह्मणून आम्ही तुझाच धांवा करितों. ज्यांवर तूं कृपा करितोस, व

ज्यांवर तुझा क्रोध होत नाहीं, व जे वावग्या मार्गानें जात नाहींत अशा लोकांचा जो मार्ग तो आह्मांस दाखीव. परमेश्वर प्रेमळ व मंदक्रोध आहे. त्यानें उत्पन्न केलेल्या सृष्टींत जें अनिष्ट आहे त्यापासून माझें रक्षण व्हावें ह्मणून त्याचाच मी आश्रय धरितों. तुम्हांला उंच स्वरानें त्याची प्रार्थना करावयास नको, कारण त्याला हळूहळू केलेली कुजबूजहि माहीत आहे. आकाश व पृथ्वी यांत जें कांहीं आहे तें कोणाचें आहे बरें सांगा. तें सर्व परमेश्वराचें आहे असें ह्मणा. अदृश्य परलोकाचा मार्ग त्याच्याच स्वाधीन आहे. भूमींत व सागरांत काय आहे हें त्याला माहीत आहे. त्याच्या आज्ञे वांचून एक पानहि खालीं पडत नाहीं. भूमीच्या खोल प्रदेशांत पडलेला धान्याचा दाणा-सुद्धां त्याला माहीत असतो. रात्रौ तुम्ही निद्रिस्त असतांनां तो तुमचे आत्मे घेऊन जातो. तुम्ही दिवसभरांत केलेल्या कामाचा मोबदला किती आहे हें तो जाणतो. नेमून दिलेल्या आयुर्मर्यादेचे दिवस पूर्ण व्हावे ह्मणून तुम्हांस पुनः तो जागृत करितो. शेवटीं तुम्ही त्याजकडे जाल, व तुम्हीं काय काय केलें आहे हें नंतर तो तुम्हांस विदित करील. परमेश्वर धान्याच्या बीजांस व खर्जुरिकेच्या बीजांस उलवितो. निर्जीवा-पासून तो सजीव पदार्थ उत्पन्न करितो. तोच सजीवा पासून निर्जीव पदार्थ उत्पन्न करितो. प्रातःसमय तोच घडवून आणतो. आणि विश्रांति घेण्यासाठीं

रात्रहि तोच करितो. परमेश्वर ज्ञानी व समर्थ आहे. त्याच्याच आज्ञेनें हें विश्व झालें आहे. तुमच्यावर परमेश्वराचीच सत्ता आहे. त्याची दृष्टि सर्व वस्तुमात्रावर आहे. ह्मणून तुम्ही त्याचेंच अर्चन करा.

आपली दृष्टि त्यास जाणूं शकत नाहीं; परंतु त्याची दृष्टि सर्व-व्यापी आहे. माझी प्रार्थना, माझी भक्ति माझें जीवित आणि माझें मरण हीं सर्व जगताचा जो धनी परमेश्वर त्याचींच आहेत असें निर्विवादपणें ह्मणा. आकाश व पृथ्वी ह्यांतील सर्व सृष्ट वस्तु परमेश्वराचें स्तवन करितात हें तुह्माला समजत नाहीं काय? आणि पक्षीहि त्याचें स्तवन करीत नाहींत काय? यच्चयावत् सर्व सृष्ट वस्तूंस त्याचें स्तवन कसें करावें हें माहीत आहे. आकाश व पृथ्वींतील राज्यें हीं त्याचींच आहेत. परमेश्वरा खेरीज दुसरा कर्ता नाहीं. तोच जीवन देतो व तोच त्याचा अंत करितो. तोच एक जाज्वल्य परमेश्वर आहे, ह्मणून त्याचा धांवा करा. त्याचें अर्चन दोषयुक्त होईल असें करूं नका. तो अद्वितीय आहे. त्याच्या जोडीला दुसऱ्या कोणास ठेवितां येत नाहीं. त्यानेंच तुम्हांस जगांत आणलें व त्यानेंच तुह्मांला श्रवणेंद्रिय, नेत्रेंद्रिय आणि हृदय हीं दिलीं आहेत; तथापि त्याचे उपकार स्मरणारांची संख्या किती अल्प आहे. हे सत्ताधीश प्रभो, नास्तिक लोकांत मला ठेवूं नको. त्रस्त झालेल्या माणसानें त्याचा धांवा केला तर त्याच्या हांकेस तो उत्तर देतो, व

त्याच्या दुःखाचें निवारण करितो. परमेश्वर सर्वसमर्थ, सर्वज्ञ, सर्वसाक्षी व सत्यस्वरूप असा आहे. तो पश्चात्ताप झालेल्या माणसास क्षमा करितो. वस्तुमात्राचा सत्ताधीश तो असतांनां मीं अन्य देवाकडे जावें काय? शेवटीं तुह्मी परमेश्वराकडे गेलां ह्मणजे तो तुह्मांस तुमच्या मतभेदा विषयीं सर्व प्रकारें स्पष्ट करून सांगेल. उघड गोष्टी जशा समजतात त्या प्रमाणेंच गुप्त गोष्टीहि त्याला समजतात. तो सर्वांत श्रेष्ठ आहे. चार लोकांत उघड्यावर गोष्टी सांगणारा व तसाच आपलें वचन गुप्त ठेवणारा, रात्रीं अंधारांत लपून राहणारा तसाच उघड्यावर दिवसा चव्हाट्यांत राहाणारा ह्या सर्वांविषयीं त्यास सारखेंच ज्ञान आहे. परमेश्वर आकाश व पृथ्वी यांचा प्रकाश आहे. ज्या प्रमाणें ताऱ्या सारख्या चमकणाऱ्या कांचेच्या भांड्यांत असलेला दिवा कोनाड्यांत ठेवावा त्याप्रमाणें त्याचा प्रकाश आहे. उत्तमोत्तम वृक्षावर हा दिवा लावून ठेविला आहे. ह्या प्रकाशास उदय नाहीं व अस्तहि नाहीं. हा दिवा अग्नितेजाशिवाय राहातो. परमेश्वराच्या इच्छेस येईल तिकडे तो आपल्या प्रकाशाला नेतो. मनुष्याची समजूत पडावी ह्मणून परमेश्वर दृष्टांतांनीं त्यांस समजून सांगतो. व्यापार व क्रयविक्रय यां मुळें ज्या माणसाचें मन परमेश्वराच्या ध्याना पासून परावृत होत नाहीं, व जे सतत त्याचें भजन करितात, व दानधर्म करण्यांत तत्पर असतात, व आपलीं नेत्रहृदयादि इंद्रियें एका समयास नष्ट होतील

असें समजून जे भय बाळगून आहेत, त्यांचा विश्वास असा आहे कीं, आपल्या चांगल्या कृत्यांबद्दल परमेश्वर आपल्याला सुफळ देईल. आणि तो आपली कृपा आपल्यावर जास्त वाढवील. परमेश्वराची ज्यांवर कृपा होईल त्यांस तो अनंत मापानें देतो; परंतु अविश्वासी लोकांचीं कृत्यें अरण्यांतील मृगजलासारखीं आहेत. तृषाक्रांत प्रवाशास तें पहिल्यानें पाणी असा भास होतो, पण जेव्हां तो तिकडे जातो तेव्हां त्याला कांहीं आढळत नाहीं. ईश्वर अशा अविश्वासी लोकांच्या सन्निध आहे, आणि तो त्यांला त्यांचा मोजबा देईल. कारण परमेश्वर मोजबा घेण्यांत फार तत्पर आहे; अथवा अविश्वासी माणसें समुद्रावरील निबिड अंधःकाराप्रमाणें आहेत. ज्याला परमेश्वराकडून प्रकाश मिळत नाहीं, त्याला दिसत नाहीं. ह्या परमेश्वरास तूं देखिलें आहेस काय ? जें जें ह्मणून आकाश व पृथ्वी या दोहों स्थळीं आहे तें तें त्याची स्तुति गातें. पक्षी सुद्धां आपले पंख पसरून त्याची स्तुति गातात. प्रत्येक प्राणी आपापल्या समजाप्रमाणें परमेश्वराचें स्तवन करितो; व हे प्राणी काय करितात हें परमेश्वरास समजतें. परमेश्वर मेघांस चारी दिशांस फैलावून देतो; व पुनः त्यांस एके ठिकाणीं करून त्यांचा मोठा जमाव जमवून त्यांमधून पर्जन्याची वृष्टि करितो. त्याचीं कृत्यें तूं पाहिलीं नाहींस काय? परमेश्वर आकाशांतून हिमाचे पर्वत खालीं पाठवून देतो. त्याच्या इच्छेस येईल तिकडे तो ते फेंकतो, व त्याची ज्यांवर कृपा होईल त्यांच्या

पासून ते दूर करितो. त्यानें अवलोकन केल्याबरोबर विजेचें चमकणें नाहींसें होऊन जातें. ज्यांस दृष्टि दिली आहे त्यांनीं ह्या गोष्टींपासून परमेश्वरासंबंधीं ज्ञान करून घ्यावें. दयामय परमेश्वरापासूनच कुरानाचा बोध झाला आहे. परमेश्वरानेंच मनुष्यास उत्पन्न केलें व त्यास वाचा दिली. सूर्य व चंद्र हे आपल्या नेमलेल्या गतीनें चालतात. वृक्ष व वेली ह्या त्याची आज्ञा मानतात. त्यानें आकाश वर उंच करून ठेविलें. नेमलेल्या तुलेचें उल्लंघन होऊं नये ह्मणून तुह्मी खरीं वजनें ठेवित जा; आणि वजन करून देतांनां कमी वजन देऊं नका. कुंभार जसें मृत्तीकेचें पात्र घडतो तसें देवानें मनुष्य-प्राण्यास कोरड्या मृत्तिकेपासून उत्पन्न केलें आहे. ईश्वर पूर्वेचा धनी आहे; आणि पश्चिमेचाहि धनी आहे. त्यानें दोन्ही समुद्रांचें पाणी मोकळें सोडून दिलें आहे. हे दोन्ही समुद्र एकत्र मिळतात पण त्या दोहोंत त्यानें एक अडकण घालून ठेविलें आहे. त्या अडकणाला उल्लंघून दोन्ही समुद्रांच्यानें जाववत नाहीं. समुद्रांमधूनच मोत्यें व पोवळीं निघतात. पर्वताएवढ्या नौका समुद्रांतून तरंगत जातात त्या त्याच्याच आहेत. वस्तुमात्र नाशवंत आहे. परंतु परमेश्वराचें तेजःपुंज मुख अजरामर आहे. आकाशांतील व पृथ्वींतील यच्चयावत् सर्व प्राणी त्याची विनवणी करितात. नित्यशः तो नवीन कांहीं तरी करितो. प्रत्येक मनुष्याच्या गळ्यांत त्याच्या नशीबाची पाटी बांधून ठेविली आहे. सरते शेवटच्या दिवशीं परमेश्वरासमोर

मनुष्यांच्या सर्व कृत्यांचें मोठें पुस्तक उघडलें जाईल. परमेश्वरानें आत्मा केला आणि त्यानें त्यांत सदसद्विवेक करण्याची शक्ति घातली. ह्या आत्म्याची शपथ घेऊन मी तुम्हांस सांगतों कीं, ज्यानें हा आपला आत्मा पवित्र ठेविला असेल, तो धन्य होय; व ज्यानें त्याला भ्रष्ट केलें असेल त्याचा सर्व प्रकारें नाश होईल. करुणामय परमेश्वरानें केलेल्या रचनेंत तुझ्यानें दोष काढवणार नाहीं. अवलोकन कर, दोष तुला दिसतो काय? पुनरपि अवलोकन कर, तुझी दृष्टि मंद होईल व थकून जाईल, परंतु ईश्वराच्या रचनेंत दोष सांपडणार नाहीं. तो निर्जीव मृत्तिकेस सजीव करितो. तसेंच तो तुलाहि पुनः जीवंत करील. आकाश व पृथ्वी जीं आपापल्या स्थळीं आहेत, तीं त्याच्याच आज्ञेनें राहातात. ह्या नंतर जेव्हां तो तुह्मांस पृथ्वीच्या आंतून निघण्यास आज्ञा देईल तेव्हां तुह्मी एका हांके बरोबर बाहेर याल. तेव्हां सूर्य अंधःकारानें वेष्टिला जाईल. तारकासमुदाय अधःपात पावेल, पर्वत फिरूं लागतील. जंगली जनावरें एकत्र होतील. समुद्रांचें जल अत्युष्ण होईल. आत्मा व तो जें शरीर पूर्वी धारण करीत होता हीं दोन्हीं पुनरपि एकत्र होतील. पुस्तकाचीं पानें उघडलीं जातील. आकाशरूप आच्छादन नाहींसें होईल. नरकांतील अग्निज्वाला पेटतील, दिव्य स्वर्ग जवळ येईल त्याच वेळीं प्रत्येक आत्म्यानें काय काय विपरीत केलें आहे हें उघडकीस येईल. महमदा, त्या घडीची माहिती तुला कोठून असणार? त्या घडीचें तुला

ज्ञान आहे काय? ही वेळ परमेश्वरासच माहीत आहे. ज्यांस ह्या घडीची भीति वाटत असेल त्यांस सूचना करणें एवढेंच तुझें काम आहे, जें अपरिहार्य आहे त्याचें ज्ञान तुला कोण शिकवील? **समूद** व **आदी** या लोकांनीं न्यायाचा दिवस येणार ही गोष्ट खोटी आहे असें मानलें. त्यांचा विजांनीं व गर्जणाऱ्या लाटांनीं विध्वंस झाला. परमेश्वराची दया सर्वत्र दूर पसरलेली आहे. दोनप्रहरीं सूर्यप्रकाश असला तरी व रात्रीच्या समयीं अंधार असला तरी तुझ्या परमेश्वरानें तुला त्यागिलें नाहीं; व त्याची तुजवरची कृपाहि कमी झाली नाहीं. गतकालापेक्षां तुला भविष्यकाल सुखकारक होईल. सरते शेवटीं तो तुजवर विपुल दया करील; आणि तूं समाधान पावशील. तूं पोरकाच होतासना? त्यानेंच तुला आधार दिला नाहीं काय? तूं भटकत असतां तोच तुझा मार्गदर्शक झाला नाहीं काय? तूं अडचणींत असतां त्यानें तुला समृद्ध केलें नाहीं काय? ह्मणूनच तूं पोरक्या पोराकडे कधींहि निर्दय दृष्टीनें पाहूं नको. जो तुजजवळ मागतो त्याला झिटकारूं नको. परमेशाची कृपा तुजवर किती झाली आहे, याचें स्मरण कर. खेळणें ह्मणून **आह्मीं** तुह्मांस उत्पन्न केलें असें तुह्मांस वाटलें होतें काय? तुह्मांस आपले कडे पुनः **आह्मी** कधीं घेऊन जाणार नाहीं, असें तुह्मांस वाटलें होतें काय? हे आमच्या परमेश्वरा, जर विसरून आह्मी पापांत पडलों तरी आम्हांस तूं शिक्षा करूं नको. आमचीं

पापें पुसून टाक, आणि आह्मांस क्षमा कर. हे प्रभो, आम्हांवर दया कर. दयाशीलांत तूंच सर्वोत्कृष्ट व श्रेष्ठ आहेस. जे आपल्या स्वतःच्या भारानें लवून गेले आहेत, त्यांच्यानें दुसऱ्याचा भार वाहवणार नाहीं. पहा **आम्हीं** प्रेषित पाठविल्यावांचून कोणास शिक्षा करीत नाहीं. पहा **आम्हीं** ही सर्वांस समजणारी किताब मानवांला सूचना करण्यासाठीं ह्मणून कल्याणदायक रात्रीं खालीं पृथ्वीवर पाठविली; तुला कष्टी करावें अशा हेतूनें पाठविली नाहीं.

परमेश्वरासंबंधीं **कुराना**तील लेख विचार करण्यासारखे आहेत. परमेश्वर सर्वसमर्थ, सर्वज्ञ, सर्वन्यायी, सर्व जगतांच धनी, आकाश व पृथ्वी, जीवन व मरण यांची उत्पत्ति करणारा असा आहे व त्याची सत्ता अनिवार आहे. तो महान् पराक्रमी, सर्वांत श्रेष्ठ, सत्यस्वरूप, लोकांच्या पापपुण्याचा हिशोब घेण्याविषयीं तत्पर असा आहे. प्रत्येक माणसाच्या हातून पुण्य व पाप किती झालें आहे याची रतिनारति तो जाणतो. तो आपल्यावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांच्या सत्कृत्यांची भरपायी करितो. तो राजांचा राजा, अत्यंत पवित्र, प्रशान्त, सर्वांचें विश्वासस्थान, आपल्या दासाचा रक्षक, निराश्रित बालकांचा आश्रय, चुकलेल्यांचा वाटाड्या, संकटांपासून मुक्त करणारा, दुःखी लोकांचें समाधान करणारा, कल्याणदाता, उदार धनी, दयावंत, विलापाचें गाऱ्हाणें श्रवण करणारा, सदा समीप, सदा कृपावंत,

अत्यंत क्षमाशील असा आहे. व त्याचे दयेविषयीं तर सर्व कुरानभर वर्णन आहे. **बिस्मिल्ला हिर्रहमानि र्रहीम** ( अत्यंत दयावंत ) या विशेषणानें **कुरानां**तील प्रत्येक सुऱ्याचा आरंभ केला आहे.

प्रत्येक जण आपल्या पापपुण्याचा जबाबदार आहे. पवित्रता संपादन करण्याविषयीं जो आपलें धन लोकांस देतो तो धन्य. आपल्या उपकाराची फेड व्हावी या हेतूनें नव्हे, पण महान परमेश्वराची कृपा व्हावी या हेतूनेंच जो दुसऱ्यावर उपकार करितो, तो धन्य. स्वतःस अन्नाची जरूरी असतां जे दीन पोरके व दास यांस अन्न देतात ते धन्य. अन्नदान देतांनां हे लोक ह्मणतात, परमेश्वराच्या नांवानें आह्मी तुम्हांस अन्न देतो; तुह्मीं हा आमचा उपकार फेडावा, अथवा तुह्मीं आमच्याशीं कृतज्ञतेनें वागावें या हेतूनें आह्मी तुम्हांस अन्न देत नाहीं. परमेश्वराचीच भक्ति करा. गणगोत, नौकर चाकर, आईबाप निवर्तल्यानें निराधार झालेलीं पोरकीं मुलें व गरीब लोक यांच्याशीं ममतेनें वागा. मनुष्याशीं भाषण करणें तें सरळ भाषण करा. प्रार्थना करा. दान धर्म करा. मातापितरांचा सन्मान करा. नम्र बुद्धीनें व सदय अंतःकरणानें परमेश्वराची प्रार्थना करा. हे प्रभो, माझ्या मातापितरांवर दया कर. मी निराधार होतों त्या वेळीं जशी त्यांनीं माझी जोगवण केली, त्याच प्रमाणें तूं त्यांजवर दया कर. रक्तपात

करून सूड उगविणें, बालहत्या करणें, ह्या ज्या पुरातन कालच्या दुष्ट चाली त्या वर्ज करा; आणि मांसाच्या गोळ्या-प्रमाणें तुह्मी सर्वजण एक जीव होऊन जा. आपला दान धर्म उघड कर, अथवा गुप्त कर. दोन्ही प्रकार चांगलेच आहेत. ज्या दिवशीं व्यवहार चालणार नाहीं, मैत्री राहाणार नाहीं, व परस्परांविषयीं शिफारस चालणार नाहीं, असा दिवस येऊन ठेपण्याच्या अगोदरच जें तुह्मांस मिळालें आहे त्यांतूनच तुह्मी लोकांस द्या. नाहींतर मग तुमच्या हातांत कांहींच राहणार नाहीं. कोणत्या मार्गानें चालावें ह्याचें तुला ज्ञान करून घेण्याची इच्छा आहे काय? ऐक तर. जे दास झाले आहेत त्यांची सुटका कर. जे परस्परांशीं विश्वासूपणें व दयार्द्र बुद्धीनें वागतात, त्यांच्यासारखा तूं विश्वासू व दयार्द्रबुद्धीचा हो. जे गरजवंतास मदत करीत नाहींत, परंतु पवित्रतेच्या सोंवळेपणाचा मोठा ताठा बाळगितात, त्यांचें जिणें धिःक् असो. लोकांस धर्म करितांना त्यांस अपशब्द बोलूं नका, व त्यांस दुखवूं नका. नाहींतर केलेला धर्म व्यर्थ होईल. इजा देऊन एखाद्यावर उपकार करण्यापेक्षां क्षमाशीलता ठेवून मायेचा शब्द बोलणें विशेष श्रेयस्कर आहे. व्याजावर आपली उपजीविका करण्याचें सोडून द्या. माणसांनीं पाहण्याच्या हेतूनें जो आपलें धन खर्चितो तो ज्या खडकावर मातीचा पातळ थर आहे अशा खडका-सारखा आहे. ह्या खडकावर पावसाचें पाणी पडलें कीं माती

सर्व वाहून जाते. खणखणीत दगड मात्र रहातो; परंतु जे आपलें वित्त परमेश्वरास तोषविण्यासाठीं व आपल्या आत्म्याच्या कल्याणासाठीं वेंचितात, ते टेंकाडावर असलेल्या बगीच्यासारखे आहेत. त्याजवर पावसाचें पाणी पडलें ह्मणजे फळफळावळ दुपटीनें उत्पन्न होते. पाऊस न पडल्यास तेथें दंवाचा पुरवठा असतोच.

दोघां माणसांमधील तंट्याचा न्याय करणें तर सत्याकडे दृष्टि देऊन न्याय करा. षड्रिपूंच्या विकारानें झालेल्या बुद्धि-भ्रमा विषयीं सावध असा. नाहींतर परमेश्वराच्या मार्गास सोडून हे मोह तुह्मांस भलतीकडेच वळवितील. परमेश्वरानें इतरांस ज्या देणग्या दिल्या आहेत, त्यांचा लोभ करूं नका. पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे तोंड वळविल्यानें पवित्रता संपादन होत नाहीं. तर परमेश्वराच्याठायीं भाव ठेवल्यानें व सत्कृत्यें करण्यानें पवित्रता जडते. न्याय करण्या विषयीं ताकीद द्या. क्षमा करणें हें आपलें कर्तव्य समजा. लोकांशीं भाषण प्रौढ व मृदू ठेवा व मूर्खांपासून दूर रहा. दुराचरण करण्याविषयीं पाप-पुरुष जर तुह्मांला चिथवील तर परमेश्वराचा आश्रय धरा. पोरक्या मुलांच्या वित्तास शिवूं नका. केलेले करार पूर्ण करा. या धरित्रीवर उद्दामपणें चालूं नका. पोटास मिळणार नाहीं या भयानें बालकांची हत्या करूं नका. त्यांच्यासाठीं व तुमच्यासाठीं **आह्मी** पुरवठा करूं. बालहत्येसारखें दुसरें

पातक नाहीं. परमेश्वरानें तुह्मांस बायका दिल्या आहेत, त्या अशासाठीं कीं, त्यांनीं व तुह्मीं परस्परांनीं प्रेम व दया यांची पुष्पवाटिका लावावी. ज्या तुमच्या मातेनें तुमचा भार आपल्या गर्भांत वाहिला तिचा सन्मान करा. व्यभिचार करूं नका. कारण ती गोष्ट निंदास्पद आहे; व तो मार्ग पापाचा आहे. भाविक माणसानें कामापासून आपली दृष्टि आवरावी. आपलें गणगोत शिवायकरून इतरांच्या समोर स्त्रियांनीं दागिने घालून मिरवूं नये. हें नीट समजून घ्या कीं इहलोकींचें जीवन ह्मणजे फसवणूक आहे. धनधान्य, पुत्रपौत्र यांची समृद्धि होणें हें पाणी पडल्यावर उगवणाऱ्या रोपांप्रमाणें आहे. तीं उगवलीं ह्मणजे शेतकऱ्यांस आनंद होतो. कांहीं वेळानें तीं पिंवळीं पडतात व पुढें झडून जातात. परलोकींच्या जीवनांत पापाबद्दल कडक दंड होईल किंवा पुण्याचरणाबद्दल परमेश्वराकडून क्षमा व शांति हीं मिळतील. सर्व प्रकारचें पाप वर्ज करा. पापच ज्यांनीं संपादन केलें आहे, त्यांस त्यांच्या मिळकतीचा मोबदला मिळेलच मिळेल. मिथ्या अभिमानापासून जे दूर राहतात, कामक्रोधादिकांच्या व्यसनांत जे गर्क होऊन जात नाहींत, जे दानधर्म करितात, परमेश्वराची भक्ति करितात, आपल्या जवळ असलेल्या ठेवी विश्वासूपणें जपून ठेवितात, आपण केलेले करार पुरे करितात, ते सर्वजण अंतकालपर्यंत राहणाऱ्या सुखाचे वांटेकरी आहेत. वृद्धापकालपर्यंत तुमचीं मातापितरें जीवंत राहिलीं

तरी त्यांचें पोषण करा. त्यांस छिट ह्मणून सुद्धां ह्मणूं नका. त्यांस अपशब्द बोलूं नका. त्या दोघांशीं मर्यादेनें व अत्यंत मायेनें भाषण करीत जा. जो तुमच्या गणगोतांतला आहे, जो दीन आहे, व जो मार्गावरून चुकून बहकला आहे, या सर्वांना जें दिलें पाहिजे तें द्या; पण उधळेपणानें खर्च करूं नका. आपला हात आपल्या मानेला घट्ट लावून बसूं नका किंवा अगदीं मोकळा सोडूं नका. नाहीं तर भिक्षा मागून दुःख करीत बसावें लागेल. अपकृत्याची फेड सुकृतानें करा. पुनरुत्थानाच्या दिवशीं **आह्मी** तंतोतंत तराजू आणून ठेवूं. कोणत्याहि आत्म्याचें **आह्मी** रतिमात्र नुकसान करणार नाहीं. माणसाचें सत्कृत्य मोहरीच्या दाण्याच्या वजनाइतकें जरी असलें तरी तें सुद्धां **आह्मी** पुढें आणूं व त्याचें वजन करूं; आणि **आमचा** मोज पूर्ण प्रकारचा होईल. परमेश्वरापाशीं तुह्मी क्षमा मागा; आणि तुम्ही त्याकडे वळा. परमेश्वर ह्मणतो, " तुह्मी माझा धांवा करा, व मी तुमच्या हांकेसरसा तुमच्याकडेस येतों. " लोकांनां सांगा कीं, अहो माझ्या सेवकांनो, तुह्मीं सुमार्गाचें उल्लंघन केलें. त्यांत तुमचेंच अकल्याण झालें. परमेश्वराच्या दयेविषयीं निराश होऊं नका. कारण तो सर्व पापांची क्षमा करितो. तो कृपावंत व दयावंत आहे. जर एखादा चांगला शब्द तुह्मी बोललां तर तो थेट त्याच्या जवळ जाऊन पोंचतो; मी तुह्मांस खरें सांगतों कीं, गुप्तपणें किंवा चवाठ्यावर अमंगल कृत्यांची

व क्रूर कृत्यांची मनाई केली आहे. परमेश्वराला त्याचे मार्गाचें उल्लंघन करणारे लोक आवडत नाहींत, ह्मणून तुह्मी विनम्र भावानें व एकांतीं त्याचा धांवा करा. परमौत्सुक्यानें व भय बाळगून परमेश्वराचा धांवा करा. जे न्याय्याचरणी आहेत त्यांच्या समीपच परमेश्वराची कृपा नांदत असते. आपल्या मातापितरांशीं मायेनें वागत जा, अशी आज्ञा मानवांस दिली आहे. मातेस गर्भ वाहतांनां कष्ट सोसावे लागतात. गर्भाच्या बाहेर मनुष्यप्राणी येतो, तेव्हां तिला बाळंतपणाचे कष्ट सोसावे लागतात. ह्मणूनच मनुष्य ह्मणतो, हे प्रभो, तूं माझ्यावर व माझ्या आईबापांवर जी अत्यंत कृपा केली आहेस त्याबद्दल तुझ्या उपकारांचें मी स्मरण करीन, अशी सुबुद्धि माझ्या अंतःकरणांत तूंच जागी कर. ज्या सुकृत्यांनीं तुला संतोष होईल, तीं सुकृत्यें करण्याची मला सुबुद्धि दे. मला विपुल संतती दे, कारण मी आतां तुजकडे वळलों आहें; व तुझ्या इच्छेनुरूप वर्तन करण्याचा मीं निश्चय केला आहे. अशा लोकांसाठीं शांतीचें भुवन परमेश्वरासन्निध करून ठेविलें आहे; आणि त्यांच्या सत्कृत्यांबद्दल परमेश्वर त्यांचा रक्षक बनला आहे. जे परमेश्वराच्या कार्यासाठीं आपल्या द्रव्याचा व्यय करितात ते एखाद्या धान्याच्या उत्तम दाण्याप्रमाणें आहेत. हा एकच दाणा पेरला तर त्याला सात कणसें येतात; आणि प्रत्येक कणसांत १००, १०० दाणे असतात. जे परमेश्वराच्या

कार्यासाठीं आपला संचय वेंचितात, व वेंचल्यावर ज्यांला दुःख किंवा पश्चात्ताप होत नाहीं, त्यांस त्यांच्या प्रभूकडून उत्तम बक्षीस मिळेलच मिळेल. त्यांच्यावर कधीं संकट येणार नाहीं; व त्यांस दुःख होणार नाहीं. आत्म्याला जितकी ताकद आहे तितकेंच ओझें परमेश्वर त्याला उचलायाला सांगेल. शक्तीबाहेरचें ओझें उचलण्यास लावणार नाहीं. हे प्रभो, आमच्या पूर्वीं जीं माणसें होऊन गेलीं, त्यांच्यावर जितकें ओझें लादलें होतें, तितकें ओझें आह्मांवर लादूं नको. हे प्रभो, जी गोष्ट आमच्या शक्तीच्या बाहेर आहे, ती आमच्यावर सोंपूं नको. परंतु हे प्रभो, आमचीं पापें पुसून टाक. आमच्या अपराधांची क्षमा कर. आमच्यावर दयादृष्टि असूं दे. हे प्रभो, जे सत्वशील, सत्यशील, विनम्र, परोपकारी, प्रतिदिवशीं प्रातःसमयास क्षमा भाकणारे, विभवाच्या समयीं दानशूर व विजयाच्या समयीं क्रोधास आवरून धरणारे, अन्यायी लोकांच्या अपराधांची क्षमा करणारे, या सर्वांचें वसतिस्थान त्यांच्या प्रभूच्या समीपभागीं आहे. त्यांच्यावर परमेश्वराची कृपा पूर्णपणें नांदत असते. हे प्रभो, आमच्या पापांची क्षमा कर. आमचीं दुष्ट कृत्यें आह्मांपासून लपवून ठेव; आणि न्यायशील लोकांच्या समवेत आह्मांस मरण येऊं दे. प्रभूचें उत्तर अशा लोकांस असें आहे कीं, " तुह्मांमध्यें जे कोणी मेहनत घेऊन काम करणारे आहेत, त्यांनीं केलेलें कार्य मी निष्फळ होऊं देणार नाहीं. " ज्या प्रभूच्या नामानें

तुह्मी परस्परांसाठीं कृपा भाकितां त्या प्रभूचें भय धरा. ज्या स्त्रियांचें लग्न तुमच्या बापाबरोबर झालें आहे, अशा स्त्रियांबरोबर तुह्मी विवाहसंबंध करूं नका. परमेश्वराच्या देणग्या मिळाल्यामुळें जे लोक तुह्मांमध्यें अधिक योग्यतेचे झाले आहेत त्यांचा हेवा करूं नका. मातापितरें, गणगोत, पोरकीं मुलें, अनाथ शेजारी, वाट चुकलेला प्रवासी, तुमचे गुलाम, या सर्वांशीं ममतेनें वागा. आपल्या मुखानेंच आपली स्तुति करणारे व गर्विष्ठ यांवर परमेश्वराचें प्रेम बसत नाहीं. जो मनुष्य दुसऱ्याचे कल्याणासाठीं मध्यस्थी करील त्याची हानि न होतां लाभच होईल. परंतु जो कुबुद्धीनें मध्यस्थी करील त्यास तसेंच फळ मिळेल. परमेश्वराची दृष्टि चोहों दिशांस आहे. अहो **मुसलमानां**नो, न्यायास बळकट धरून असा. जेव्हां परमेश्वराच्या समोर साक्ष द्याल तेव्हां ती तुमच्या किंवा तुमच्या मातापितरांच्या अथवा गणगोताच्या अथवा श्रीमान् अगर दरिद्री मनुष्याच्या विरुद्ध असली तरी तुह्मी खोटी साक्ष देऊं नका. दोघांहि पक्षकारांचा साह्यकारी परमेश्वर आहे. तुमच्यानें साह्य करवणार नाहीं ह्मणून षड्रिपूंच्या नादास लागूं नका. नाहीं तर सत्याचा अपलाप करावा लागेल. **पैगंबरा**चा सदोदित उपदेश असाच असे कीं ज्यांला परमेश्वराचेंच सान्निध्य पाहिजे असेल त्यांनीं अनाथ बालकांस आश्रय द्यावा; दीन व दुबळे झालेल्या लोकांस साह्य करावें; व बंदींत पडलेल्या माणसांस बंधमुक्त करावें. फक्त मानव प्राण्यां-

वरच **पैगंबरा**ची प्रेमदृष्टि असे असें नाहीं. मुक्या जनावरांचा सुद्धां त्याच्या सदय हृदयांत कळवळा असे. एके प्रसंगीं एक मनुष्य लहानसें बोचकें घेऊन त्याच्याकडे आला, आणि ह्मणूं लागला कीं हे **पैगंबरा**, मी जंगलांतून चाललों असतां, लहान पक्ष्याची चिवचिव मीं ऐकिली. त्या लहान पिलांना उचलून घेऊन मीं आपल्या सत्रंजींत गुंडाळून घेतलें. मग त्या पिलांची आई मजकडे पंख फडफडवीत आली व माझ्या डोक्याभोंवतीं घिरट्या घालूं लागली. **पैगंबर** त्या मनुष्यास बोलला, त्या पिलांनां सत्रंजींतून बाहेर काढून ठेव. त्या माणसानें पिलें खालीं ठेवल्यावर लागलीच त्या पिलांची आई पिलांमध्यें जाऊन मिळाली. हें पाहून **पैगंबर** बोलला, आई आपल्या पोरांवर इतकें प्रेम करिते हें पाहून तुला आश्चर्य वाटतें काय ? बाबा, यांत आश्चर्य नाहीं, ज्यानें मला पाठविलें आहे, त्याची शपथ घेऊन मी तुला सांगतों कीं, आई आपल्या पिलांवर जितकी ममता करिते त्यापेक्षां फारच अधिक प्रमाणानें परमेश्वर आपल्या सेवकांवर ममता करितो. जेथून तूं त्या पक्ष्याचीं हीं पिलें आणिलींस, तेथेंच तूं तीं नेऊन ठेव ह्मणजे तीं व त्यांची आई एकत्र सुखानें राहतील. मुक्या जनावरांशीं वागतांनां परमेश्वराचें भय धरून वागा. जेव्हां तीं बसण्याजोगीं असतील, तेव्हां त्यांच्यावर बसा, व तीं दमून गेलीं ह्मणजे त्यांवरून खालीं उतरा. मुक्या जनावरांवर दया केली असतां, ह्मणजे त्यांस तहान लागली तर पाणी

पाहिजे असतां आपणांस परमेश्वराकडून चांगला मोबदला मिळणारा आहे हें लक्षांत ठेवा. कुरानांत मनुष्यप्राण्यांचें जीवित व मुक्या जनावरांचें जीवित हीं दोन्हीं समसमान धरिलीं आहेत. पृथ्वीवर चालणारे चतुष्पाद प्राणी अथवा हवेंत उडणारे पक्षी यांचे मानवसमुदायासारखेच समुदाय आहेत. त्यांची धांव परमेश्वराकडे आहे.

---

# अध्याय बारावा.

## इस्लाम.

**इस्लामी** धर्माचे मुख्य दोन विभाग करितात. एक विचार व दुसरा आचार. विचार ह्मणजे ज्या सिद्धांतांवर प्रत्येक **इस्लामी** धर्म मानणाऱ्या मनुष्याचा विश्वास असणें अवश्य आहे असे सिद्धांत. ह्या विभागास **ईमान** ह्मणतात. आचार ह्मणजे जे जे विधि प्रत्येक **इस्लामी** धर्म मानणाऱ्यानें पाळले पाहिजेत अशा विधींचीं प्रकरणें. ह्या विभागास **दीन** ह्मणतात.

**ईमाना**चे सिद्धांत येणेंप्रमाणें आहेत.

( १ ) पहिला सिद्धांत. परमेश्वर एकच व अद्वितीय आहे. तो सनातन, निर्देह, निरंश, निर्भाव, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, सर्व गोचर व अगोचर पदार्थांचा उत्पन्नकर्त्ता व रक्षक, निर्विकल्प, स्वयंभू, स्वेच्छ, क्षमाशील, प्रेमळ, सर्व-वैभवसंपन्न, सर्वसाक्षी, सर्वस्तुत्य, तो आदि व तोच अंत.

राजांचा राजा, स्वयंप्रकाश, सन्मार्गदर्शक, अतुल्य, अत्यंत सहनशील, जाज्वल्य, सज्जनांस सुख देणारा, दुर्जनांस दंड करणारा, सदा विजयी, सर्वव्यापी, उदार, इत्यादि गुण-युक्त आहे.

( २ ) दुसरा सिद्धांत. दिव्य लोकीं परमेश्वराची सेवा करणारे देवदूत आहेत. ते निष्पाप आहेत. ते परमेश्वरा-समीप असतात. ते आज्ञाधारक आहेत. ते आकारानें अव्यंग, प्रकाशमान, लिंगभेदरहित, षड्रिपूंच्या विकारापासून निर्बाधित, मातृपितृविरहित असे आहेत.

( ३ ) तिसरा सिद्धांत. मानवाच्या उद्धाराकरितां व त्याला सत्याचा मार्ग दाखविण्याकरितां परमेश्वरानें दिव्य लोकांतून निरनिराळ्या प्रसंगीं आज्ञालेख पाठविले आहेत. ह्या आज्ञालेखांची संख्या सुमारें १०४ आहे. परमेश्वरानें **आदम** यास दहा आज्ञालेख दिले. **शीस** यास पन्नास आज्ञालेख दिले. **इद्रीस** अथवा **इनाक** यास तीस आज्ञालेख दिले. **इब्राहीम** यास दहा आज्ञालेख दिले. याशिवाय चार प्रेषितांस चार ग्रंथ दिले. ते येणेंप्रमाणें. **मूसा** यास **तौरेत** नांवाचा ग्रंथ दिला. **ईसा** यास इंजील ग्रंथ दिला. दाऊद यास झबूर ग्रंथ दिला. **महमद** यास **कुरान** ग्रंथ दिला.

( ४ ) चौथा सिद्धांत. परमेश्वरानें मानवांपैकीं कित्येकांस निवडून काढून त्यांस प्रेषित ह्मणजे आपले दूत ह्मणून नेमिलें. या प्रेषितांनीं अनादिकालापासून चालत आलेला

सत्याचा मार्ग मानवांस निरनिराळ्या प्रसंगीं विदित केला. परमेश्वराकडून त्यांनां जशी आज्ञा मिळे तशी ते मानवांस ती आज्ञा देत अथवा निषेध करीत. त्यांनां प्रसंगोपात्त चमत्कार दाखविण्याचें सामर्थ्य दिलें होतें. प्रेषितांपैकीं **आदाम** यास **सफीयुल्ला** ह्मणजे परमेश्वराचा आवडता असें ह्मणतात. **नू** यास **नबीउल्ला** ह्मणजे परमेश्वराकडून आलेला प्रेषित असें ह्मणतात. **इब्राहीम** यास **खलीलुल्ला** ह्मणजे परमेश्वराचा मित्र असें ह्मणतात. **मूसा** यास **कलीमुल्ला** ह्मणजे परमेश्वराबरोबर बोलणारा असें ह्मणतात. **ईसा** यास **रुहुल्ला** ह्मणजे परमेश्वराकडील आत्मा असें ह्मणतात. **महमद** यास **रसूलल्ला** ह्मणजे परमेश्वराचा **पैगंबर** (प्रेषित) असें ह्मणतात.

हे सर्व प्रेषित परमेश्वराकडून आले व त्यांनीं जें जें सांगितलें तें परमेश्वराच्या आज्ञेनें सांगितलें असा विश्वास असणें अवश्य आहे. **महमद** हा शेवटला **पैगंबर** आहे व याउपर दुसरा कोणी **पैगंबर** येणार नाहीं असाहि विश्वास असणें अवश्य आहे.

( ५ ) पांचवा सिद्धांत. काळाच्या अंतीं शेवटला दिवस येईल व त्या वेळीं सर्वांच्या पापपुण्याचा न्याय होईल असा विश्वास असणें अवश्य आहे. परमेश्वर त्या दिवशीं प्रत्येक मानवास त्याच्या कृत्याप्रमाणें फल देईल. त्या दिवशीं सर्वांचीं शरीरें व आत्मे पुनः एकत्र जोडले जातील. तराजूच्या एका पारड्यांत प्रत्येक मनुष्याचें सुकृत व दुसऱ्या पारड्यतां

त्याचें दुष्कृत घालून त्या दोघांचा तोल केला जाईल आणि पारड्यांत सुकृताचें वजन अधिक झाल्यास त्या मनुष्याला सुखलोक प्राप्त होईल व दुष्कृताचें वजन अधिक झाल्यास त्याला दुःखलोक प्राप्त होईल.

( ६ ) सहावा सिद्धांत. परमेश्वरानें सर्व गोष्टी अगोदरच ठरवून ठेविल्या आहेत. जें जें कांहीं आज होत आहे, व जें कांहीं आजपर्यंत झालें, जें पुढें भविष्यकाळीं होणार आहे त्या सर्वांची रचना परमेश्वरानें पूर्वीपासून करून ठेविली आहे. परमेश्वरानें हा केलेला नियम कोणत्याहि उपायांनीं पालटतां येणार नाहीं.

वर दिलेले सिद्धांत हे खरे आहेत असें प्रत्येक **इस्लामी** मनुष्यानें मानिलेंच पाहिजे.

धर्मवासना सतत जागृत राहावी या हेतूनें **महमद पैगंबर** यानें आचार अथवा **दीन** या प्रकरणांत मुख्य मुख्य अशीं पांच कर्मे करण्याची अवश्यकता ठरविली आहे. ( १ ) **कलमा** ह्मणजे मतांगीकार, ( २ ) **नमाज** ह्मणजे प्रार्थना, ( ३ ) **रोजे** ह्मणजे उपवास, ( ४ ) **जकात** ह्मणजे दानधर्म, ( ५ ) **हज्ज** ह्मणजे मक्केची यात्रा, अशीं हीं नेमलेलीं पांच कर्मे आहेत. मतांगीकार ह्मणणें ह्मणजे सहा कलमांचा उच्चार करणें होय.

१ पहिला कलमा येणेंप्रमाणें आहे,

॥ ला इलाहा इल्लल्ला हो
॥ मोहंमदु रसूलिल्ला हे ॥

याचा अर्थ. परमेश्वरावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं. **महमद** हा परमेश्वराचा **पैगंबर** आहे.–

दुसरा कलमा.—

॥ अशहदो अन् ला इलाहा इल्लल्ला हो ॥

॥ वह्दहू ला शरीका लहू ॥

॥ व अशहदो अन्नमोहंमदन् अबदहू व रसूलुहू ॥

याचा अर्थ. मी साक्ष देतों कीं, परमेश्वरावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं. तो अद्वितीय आहे. त्याची बरोबरी करणारा दुसरा कोणी जोडीदार नाहीं.

आणि माझी अशीहि साक्ष आहे कीं, **महमद** हा ( परमेश्वरानें ) उत्पन्न केलेला ( मनुष्य ) प्राणी आहे; व तो परमेश्वराचा **पैगंबर** आहे.

तिसरा कलमा.—

॥ सुबहान् अल्लाह वल्हमदुलिल्लाह ॥

॥ वला इलाहा इल्लल्लाहो वल्ला हो अक्बर ॥

॥ वलाहौला वला कुव्वतो इल्ला बिल्ला हिल अलियुल अझीम ॥

याचा अर्थ. परमेश्वर परम पवित्र आहे; व तो सर्वसुवंद्य आहे. परमेश्वरावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं. परमेश्वर सर्वांत श्रेष्ठ आहे. ह्या श्रेष्ठतम परमेश्वराच्या कृपेशिवाय कोणाहि मानवास पापापासून दूर राहातां येत नाहीं; व त्याच्याच कृपेशिवाय कोणासहि त्याचें अर्चन करितां येत नाहीं.

चौथा कलमा.—

॥ माशा अल्लाहो काना व माल्लायशाओ लम यकुन् ॥

॥ ला इलाहा इल्ललाहो वह्दहू ला शरीकालहू ॥

॥ लहुल मुलको व लहुल हमदो युहयी व् यमूतो व हुवा हय्युन ॥

॥ लायमूतो दायमुन कायमुन अबदा वहोवा जुल जलाले वल इक्राम ॥

याचा अर्थ. परमेश्वरानें इच्छिलेली गोष्ट घडून आली. तो जें इच्छीत नाहीं तें कदापि होणार नाहीं. परमेश्वरावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं. तो अद्वितीय आहे. त्याची बरोबरी करणारा दुसरा कोणी जोडीदार नाहीं. सर्व विश्व हें त्याच्याचकरितां उत्पन्न झालें. तो सर्वसुवंद्य आहे. तोच उत्पन्न करितो व तोच लय करितो. तो अजरामर आहे. मृत्यूची सत्ता त्यावर चालत नाहीं. तो आदिअंतविरहित आहे. सर्व वैभव त्याचेंच आहे.

पांचवा कलमा.—

॥ अल्लाहुम्मा इन्नी आउझोबेका मिन् अन् उश्रिका बिका ॥

॥ शैअन व अना आलमु वस्तगफिरोका लिमा ला आलमो ॥

॥ बिही, तुबते अनहो. व तबर्रा तो मिनलकुफ्रे व शिरके ॥

॥ वल किजबे वल गीबरो बल बोहताने वल माआसी कुल्ले हा ॥

॥ व अस्लमतो व आकुलो ला इलाहा इल्लल्लाहो मोहंमदुर्रसूलिल्लाहे. ॥

याचा अर्थ. हे परमेश्वरा, जाणूनबुजून अथवा अज्ञानपणें जर मीं एखाद्या वस्तूस तुझ्याशीं जोडीदार मानलें असलें तर त्या पापाबद्दल तूं मला क्षमा कर. त्याबद्दल मला पश्चात्ताप होत आहे. असत्य धर्माचा मला तिटकारा आहे. त्याचप्रमाणें एखाद्या वस्तूस तुझ्याशीं जोडीदार करणें, चहाडी करणें, इतरांवर मिथ्या दोषारोप करणें व सर्व प्रकारचीं इतर पापें यांचा मला वीट आला आहे. मी विनम्रभावानें ह्मणतों, कीं परमेश्वरावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं; आणि **महमद** हा परमेश्वराचा **पैगंबर** आहे.

सहावा कलमा.—

॥ अस्तग फिरूल्लाहा रब्बी मिनकुल्लेझमबिन अजनपतोहू ॥
॥ अमदन औखताअन् सिर्रन्न औअलानेयतन ॥
॥ व अतूबो इलेहे मिनजंबील्लजी आलमो व मिनजंबील्लजी ॥
॥ ला आलमो इन्नका अंता अल्लामुल गुयूबे ॥
॥ व सत्तारुल उयूबे व गफ्फारुल जुनूबे ॥
॥ व कश्शाफुल कुरुबे व ला हौलो व ला कुव्वतो इल्लाबिल्ला॥
॥ हिल अलियुल अझीम ॥

याचा अर्थ. जाणूनबुजून अथवा अज्ञानपणें, गुप्तपणें अथवा उघडपणें, जीं जीं माझ्या हातून पापें झालीं असतील त्यांबद्दल मी परमेश्वरापाशीं क्षमा मागतों. जाणूनबुजून जें माझ्या हातून पाप झालें असेल त्याबद्दल मला पश्चात्ताप झाला आहे. अज्ञानपणें जें माझ्या हातून पाप घडलें असेल त्याबद्द-

लहि मी पश्चात्ताप करितों. हे परमेश्वरा, खरोखरच, झांकून ठेविलेल्या गुप्त गोष्टी तुला माहीत आहेत. तूं अपराधांवर झांकण घालितोस. तूं पापांची क्षमा करितोस. सर्वांत श्रेष्ठ व सर्वांहून थोर जो परमेश्वर त्याच्या साह्यावांचून मला पापांपासून दूर राहातां येत नाहीं व त्याच्याच साह्यावांचून त्याची भक्ति करण्याची मला शक्ति नाहीं.

## नमाज.

अत्यंत श्रेष्ठ व सर्वां ठायीं असणाऱ्या महान् शक्तीचा मनुष्यास साक्षात्कार होतो व सृष्टींत सतत चालणाऱ्या कलहांत त्याचें स्वतःचें दौर्बल्य त्याच्या अनुभवास येतें; परंतु आपली स्थिति सुखकारक आहे हें पाहून त्याला समाधान होतें, व त्याच्या अंतःकरणांत विश्वचालक परमेश्वराविषयीं प्रेमाचा पूर येतो व तो मनुष्य प्रेमळ अशा शब्दांनीं आपली कृतज्ञता दाखवितो. तसाच तो अनुतापी होऊन परमेश्वराची विनवणी करितो, ह्यालाच नमाज अथवा प्रार्थना ह्मणून ह्मणावयाचें. ज्या ज्या संस्थेला धर्म ह्मणून ह्मणतां येईल त्या त्या संस्थेंत परमेश्वराच्या प्रार्थनेविषयीं कांहीं तरी व्यवस्था व कांहीं तरी नियम ठरविलेले असतात. मनुष्याच्या अंतःकरणांत सर्वदा परमेश्वराचें स्मरण राहावें; व त्याचें मन संसाराकडेच गुंतून राहूं नये, या उद्देशानें परमेश्वरानें प्रार्थनेच्या वेळा बांधल्या आहेत. अंतःकरणाची शुद्धि व मनाची उन्नति व दुराचारापासून निवृत्ति

प्रार्थनेपासून किती होते ही गोष्ट कुरानांत फारच स्पष्ट करून दाखविली आहे. तुला जी किताब प्रगट करून दिली आहे त्यांतून पठण करीत जा. कारण प्रार्थनेपासून पाप व मलीन विचार यांविषयीं मन परावृत्त होतें. परमेश्वराचें स्मरण करणें हें पुण्यकर्म आहे.

प्रार्थना करण्याची पद्धत सांगितली आहे ती अशी आहे. प्रार्थनेचा समय झाला ह्मणजे प्रथमतः मणगटापर्यंत हात तीनदां धुवावे, तीन चुळा भराव्या, तीनदां नाक आंतून धुवावें, तीनदां मुख धुवावें; पुनः तीनदां कोंपरापर्यंत हात धुवावे; हात पाण्यानें ओले करून ते हात डोक्यावरून फिरवावे, तेच ओले हात कानांवरून व कानांच्या आंतून फिरवावे, नंतर एका हातां-तलीं बोटें दुसऱ्या हातांत घालून बोटें साफ करावीं. नंतर गोफ्यापर्यंत पाउलें पाण्यानें धुवावीं. ज्या स्थळीं आपण उभे आहों तें स्थळ स्वच्छ असल्यास त्यावर स्वच्छसें कापड पसरावें व मक्केकडे मुख केल्यावर पुढें लिहिलेल्या वाक्यांचा उच्चार करावा. " ज्या परमेश्वरानें सर्व विश्व उत्पन्न केलें त्याच्याकडे मी आपलें मुख एकाग्र चित्तानें वळवितों. जे लोक परमेश्वराशीं एखाद्या वस्तुची शराकत करितात त्यांपैकीं मी नाहीं." या समयीं दोन्ही हात कानांपर्यंत न्यावे व "अल्ला हो अकबर" ( परमेश्वर सर्वांत श्रेष्ठ आहे ) असें ह्मणून डाव्या हातावर उजवा हात ठेवून दोन्ही हात जुळवून पोटाशीं ठेवून ह्मणावें, "हे परमेश्वरा, तूं परम-पवित्र आहेस. तूं सर्व-

सुवंद्य आहेस, तुझें नाम अत्यंत कल्याणदायक आहे. तुझा महिमा फार थोर आहे. तुझ्या शिवाय दुसरा कोणी परमेश्वर नाहीं." प्रार्थनेचा विधि सुरू करण्यापूर्वी सहा गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे. (१) देह सर्व प्रकारें शुचिर्भूत करावा. (२) अंगावर निर्मळ वस्त्र परिधान करावें. (३) शुचिर्भूत अशा स्थळीं उभें राहावें. (४) मक्कापुरी ज्या दिशेस आहे त्या दिशेकडे मुख करून उभें राहावें. (५) आपण, परमाश्रेष्ठ परम-समर्थ व परम-दयाशील अशा परमेश्वरापुढें उभे आहों अशी मनाची पक्की धारणा करून अत्यंत विनम्रभाव धरावा. (६) अंतःकरणांतून मलीन विचार काढून परमेश्वराकडे एकाग्र चित्त लावावें. दिवसभरांत प्रार्थनाविधि करण्याचे पांच समय नेमले आहेत. ह्या पांचहि समयीं प्रार्थना अवश्य करावी. अधिकदां केल्यास विशेष श्रेयस्कर आहे. हे पांच समय येणेंप्रमाणें आहेत.

(१) पहिला समय.—प्रातःकाळीं सूर्योदयापूर्वी.

(२) दुसरा समय.—दोनप्रहर उलटल्यावर सूर्य कलूं लागला ह्मणजे लागलीच.

(३) तिसरा समय.—चौथ्या प्रहरीं सूर्यास्तापूर्वी.

(४) चौथा समय.—सूर्यास्तानंतर व अंधार पडण्याचे पूर्वी.

(५) पांचवा समय.—अंधार पडल्यानंतर मध्यरात्रीपर्यंत.

वर सांगितलेली प्रार्थना प्रत्येक समयास ह्मटल्या नंतर **सुरे फाते हा** ह्मणजे **कुरानां**तील पहिला अध्याय ह्मणावा. तो येणेंप्रमाणें आहे.

करुणामय, कृपामय अशा परमेश्वराच्या नांवानें.

परमेश्वरच स्तवनास पात्र आहे.

तो जगतांचा प्रभु आहे.

तो करुणामय व दयामय आहे.

तो सरते शेवटीं जो न्यायाचा दिवस येणार आहे त्याचा धनी आहे.

तुझीच आह्मी सेवा करितों; आणि तुझ्याच समीप आह्मी साह्य मागतों.

ज्या जनांवर तुझी कृपा नांदत आहे अशा जनांचा जो सत्याचा मार्ग तो आह्मांस दाखव; ज्या जनांवर तुझा क्रोध झाला आहे अथवा जे जन भूल पावून भलत्याच मार्गानें चालतात त्यांचा मार्ग आह्मांस दाखवूं नको.

याशिवाय **कुरानां**तील दुसरा एखादा अध्याय अथवा अध्यायांतील भाग ह्मणावा.

नंतर "अल्लाहो अकबर" असा उच्चार करून हात गुडघ्यावर टेंकावे व "हे माझ्या परमेश्वरा, तूं परमपवित्र व सर्वांत श्रेष्ठ असा आहेस" असें तीन वेळां किंवा अधिक वेळां परंतु विषम वेळां ह्मणावें. नंतर पूर्वीप्रमाणें कंबर सरळ करून उभें रहावें व "समे अल्लाहो लेमन हमेदः" जो परमेश्वराची स्तुति करितो

त्याची तो ती स्तुति श्रवण करितो असें ह्मणावें व पुनः "अल्लाहो अकबर" ह्मणून साष्टांग नमस्कार घालावा. व "हे परमेश्वरा, तूं परमपवित्र आहेस व तूं सर्वांत श्रेष्ठ आहेस" असें तीनदां ह्मणावें. नंतर "अल्लाहो अकबर" ह्मणून गुडघे टेंकून व त्यांवर हात ठेवून बसावें. पुनः "अल्लाहो अकबर" असा उच्चार करून पूर्ववत् साष्टांग नमस्कार घालावा; व "हे परमेश्वरा, तूं परमपवित्र आहेस व सर्वांत श्रेष्ठ आहेस" असा तीनदां उच्चार करावा; व "अल्लाहो अकबर" ह्मणून उभें रहावें.

पहिल्यापासून वर सांगितल्याप्रमाणें आणखी एकदां करावें. नंतर खालीं बसून असें ह्मणावें कीं "सर्व प्रकारचें स्तवन प्रार्थना व पवित्र वस्तु परमेश्वरासाठींच आहेत. हे **पैगंबरा**, तुजवर शांति असो. परमेश्वराची दया व त्याचा आशीर्वाद तुजवर असो. आमच्यावर व परमेश्वराचे जे निःसीम व पवित्राचरणी भक्त आहेत त्यांच्यावर परमेश्वराची शांति असो; व मी साक्ष देतों कीं, परमेश्वरावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं. तो अद्वितीय आहे. त्याची बरोबरी करणारा दुसरा कोणी शराकतदार नाहीं; आणि माझी अशीहि साक्ष आहे कीं, **महमद** हा परमेश्वरानें केलेला ( मनुष्य ) प्राणी आहे; व तो परमेश्वराचा **पैगंबर** आहे. हे माझ्या परमेश्वरा, **पैगंबरावर** व त्याच्या वंशजांवर आशीर्वाद पाठव व त्यांच्यावर शांति असो. हे परमेश्वरा, **इब्राहीम** व त्याच्या वंशजांवर जसा

तूं आशीर्वाद पाठविला होतास तसाच **पैगंबरावर** व त्याच्या वंशजांवर आशीर्वाद पाठव. हें सत्यच आहे कीं तूं सर्वसुवंद्य व सर्वांत श्रेष्ठ असा आहेस."

"हे अत्यंत दयाळू परमेश्वरा, आपल्या दयेनें मला क्षमा कर व माझ्या मातापितरांस व माझ्या गुरूंस व सर्व भाविक स्त्रीपुरुषांस व ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून तुझ्या इच्छेनुरूप आपलें वर्तन ठेविलें आहे त्या सर्वांची तूं क्षमा कर."

नंतर उजवे बाजूस मुख करून त्या बाजूकडे जो देवदूत असतो त्याला उद्देशून ह्मणावें, "तुझ्यावर परमेश्वराची दया व शांति असो." डाव्या बाजूकडे मुख वळवून त्या बाजूकडे जो देवदूत असतो त्याला उद्देशून ह्मणावें कीं "तुझ्यावर परमेश्वराची दया व शांति असो."

ह्याप्रमाणें प्रातःसमयीं दोन वेळां, दोनप्रहरीं चारदां, चवथ्या प्रहरीं चारदां व सायंकाळीं तीनदां व रात्रीच्या प्रार्थनेच्या वेळीं चारदां असें १७ दां वर सांगितलेला प्रार्थनेचा सर्व विधि करावा.

**पैगंबर** ज्या प्रकारची प्रार्थना करीत होता ती अशीः— "हे प्रभू, तुजवरचा आमचा भाव दृढ राहील व सत्याचरणाकडे मति लागेल असें तूं कर. चांगल्या मार्गाचा अवलंब करून तुझी भक्ति माझ्या हातून घडेल असें तूं कर. मजवर तूं जी दया केली आहेस त्याबद्दल मी तुझा उपकार स्मरून तुझें स्तवन करण्यास तूं मला साह्य कर. तुझ्या दृष्टीनें जें पाप

आहे त्यापासून माझा बचाव कर. या जिव्हेकडून सत्य भाषण होईल, व तुला संमत असें सदाचरण माझ्या हातून होईल अशी बुद्धि तूं मला दे; व तुझ्या दृष्टीनें ज्या मलीन गोष्टी आहेत त्या माझ्याकडून झाल्या असल्यास त्यांबद्दल मला क्षमा कर. हे माझ्या प्रतिपालका, मी तुझें स्मरण करीन; आणि मी तुझें स्तवन करीन व माझ्यांत जितकें सामर्थ्य तूं ठेविलें आहेस त्याहून अधिक मीं तुझी भक्ति करावी ह्मणून तूं मला साह्य कर. हे प्रभू, मीं आपल्या आत्म्याचा नाश करून घेतला आहे. तुझ्या सेवकांचे अपराध क्षमा करणारा तूंच आहेस. तूं प्रेमळ आहेस. ह्मणून तूं माझ्या अपराधांची क्षमा कर, व मजवर दया कर. ही गोष्ट सत्य आहे कीं, तूं अपराधांची क्षमा करितोस; आणि तूं आपल्या सेवकांस पुष्कळ कल्याणदायक आशीर्वाद देतोस."

**दाउदाची** प्रार्थना ह्मणून आणखी एक प्रार्थना पुरातनकाळापासून चालत आलेली आहे. ती अशी. "हे प्रभू, तुजवर माझें प्रेम जडेल असें तूं कर. मजवर जे जे प्रेम करितात त्यांजवर माझें प्रेम राहील असें तूं कर. तुझें प्रेम मला संपादन करितां येईल अशींच माझ्या हातून कृत्यें घडूं दे. स्वतःपेक्षां, व माझ्या कुटुंबांतील माणसांपेक्षां, व धनापेक्षां तूं मला अधिकच प्रियतर होशील असें तूं माझेकडून करव." **इस्लामाचें** असेंहि शिकविणें आहे कीं, परमेश्वराची प्रार्थना व तत्संबंधी

विधि हे पृथ्वीतलाचेठायीं आकाशाखालीं हवे त्या स्थळीं करितां येतात. तसेंच ज्या ज्या स्थळीं ह्मणून परमेश्वराची प्रार्थना व भक्ति केली जाते, तें स्थळ पवित्र. **मुसलमान** मनुष्य कोणत्याहि स्थळीं असला तरी प्रार्थनेचा समय आल्या बरोबर प्रार्थना करितो. प्रार्थनेचे विषय ह्मणजे मुख्यतः सर्व गोष्टी देणाऱ्या प्रभूची स्तुति, त्याचे दयेवरचा आपला अवलंब इतके असतात. याशिवाय लांबलचक गोष्टी प्रार्थनेंत असण्याची अवश्यकता नाहीं. असें सांगतात कीं, प्रार्थना व भक्ति करितांनां **पैगंबराच्या** नेत्रांतून सतत अश्रूंच्या धारा चालत असत. त्याचा चुलतभाऊ **अली** याचा देह तर प्रार्थनेच्या समयीं निश्चेष्ट होई. **इस्लामां**त धर्मगुरूची जात नाहीं. **इस्लामी** धर्मांत मुळीं जातीभेदच नाहीं. परमेश्वर व त्याचा भक्त मनुष्य या दोघांमध्यें मध्यस्थी करणारा कोणी नाहीं. परमेश्वराची प्राप्ति करून घेण्यासाठीं, अथवा त्याच्या सांनिध्यापासून आत्म्यास समाधान मिळण्यासाठीं, यज्ञ-यागादिक सत्रांची अथवा संस्कारमालिकेची अवश्यकता **इस्लामां**त सांगितलेली नाहीं. प्रत्येक मनुष्य प्राणी आपला पुरोहित आहे. त्यांतील विधि फारच सोपे आहेत. मतांगी-कार, प्रार्थना, दानधर्म, उपवास, आणि **मक्के**ची यात्रा इतक्या गोष्टी प्रत्येक मनुष्यानें कराव्या.

तुह्मी धरित्रीवर भयाचे स्थळीं हिंडत असतां

आपणांवर शत्रूचा हल्ला होईल या भीतीनें आपली प्रार्थना जरी फारच संकोचित केली तरी चिंता नाहीं. परमेश्वरासह अन्य वस्तूंचा समागम करूं नका. एवढी गोष्ट खेरीज करून बाकीच्या सर्व गोष्टींबद्दलची क्षमा परमेश्वर करितो. अहो खरे भक्तहो, प्रार्थनेला सुरुवात करण्याचे पूर्वी तुह्मी आपलीं तोंडें धुवा. आपलें मस्तक धुवा. कोंपरापर्यंत हात धुवा. आणि गोफयापर्यंत पाउलें धुवा. स्त्रीसमागमानें अथवा धातुपातानें अशुद्ध झाल्यास सचैल स्नान करा. प्रार्थनेचे वेळीं मक्का येथील पवित्र मंदिराकडे आपलें मुख करा. अंतःकरणाच्या शुद्धतेची मातबरी कुरानांत विशेष प्रकारें सांगितली आहे. यज्ञयागादिकांत अर्पण केलेले बळि, मांस व रुधिर हीं परमेश्वरास ग्राह्य नाहींत. तुमचें पवित्र आचरण मात्र परमेश्वरास ग्राह्य आहे. पूर्वेस किंवा पश्चिमेस तोंडें वळविल्यानें पवित्रपणा येत नाहीं. ज्याचा परमेश्वरावर भाव आहे, व अखेरीस न्यायाचा दिवस येणार आहे असें जो मानतो व जो परमेश्वराच्या नांवानें आपलें गणगोत व ज्यांना आईबाप नाहींत अशीं पोरकीं मुलें आणि गरजवंत व परकीय लोक व दास केलेल्या लोकांची खंडणी देऊन सूटका करून घेणें या बाबतींत आपलें द्रव्य वेंचितो, जो सतत प्रार्थना करण्यांत गुंतला आहे, व जो दान धर्म करितो, जो आपण केलेले

करार पूर्ण करितो, संकट समयीं व विपत्तींत जुलूम व बळजबरी होत असतां, जो स्थिरबुद्धीनें चालतो, अशाचेंच आचरण पवित्र आहे; व ह्यालाच खरे भक्त ह्मणतात.

( ३ ) **रोजे** ह्मणजे उपवासांविषयीं **कुरानां**त असें सांगितलें आहे कीं, अहो सद्भक्तांनों, तुमच्या अगोदर जे लोक होऊन गेले, त्यांस रोजा ह्मणजे उपवास नेमून दिला होता. त्याचप्रमाणें तुह्मी परमेश्वराचे ग्रंथ पाळावे, ह्मणून तुह्मांलाहि रोजा नेमून दिला आहे. कांहीं नियमित दिवस पर्यंत तुह्मी रोजा केला पाहिजे; पण तुह्मांमध्यें जो कोणी दुखणेकरी असेल, अथवा सफर करीत असेल, त्यानें तितक्याच नियमित दिवशीं अन्य वेळीं उपवास करावा. ज्यांना रोजा करण्याचें सामर्थ्य असून जे रोजा करीत नाहींत त्यांनीं एका गरीब माणसाची उपजीविका चालवून आपल्या हयगयीबद्दल दंड भरावा. गरीबांचा समाचार घेतलाच पाहिजे; असें समजून जो गरीबांचा समाचार घेतो, त्याचें विशेष प्रकारें कल्याण होईलच होईल. रोजाचें माहात्म्य किती आहे हें समजून जर तुह्मी उपवास कराल तर तुह्मी धन्यता पावाल. **रमझान** महिन्यांत तुह्मी उपवास करा. ह्याच महिन्यांत **कुरान** आकाशांतून पृथ्वीवर आलें. मनुष्यास मार्ग दाखविणारी व मार्गाचें परिस्फोटन करणारी व सत्यासत्य

दाखविणारी ही किताब आहे. ह्मणून जे कोणी तुमच्यापैकीं ह्या महिन्यांत घरीं राहतील त्यांनीं हे रोजे महिनाभर पाळावे.

उपवासाच्या रात्रीच्या समयीं स्त्रीसमागम केल्यास तुह्मांस दोष लागणार नाहीं. तुह्मीं स्त्रीपुरुषें हीं परस्परांचीं परिधान करण्याचीं वस्त्रें आहां ह्मणून अरुणोदयाचे पूर्वीं जे तुमचे खाण्यापिण्याचे नित्याचे व्यवहार आहेत, ते निर्भयपणें करून पुनः दिवसभर उपवास करा.

( ४ ) **जकात** **इस्लामा**ची आज्ञा आहे कीं, प्रत्येक माणसानें आपल्या द्रव्यांतील कांहीं भाग आपल्या निराधारी पडोशांच्या उपजीविकेसाठीं धर्म ह्मणून खर्च करावा. जकात व सत्कात ह्मणून खैरात दोन प्रकारची आहे. जकात ह्मणजे **कुराना**ंत आज्ञापिलेला धर्मादाय होय. आपल्या ताब्यांत वर्षभर असलेल्या जंगम जिनगीच्या उत्पन्नापैकीं चाळिसावा भाग जकात धर्मादायाकडे लाविला पाहिजे. शेती, व्यापार, गुरें, व इतर प्रकारच्या मालापासून जो निवळ नफा होईल त्यांतील चाळिसावा हिस्सा दिला पाहिजे.

ज्या ज्या जिन्नसांपासून धन्यास उत्पन्न होतें, त्या वार्षिक उत्पन्नावरहि जकात लागू होते. शेतीच्या व ओझ्याच्या कामांत जीं जनावरें लागतील व जीं दुभतीं जनावरें असतील त्यांच्यावर जकात लागू होत नाहीं. तसेंच

घरदार व माणिक मोत्यें व घरगुती वस्त्रप्रावर्ण व इतर सामान यांवर जकात लागू होत नाहीं.

**रमझान** महिन्यांतील रोजे ह्मणजे उपवास संपल्यावर **ईदुल फितर** या नांवाचा जो सण येतो त्या वेळीं प्रत्येक घरधन्यानें आपल्यासाठीं व आपल्या कुटुंबांतील सर्व माणसांसाठीं व आपल्या घरीं जो पाहुणा उपवास करीत असेल त्याच्यासाठीं व आपले नोकर दास व दासी या सर्वांसाठीं कांहीं नियमित प्रमाणानें गहूं, जव, खजूर, मनुका, तांदूळ यांपैकीं जें असेल तें लोकांस द्यावें ( १ ) जे गरीब कंगाल आहेत ते, ( २ ) जे लोकांपासून जकात वसूल करितात ते ( ३ ) आपणांस बंधमुक्त करून घेण्याची ज्या दासांची इच्छा आहे परंतु तसें करण्यास ज्यांचे जवळ द्रव्यबळ नाहीं ते ( ४ ) ज्या कर्जदार लोकांच्यानें केलेल्या कर्जाची फेड करवत नाहीं ते ( ५ ) आणि प्रवासी व परकी हे सर्व लोक दानास पात्र आहेत, असें **पैगंबराचें** सांगणें आहे. तुह्मीं जर प्रसिद्धपणें धर्म केला, तरी कांहीं वाईट नाहीं; परंतु जर गुप्तपणें गरीबांस धर्म केला तर त्यांत तुमचें कल्याण आहे; आणि तुमचीं पापें क्षालन होतील. जें जें तुह्मी कराल तें तें परमेश्वरास कळतें. जें द्रव्य तुह्मी धर्मादायांत खर्च कराल त्याचा बदला तुह्मांस मिळेल. परमेश्वराचें मुखावलोकन व्हावें या उद्देशानेंच तुह्मीं धर्मादाय करावा.

जें द्रव्य तुह्मी धर्मादायांत द्याल तें तुह्मांस परत दिलें जाईल; आणि तुमच्यावर अन्याय कदापि होणार नाहीं. जे कोणी विश्वास ठेवितात, आणि वेळच्यावेळीं प्रार्थना करितात, व आपली जकात देतात, त्यांस परमेश्वराकडून फलप्राप्ति होईल. त्यांच्यावर भय कधीं गुजरणार नाहीं; व त्यांस कधीं दुःखहि होणार नाहीं. एका उत्तम ग्रंथकाराचें असें ह्मणणें आहे कीं, प्रार्थना ही माणसास परमेश्वराकडे अर्ध्या वाटेवर नेऊन पोंचवितें. रोजे त्याच्या वाड्याच्या दरवाज्याजवळ नेतात; आणि खैरातीमुळें मनुष्य आंत प्रवेश करूं शकतो.

## पांचवा विधि मक्केची यात्रा.

मूळापासून भक्ति करण्याकरितां नेमलेलें भजनालय मक्केसच आहे.

**काआबा** हें नांव **मक्का**पुरींतील एका प्राचीन मंदिराचें आहे. **पैगंबरा**च्या पूर्वीं **अरब** लोक दूरदूरच्या प्रांतांतून येऊन येथील यात्रा करीत. हें देऊळ निरनिराळ्या आकाराचे मोठाले दगड जोडून बांधलें आहे. त्याची लांबी २४ हात, रुंदी २३ हात, आणि उंची २७ हात आहे. ह्या देवळाला एकच दार आहे; तें त्याच्या उत्तर भागीं जमिनीपासून सात फूट उंचीवर आहे. तें रुप्यानें मढवून सोन्यानें शृंगारलेलें आहे.

**काआबा** मंदिराचे दाराजवळ जमिनीपासून चार फूट उंच असा एक नामांकित पाषाण आहे. सर्व यात्रेकरू तें

नगर पाहावयास जातांनां त्या पाषाणाचें भक्तिभावानें चुंबन करितात. तो पाषाण अंडाकृति आहे. येथील मंदिर **इब्राहीम** यानें बांधिलें असें ह्मणतात. जो कोणी या मंदिरांत प्रवेश करील त्याच्या अंगावर कोणीं हात टाकूं नये. तो निर्भय आहे असें लोक समजतात. ज्यांनां ह्मणून सामर्थ्य असेल त्यांनीं ह्या भजनगृहाचें एकदां दर्शन घ्यावें अशी परमेश्वराची आज्ञा आहे ( १ ) हज्ज अथवा यात्रा करणारा मनुष्य पोक्त बुद्धीचा असावा. ( २ ) सर्व प्रकारांनीं मोकळा, प्रवास करीत असतां मार्गावर आपली उपजीविका चालविण्याची व जाण्यायेण्याचा खर्च करण्याची ऐपत आहे असा. ( ३ ) यात्रेस गेल्यावर मागें कुटुंबपोषण चालवितां येईल असा. ( ४ ) जलपर्यटण करण्याचें ज्याला सामर्थ्य आहे अशा स्थितीच्या मनुष्यासच यात्रेला जाण्याची परवानगी आहे, इतरांस नाहीं. आईबाप ज्यांस आहेत त्यांनीं आईबापांची आज्ञा असेल तरच यात्रेस जावें. यात्रेंत असतांनां कोणाबरोबर तंटा करूं नये. यात्रेंत शिकार करूं नये. कोणीं आपली निंदा केल्यास अथवा आपल्याशीं कठोर रीतीनें वागल्यास ती निंदा व तें कठोर वर्तन आपण सहन केलें पाहिजे. जे इतर लोक यात्रेच्या तांड्या बरोबर आले असतील त्यांच्याशीं प्रेमानें वागावें; व परस्परांत शांति वाढवावी.

मक्केची यात्रा करते समयीं जे विधि पाळले पाहिजेत त्यांची हकीकत पुढें दिली आहे.

मक्कापुरी सहा मजलांच्या अंतरावर राहिली ह्मणजे यात्रेकरू लोकांनीं आपला नित्य घालण्याचा पेहराव टाकावा व **एहराम** ह्मणजे पवित्र वस्त्रें ज्याला ह्मणतात तीं वस्त्रें परिधान करावीं. पुरुषांसाठीं ज्याला शिवण घातलेली नाहीं अशीं दोन वस्त्रें असतात. एका वस्त्रानें खालचें अंग गुंडाळावें व दुसरें वस्त्र वरचे अंगावर टाकावें, मस्तकावर आच्छादन घालूं नये. हीं पवित्र वस्त्रें परिधान केल्यावर मस्तकास तेल लावूं नये, शरीराच्या कोणत्याहि भागावर वस्तरा फिरवूं नये, नखें काढूं नयेत, आणि वर सांगितलेल्या पवित्र वस्त्रां शिवाय दुसरें कोणतेंहि वस्त्र परिधान करूं नये. स्त्रियांनीं एक पायजमा घालावा व आंगांत एक कुडतें घालावें. **मक्का-पुरीस** पोंचल्यावर नेमून दिलेला स्नानविधि करून पवित्र मंदिरांत जावें. मंदिरांत गेल्यावर काळ्या पाषाणाचें चुंबन घ्यावें, नंतर **काआबा** मंदिरास तीन प्रदक्षिणा त्वरेनें घालाव्या व चार प्रदक्षिणा हळू हळू घालाव्या. नंतर **इब्राहीमचा मुकाम** या स्थळीं जावें व तेथून परत आल्यावर काळ्या पाषाणाचें चुंबन घ्यावें. **हरम** द्वारांतून **सफा** पर्वताकडे जावें आणि **सफा** पर्वत व **मरवा** पर्वत या दोन पर्वतांमध्यें सातदां फेऱ्या कराव्या. आठव्या दिवशीं यात्रेकरूनें **मीना** येथें जावें

व रात्रभर वस्ती करावी. प्रातःसमयाची प्रार्थना झाल्यावर **अरफात** पर्वतावर जावें, व सायंकाळपर्यंत तेथेंच राहवें. नंतर **मुझदलिफ** या नांवाच्या स्थळीं जाऊन रात्रौ तेथेंच वस्ती करावी. पुनरपि **मीना** दरींत जावें व तेथें गेल्यावर **जम्रा** नांवाचे तीन खांब आहेत. त्या तीन खांबांवर दगड मारावे. अशी समजूत आहे की याच स्थळीं **आदम** यानें सैतानास दगड मारून हांकलून लाविलें. नंतर **मीना** येथें उंट अथवा बकरा अथवा मेंढा याचा बळि अर्पण करून यात्रेकरूनें आपलीं पवित्र वस्त्रें काढून पुनरपि जुना पेहराव करावा. श्मश्रु करावा, नखें काढावीं. नंतर **मक्का**पुरींत तीन दिवस वस्ती करावी. बळि अर्पण करण्याचें कारण असें कीं ह्या स्थळीं पुरातनकाळीं **इब्राहीम** यानें आपला पुत्र **इष्माएल** यास परमेश्वराच्या आज्ञेनुसार बळि देण्याची योजना केली होती. ही यात्रा जिल्काद महिन्याचे सातवे तारखेपासून दहावे तारखेपर्यंत सुरू केली पाहिजे.

**मक्का** सोडून यात्रा करून परत जाण्याचे पूर्वी यात्रेकरू **काआबा**चें दर्शन घेतात, त्यास प्रदक्षिणा घालतात. नंतर यात्रेकरू **मदीना**पुरींत **पैगंबरा**ची समाधी आहे तिचें दर्शन घेण्यास जातात. समाधीचें दर्शन झाल्यावर यात्रा पुरी होते व यात्रेकरू **हाज्जी** या पदवीस पात्र होतो.

सुंता करण्याविषयीं **कुरानां**त कोठें आज्ञा सांगितलेली नाहीं;

परंतु तो विधि प्रत्येक **मुसलमानानें** अवश्यमेव केला पाहिजे. ह्या विधीची स्थापना फार प्राचीनकाळीं झालेली आहे.

मूर्तिपूजक **अरब** लोकांत खाण्यापिण्याच्या संबंधानें पुष्कळ जिनसा निषिद्ध मानल्या होत्या. परंतु तसें नसतां थोडक्याच गोष्टी वर्ज करून बाकी सर्व पदार्थ खाण्याची मोकळीक आहे असें लोकांनां सांगणें **पैगंबरास** भाग झालें. जो प्राणी आपोआप मरतो अथवा जो प्राणी परमेश्वराच्या नांवाखेरीज अन्य प्रकारानें वधला जातो किंवा मरतो अशा प्राण्याचें मांस वर्ज करावें. साधारणतः हिंस्र पशू आणि पक्षी व मुरदाड मांस भक्षण करणारे प्राणी व पशू यांमध्यें ज्यांस वरचे खालचे दांत आहेत अशा प्राण्यांचें मांस वर्ज आहे. शरीरास मानवेल तें व ज्याचा निषेध केला नाहीं तें सर्व प्रकारचें अन्न तुह्मी खा व परमेश्वराचें भय बाळगा. जे जे उत्तम पदार्थ **आह्मी** लोकांस दिले आहेत ते तुह्मी खा आणि परमेश्वराचे उपकार माना. मद्यप्राशन व जुगार यांचा निषेध केला आहे. अहो भाविक जनहो, मद्य, जुगार, मूर्ति व शकुन सांगणारे बाण, या सर्व गोष्टी खरोखर सैतानानें केल्या आहेत. त्या सर्वथैव निंद्यच आहेत. आपला उदय करून घेण्याची जर तुमची इच्छा असली तर ह्या पासून दूर असा. तुह्मांमध्यें मद्य व जुगार यांच्यामुळें द्वेष व मत्सर उत्पन्न व्हावा, व परमेश्वराचें स्मरण व त्याची प्रार्थना करण्यांत तुह्मांस अडचण

पडावी या हेतूनें सैतानानें आपला प्रयत्न चालविला आहे. तर मग तुह्मी ह्यापासून दूर राहणार नाहीं काय ? परमेश्वराची आज्ञा माना, **पैगंबरा**ची आज्ञा माना सावध रहा.

**कुराना**च्या चवथ्या अध्यायांत **इस्लाम** धर्माची नीति संक्षेपानें सांगितली आहे. ती अशी. “अहो या; परमेश्वरानें तुह्मांस ज्या आज्ञा दिल्या आहेत त्यांची पुनरावृत्ति करून सांगतों. परमेश्वराच्या समागमें अन्य कोणी आहे असें मानूं नका. तुह्मी आपल्या मातापितरांशीं चांगल्या रीतीनें वागत जा. विपत्तीमुळें आपल्या मुलांबाळांचा वध करूं नका. तुह्मांसाठीं व तुमच्या मुलाबाळांसाठीं **आह्मी** पोटभर देऊं. अंतर्यामीं व बाह्यांतरीं ज्या गोष्टींनीं नापाकता येईल, अशा प्रकारच्या गोष्टींजवळ जाऊंसुद्धां नका. अनाथ पोरक्या मुलांचे द्रव्यानजीक जाऊं नका. त्याची बढती करणें असेल तर मात्र त्याच्याजवळ जा. न्याय करते वेळीं योग्यच न्याय करा. मग त्यांत तुमच्या गणगोताचा संबंध असला तरी तिकडे लक्ष देऊं नका. परमेश्वराचा करार पूर्ण करा. ह्मणजे त्यानें जें तुह्मांस सांगितलें आहे तें करा. खरोखर सांगतों कीं, हाच **माझा** योग्य मार्ग आहे. त्याचें तुह्मीं अनुकरण करा. विश्वास ठेवून नम्रपणें परमेश्वराची जे स्तुति करितात, जे सदा दानधर्म करितात, जे व्यभिचार करीत नाहींत, जे आपले करार पाळतात, व जे आपल्या

जवळील अमानत वस्तूंचा प्रतिपाळ करितात, ते धन्य. खरोखर परमेश्वराची तुह्मांस आज्ञा आहे कीं, तुह्मी न्यायानें वागा, लोकांचें कल्याण करा. जें गणगोतास द्यावयाचें तें त्यांस द्या. पापाचरण करूं नका. लोकांशीं अन्यायानें वागूं नका." परमेश्वराला अनुलक्षून आपलीं कर्तव्यें कोणतीं आहेत, हें मानवांस शिकविलें ह्मणजे धर्माची इतिकर्त्तव्यता झाली असें होत नाहीं. तर मानवांनीं परस्परांशीं कसें वागावें ह्या विषयीं त्यांस उपदेश करणें हाहि धर्माचा मोठा अवश्य कर्त्तव्याचा भाग आहे. ह्या दोन्ही गोष्टींचा बोध **कुरानांत** केला आहे. तसेंच **कुरानांत** अन्य स्थळीं असें ह्मटलें आहे कीं तुमच्या मुलाबाळांवर, गणगोतांवर, तुमच्या शेजाऱ्या-पाजाऱ्यांवर व तुमच्या जवळ असलेल्या सजीव प्राण्यांवर जी तुमच्या हृदयांत माया असेल तिजवरून परमेश्वरावर तुमची किती भक्ति आहे हें समजतें. तुह्मांस उत्पन्न करणारा जो परमेश्वर त्याजवर तुमची भक्ति आहे काय? जर त्याजवर तुमची भक्ति असली तर तुमच्या बंधुजनांवर तुह्मांस प्रेम ठेविलें पाहिजे; व त्यांजवर माया केली पाहिजे. ईश्वर-सान्निध्याची तुह्मांस आवड आहे काय? जर असेल तर त्यानें उत्पन्न केलेल्या प्राण्यांवर तुह्मी माया करा. ज्या ज्या गोष्टींची तुह्मांस आवड आहे त्या त्या गोष्टी तुह्मी त्यांस द्या. ज्या ज्या गोष्टी तुह्मांस नकोतशा असतात त्या त्या

तुह्मीहि त्यांस देऊं नका. लोकांनीं तुमचें कल्याण करावें असें जें तुह्मांस वाटतें, त्याचप्रमाणें तुह्मीहि त्यांचें कल्याण करा. अशा गोष्टीवरूनच परमेश्वराच्या ठायीं मानवांची भक्ति किती आहे हें दृष्टोत्पत्तीस येतें.

चांगलें करण्याकरितां पुढें सरसे व्हा. मागें हटूं नका. तुह्मां सर्वांस परमेश्वराकडे जायाचें आहे; आणि तुमच्यांत जी मतभिन्नता आहे तिचा उलगडा तो तुह्मास करून देईल. आपण जसें करूं तसें भोगूं. पुण्याचरण केलें तर त्याचा मोजबा आपणांस कल्याणकारक होईल; व दुराचरण ह्मणजे ( परपीडन ) केलें तर त्याचा मोजबा आपणांस परलोकीं तसा मिळेल.

मुद्दाम एखाद्या मनुष्यानें दुसऱ्या मनुष्यास इजा किंवा दुखापत केली असेल तर त्या मनुष्यापासून दुखापतीच्या मानानें नुकसान भरून द्यावें, असा **महमदानें** नियम लावून दिला; पण त्याचें कारण असें कीं, दुष्ट माणसांचा दुष्टपणा जास्त वाढूं नये; व त्यांस वाईट करण्याची दहशत पडावी. **कुरानांत** असेंहि सांगितलें आहे कीं, जो ईश्वराची भाक करितो, व लोकांचें कल्याण ज्या प्रकारें होईल त्या प्रकारचें आपलें आचरण ठेवितो, अशा मनुष्याच्या मुखांतला शब्द प्रशंसनीय आहे. बरें व वाईट यांची कधीं तरी बरोबरी होऊं शकेल काय ? कदापि होणार नाहीं. दुष्ट

गोष्टींचें निवारण, कल्याणदायक गोष्टींनीं करा. जीं सुशील माणसें आपल्या संपत्कालीं व आपत्कालीं दानधर्म करितात, जीं आपला क्रोध आंवरून धरितात, आणि लोकांच्या अपराधांची क्षमा करितात, अशा लोकांसाठींच स्वर्ग देवानें केला आहे. कारण परमेश्वराचें प्रेम परोपकारी माणसांवर आहे. एका ग्रंथकारानें **इस्लामा**चा बोध संक्षेपानें सांगितला आहे तो असा. "जो तुह्मांस हांकलून देतो त्याकडे पुनः जा; जो तुमच्यापासून घेऊन जातो त्यास आणखी द्या. जो तुह्मांस इजा देतो त्यास माफी द्या. कारण परमेश्वराची पूर्णता तुमच्या आत्म्याच्या ठायीं वसावी अशी परमेश्वराची इच्छा आहे." **कुरानांत** असें सांगितलें आहे कीं, जे विनम्रभावें ह्या धरित्रीवर चालतात, तेच दयामय परमेश्वराचे सेवक आहेत. अज्ञानी लोक जेव्हां अशा लोकांशीं बोलतात तेव्हां त्यांचें उत्तर तुह्मांस शांति असो असें असतें. ते परमेश्वराची भक्ति करण्यांत रात्र घालवितात, हे सेवक उभे असतांनां, कुशीवर पडले असतांनां, व निजले असतांनां परमेश्वराची भक्ति करितात. ते आपलें द्रव्य उधळेपणें खर्च करीत नाहींत; व कंजूषपणें राखून ठेवीत नाहींत; परंतु खर्च करण्याच्या बाबतींत मध्यमवर्ती मार्गानें चालतात, ते परमेश्वराच्या समागमें चालतात; ते परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणाची

प्रार्थना करीत नाहींत; ते व्यभिचार करीत नाहींत; ते खोटी साक्ष देत नाहींत; निरर्थक खेळ चालले असतां ते डुंकून पहात नाहींत; परंतु आपल्या मार्गानें चालतात. त्यांची परमेश्वराजवळ हीच विनवणी असते कीं, ज्या बायकापोरांपासून आह्मांस सुख होईल तशींच बायकापोरें आह्मांस तूं दे. हे लोक आपलें आचरण नीट राहावें ह्मणून एकसारखा प्रयत्न करितात. ह्यांनां त्यांच्या कृत्याचें सुफळ मिळेलच मिळेल; परलोकीं गेल्यावर त्यांचा आदर होऊन अनंतकाळ सुखधाम व विश्रांती त्यांस निःसंशय मिळेल.

स्वर्गसुखाची प्राप्ति कोणत्या प्रकारच्या लोकांस मिळते व तेथील सुखोपभोग कोणत्या प्रकारचा आहे या दोन्ही विषयांच्या संबंधानें कुरानांतील लेख अवलोकन करण्यासारखे आहेत. “जे सदाचरण ठेवितात त्यांचें उत्तम प्रकारचें कल्याण होईल, व त्यांत कमतरता न होतां ह्या कल्याणाची वृद्धिच होत जाईल. त्यांच्या निर्मळ व सतेज मुखावर कोणत्याहि प्रकारची कालिमा किंवा लज्जा यांचा अंशमात्रें सुद्धां डाग पडणार नाहीं. हेच सदाचारी जन अनंतकाल स्वर्गवास करतील. परंतु जे जन दुराचारानें वागतात त्यांस त्यांच्या दुराचाराच्या मानानें यातना भोगाव्या लागतील. रात्रीच्या निबिड अंधःकाराच्या काळोखीप्रमाणें त्यांचीं मुखें लज्जेनें काळीं

पडतील". "जो जन परमेश्वराचा नियम पाळतो व त्यानें घातलेलीं नियम-बंधनें तोडीत नाहीं व त्यानें ज्या गोष्टींचें सम्मेलन करण्यास सांगितलें आहे त्या गोष्टी जो जन एकवट करितो, जो जन **परमेश्वराचें** भय बाळगितो, व शेवटीं आपण केलेल्या सर्व कृत्यांचा हिशेब द्यावा लागेल अशा भीतीनें जो जन आपलें आचरण ठेवितो, जो जन **परमेश्वराला** संतुष्ट करण्यासाठीं, मोहास भुलून चळत नाहीं, परंतु निश्चित मनानें वागतो. जो नित्य प्रार्थना करितो, आणि **आह्मीं** त्याला जें दिलें आहे त्यांतून जो गुप्तपणें अथवा उघडपणें धर्मादाय करितो, जो दुष्कृतांची फेड सुकृतांनीं करितो, अशा जनाप्रत सुखोद्यानांत चिरकाल वसतीस्थान मिळेल. हा जन अशाच सदाचारी लोकांच्या मेळयानें ह्या सुखोद्यानांत प्रवेश करील. चोहों बाजूंच्या द्वारांनीं देवदूत येऊन त्यास ह्मणतील, तुह्मास शांति असो. कारण जरी तुह्मावर अनेक संकटें आलीं तथापि तुह्मीं सहनशीलपणें तीं भोगिलीं. ह्या सुखवस्तींत त्यास उत्तमोत्तम वस्तु प्राप्त होतील." **परमेश्वर** त्यास असें ह्मणेल, "हे आत्मन्, तुला आतां विसावा मिळाला आहे. तूं संतुष्ट होत्साता आपल्या **प्रभूकडे** त्यास तोषविण्यासाठीं वळ. माझ्या सेवकजनांमध्यें जाऊन राहा; व माझ्या सुखोद्यानांत प्रवेश कर."

---

# अध्याय १३ वा

## इस्लामी स्त्रियांची स्थिति.

" मातुःश्रीच्या चरणांसमीप मोक्षधाम आहे. "

**इस्लाम** धर्माची स्थापना होण्यापूर्वीं **अरबस्थानां**तील लोकस्थिति जी होती तीस " अज्ञानावस्था " असें ह्मणण्याचा प्रघात आहे. ह्या अज्ञानावस्थेच्या काळांत **अरब** देशांत स्त्रियांच्या संबंधानें लोकांचे विचार फारच अप्रशस्त असत. स्त्रियांशीं पुरुषांची वागणूक अश्लाघ्य प्रकारची असे. हे **अरब** लोक आपल्या मुलींनां जितेपणींच पुरून टाकीत. ही जीवंतपणीं पुरण्याची दुष्ट चाल **पैगंबरानें** आपल्या उपदेशानें अगदीं मोडून टाकिली. तसेंच देवतांनां मुलें बळी देण्याची क्रूर चाल **अरबस्थानां**त जारी होती, तीहि **पैगंबरानें** नाहींशी केली. एका पुरुषानें पुष्कळ बायका करण्याची चाल फार प्राचीन काळापासून सर्व पृथ्वीवर चालत आलेली आहे. देशोदेशीं या चालींत चांगले वाईट फरक दृष्टोत्पत्तीस येतात. **अरब** लोकांत ही चाल होतीच व यांशिवाय असाहि प्रघात होता कीं, कांहीं कांहीं लग्नें तर नियमित अवधीच्या करारांचीं असत. ही करारांची वेळ संपली कीं, लग्नसंबंध आपोआप तुटून जाई. त्यामुळें नवराबायकोचें परस्परांवर प्रेम राहत नसे. **अरबी** लोकांत अशी समज असे कीं, बायको ह्मणजे एका प्रकारची चीजवस्त;

ती आपल्या बापाच्या घरीं असेल तेव्हां त्याची जायदाद; व नवऱ्याचे घरीं गेली ह्मणजे त्याची जायदाद. नवरा मयत झाल्यावर त्याच्या विधवा त्याचे मुलगे असतील त्यांच्या वांट्यास इतर मालमत्तेप्रमाणें जात आणि ह्मणूनच सापत्न मुलांचे आपल्या सापत्न आईबरोबर व सापत्न जामातांचे सापत्न सासवांबरोबर वारंवार विवाह-संबंध जडत असत. एकाच वेळीं अनेक नवरे करण्याची चाल सुद्धां **यमन** प्रांतांत बऱ्याच ठिकाणीं चालू होती. तेव्हां **पैगंबरानें** मुख्य गोष्ट ही सांगितली कीं, बायकांविषयीं पूज्यबुद्धि ठेविली पाहिजे; व त्यांस आदरानें वागविलें पाहिजे. **पैगंबरानें** करारी लग्नें बंद केलीं. त्याकालापर्यंत बायकांस जे हक्क नव्हते, ते हक्क **पैगंबरानें** त्यांस दिले. धर्मशास्त्राचे संबंधानें पुरुषांचे हक्क व बायकांचे हक्क सारखेच हें त्यानें स्थापित केलें. एकाच समयीं लग्नाच्या किती किती बायका असाव्या याविषयीं त्यानें नियम घातल्यामुळें व नवऱ्यानें आपल्या सर्व बायकांबरोबर सारखे-पणानें वागावें असाहि निर्बंध घातल्यामुळें अनेक बायकांबरोबर लग्न करण्याच्या चालीस त्यानें बरेंच मोठें अडकण घातलें. याविषयीं **कुरानांत** अशी आज्ञा आहे कीं, वाटेल तर तुह्मी दोघी, तिघी, अथवा चवघी बायकांबरोबर लग्न करा; पण याहून अधिक बायका करूं नका. जर तुह्मांस सर्वांशीं सारखेपणानें व समचित्त भावानें व यथान्याय वागतां येणार

नाहीं तर तुह्मी एकाच बायकोबरोबर लग्न करा, अधिक बायकां-बरोबर करूं नका. अनेक बायकांस सारखेपणानें वागविणें ही गोष्ट शक्यच नाहीं. ह्मणून इस्लामी पंडितांचें ह्मणणें असें पडतें कीं, एकाच बायकोबरोबर लग्न करणें प्रशस्त व कुरानाचें शिकविणेंहि तसेंच आहे.

**पैगंबराच्या फातमा**बाई नांवाच्या मुलीविषयीं त्याच्या शिष्यांची फारच भक्ति व प्रेम असे. ते तिला स्वर्गीय स्त्रीरत्न असें ह्मणत. परमेश्वरानें स्त्रीजातीमध्यें जितके गुण ठेविले आहेत, ते समुच्चयेंकरून या बाईच्या अंगीं वसत असत. शुद्धता व पवित्रता यांचें ती माहेरघर असल्यामुळें ती सर्व स्त्रीजातीमध्यें श्रेष्ठ मानली होती.

**पैगंबराचे** लग्नांविषयीं लोकांत बराच मोठा गैरसमज आहे. त्याचा खरा वृत्तांत समजल्यास हा खोटा समज दूर होईल. ऐन तारुण्याचे भरांत ह्मणजे **पैगंबर** २५ वर्षांचा असतां त्यानें **खदीजा**बाई बरोबर लग्न लाविलें. त्या वेळीं ती **पैगंबरा**पेक्षां वयानें बरीच वडील होती. **खदीजा**बाईचें **महम**-दाशीं लग्न झाल्यावर ती २५ वर्षांनीं मरण पावली. हीं २५ वर्षें दोघांचीं मोठीं आनंदाचीं गेलीं. **पैगंबरा**चा मूर्तिपूजक लोकांनीं बहुत प्रकारें छळ करावा; परंतु अशा प्रसंगीं **खदीजा**बाई त्याचें शांतवन करीत असे. **खदीजा**बाईच्या मरणसमयीं **पैगंबराची** उमर ५० वर्षांची होती. ह्या २५ वर्षांचे काळांत

देशरिवाजाप्रमाणें दुसऱ्या अनेक बायका करण्याची **पैगंबराला** मुभा होती तरी त्यानें दुसरें लग्न केलें नाहीं. **पैगंबराचा सक्रन** नांवाचा एक आवडता शिष्य होता,तो आपल्या बायकोला घेऊन **पैगंबराच्या** आज्ञेप्रमाणें **हबसाण** प्रांतीं गेला होता; तेथें तो मरण पावला. तेथून त्याची बायको **सौदा**बाई ही नवरा मेल्यानंतर सर्व प्रकारें निराश्रित होऊन **मक्केस** परत आली. विधवाबाईस आपल्या घरीं ठेवून आश्रय देणें देशरिवाजाप्रमाणें प्रशस्त नाहीं ह्मणून तिजबरोबर लग्न केलें तर त्यांत कांहीं वावगी गोष्ट धरली जाणार नाहीं; व निराश्रित विधवाबाईस आश्रय देतां येईल, असें समजून **पैगंबरानें सौदा**बाईबरोबर लग्न लाविलें. तिच्या नवऱ्यानें धर्मासाठीं देशत्याग केला होता, व पुष्कळ त्रास सोशिला होता. अशा शिष्याच्या बायकोस निराश्रित ठेवणें ह्मणजे अयोग्य. लग्न केल्याशिवाय आश्रय देण्यास दुसरा मार्ग नव्हता, असें पाहून **पैगंबरानें** हें लग्न लावून घेतलें. **पैगंबराचा** हा दुसरा विवाह संबंध.

**अबूबकर** या नांवाचा **पैगंबराचा** एक सुप्रसिद्ध भक्त होता; त्याचें **पैगंबरावर** फारच प्रेम असे. त्याला **आयशा** नांवाची एक अति रूपवान मुलगी होती. तिचें **पैगंबराबरोबर** लग्न करून द्यावें अशी **अबूबकराच्या** मनाची फारच उत्कट इच्छा होती. ज्यानें आपणास अज्ञानांतून बाहेर काढलें, व

ज्यानें आपली नास्तिक बुद्धि नाहींशी केली त्याच्याशीं आपली सलगी जडावी, व ही सलगी हमेशाची असावी ह्मणून हा संबंध जोडल्यास फार उत्तम होईल, असें **अबूबकर** यास वाटत होतें. ह्मणून ह्या गोष्टीस रुकार देण्याविषयीं **अबूबकरानें पैगंबरास** फारच आग्रहपूर्वक विनवणी केली. तेव्हां त्यानें आपल्या कन्येच्या सातव्या वर्षीच तिचा विवाह **पैगंबरा**बरोबर लाविला. अशी गोष्ट देशचालीसहि प्रतिकूळ नव्हती. हा **पैगंबरा**चा तृतीय संबंध होय. **उमर-इब्न-अलखत्ताब** याला **हफसा** नांवाची एक मुलगी होती. पुढें जो **इस्लामा**चा दुसरा खलीफ झाला तो हाच **उमर** होय. ह्या बाईचा नवरा **बेदर** येथील लढाईंत मरण पावला होता. तिचा स्वभाव फारच तापट असल्यामुळें तिजबरोबर पुनः कोणीं लग्न केलें नाहीं, व तिला तसेच वैधव्य दशेंत पुष्कळ दिवस घालवावे लागले. **पैगंबरा**च्या ज्या ज्या शिष्यास लग्न करावयाचें होतें त्याला त्याला तिजबरोबर लग्न करण्यास भीति वाटे. ह्यामुळें तिच्या बापाला फारच वाईट वाटत असे. हा जो आपल्याला दोष लागला आहे तो दूर करण्यासाठीं **उमर** यानें माझ्या मुलीबरोबर लग्न कर असें **अबूबकर** यास सांगितलें. **अबूबकर** यानें ती गोष्ट नाकारली. नंतर **उमरनें उसमानास** विचारलें. **उसमानानें**हि ती गोष्ट कबूल केली नाहीं. हें पाहून **उमर** यास फारच त्वेष चढला व तसाच तो संतापानें **पैगंबरा**कडे गाऱ्हाणें सांगण्याकरितां

गेला. मुलीचें लग्न होत नाहीं ही अपमानाची गोष्ट आहे असें त्यास वाटे. हा माझा अपमान कसा दूर होईल याविषयीं प्रश्न **पैगंबरा**पुढें **उमर** यानें केला. हा **उमरा**चा अपमान दूर झाला पाहिजेच व **उसमान** व **अबूबकर** तर लग्न करण्यास नाकारतात, तेव्हां **पैगंबरा**नें स्वतःच **हफसा**बाई-बरोबर लग्न केलें; आणि **उमर**चें लांछन दूर केलें. ह्यामुळें दोष तर कोणीं ठेवला नाहींच, परंतु सर्व लोकांस समाधान वाटलें. हा **पैगंबरा**चा चौथा विवाहसंबंध होय.

**हिंन्द-उम्मे-सल्मा** ही पांचवी बायको. **उम्म-हबीबा** ही सहावी बायको. **झैनाब** ही सातवी बायको; हिला **उम्मे-मिसकीन** ह्मणजे गरीबांची माय असें ह्मणत. या बायांस आश्रय देण्यास कोणी राहिला नव्हता; ह्मणूनच **पैगंबरा**नें त्यांच्या बरोबर लग्नें लाविलीं, व त्यांचा प्रतिपाळ केला. **झैद** याची हकीगत मागें सांगितलीच आहे. **झैनाब** नांवाची त्याची बायको **अरबस्थानां**तील फार मोठ्या घराण्यांतील बाई होती. आपल्या मोठ्या कुळाचा व शिवाय आपल्या सौंदर्याचा अभिमान तिला फार होता. त्या-मुळें बंधमुक्त झालेल्या मनुष्याबरोबर आपली जन्माची गांठ पडलेली पाहून तिच्या जिवाला जाचत असे. सरते शेवटीं परस्पर नवराबायकोमध्यें बेबनाव झाला. तिच्या बोलण्या-वरूनच कदाचित् नवऱ्याचे मनांत तिजविषयीं तिटकारा

उत्पन्न झाला असेल. एके प्रसंगीं **पैगंबर** ह्या दोघां नवराबायकोस भेटावयास गेला होता. त्या वेळीं, झैनाबबाईच्या तोंडावर बुरखा नव्हता. जसें एखादें सुंदर चित्र पाहिलें ह्मणजे आनंद होतो, तसें तिचें तें सुंदर रूप पाहून **पैगंबराला** मोठा आनंद झाला व त्याच्या मुखांतून असे उद्गार निघाले कीं, "अंतःकरणाचा धनी जो परमेश्वर त्याचें नाम सुवंदित असो." आश्चर्याच्या भरांत असतांनां जे हे निघालेले शब्द त्यांचा ह्या बाईनें वारंवार उच्चार करून आपल्या नवऱ्याचे अंतःकरणांत आपल्याविषयीं तिटकारा उत्पन्न केला. शेवटीं होतां होतां झैद यानें असा निश्चय केला कीं आपण आपल्या बायकोचा त्याग करावा. ही गोष्ट कळविण्यासाठीं तो **पैगंबराकडे** गेला. **पैगंबरानें** त्याला विचारलें कीं, तिच्या हातून कांहीं अपराध घडला काय? झैद ह्मणाला नाहीं; पण यापुढें तिचा समागम मला नको. तिनें माझ्या जवळ राहूं नये. नंतर **पैगंबरानें** त्यास निक्षून सांगितलें तें असें. "जा येथून आणि आपल्या बायकोला जप. परमेश्वराला भिऊन तिला चांगल्या प्रकारें वागीव. कारण परमेश्वराचें असें वचन आहे कीं, "आपल्या बायकांचा सांभाळ करा; आणि परमेश्वराचें भय बाळगा." **पैगंबराच्या** या सांगण्यानें झैद याच्या मनाचा पालट न होतां त्यानें आपल्या बायकोला सोडचिट्टी दिली. यावरून **पैगंबरास** दुःख झालें. कारण

त्यानेंच या दोघां भिन्न स्वभावांच्या मनुष्यांत विवाहसंबंध जोडला होता. **झैनाब**बाईस सोडचिठ्ठी मिळाल्यानंतर माझ्याबरोबर लग्न कर ह्मणून ती **महमदा**चे मागें लागली; आणि त्याची बायको झाली तेव्हांच तिनें त्याचा पिच्छा सोडला. **पैगंबरा**चा हा आठवा विवाहसंबंध.

**जुवारिया**बाई ही **महंमदा**ची नववी बायको. **हारिस** या नांवाचा कोणीएक गृहस्थ **बनी-मुस्तालिक** नांवाच्या जातीचा अधिकारी होता. ही **बाई** त्याची कन्या होती. **बनी-मुस्तालिक** टोळीचा पराभव करण्याच्या उद्देशानें **मुसलमानां**नीं एक स्वारी केली होती. त्यांत एका **मुसलमाना**नें **जुवारिया**बाईस हस्तगत करून घेऊन आपल्या अटकेंत ठेविलें. अटकेंत असतां अटकेंत ठेवणाराबरोबर तिनें अशी कबूली करून घेतली होती कीं अमुक एक पैशाची रकम मी तुला देऊन आपली सुटका करून घेईन. तिनें **पैगंबरा**जवळ या रकमेची मागणी केली. ती त्यानें तत्क्षणींच देऊन तिची सुटका केली. **पैगंबरा**चा हा आपल्यावरतीं मोठा उपकार झाला ह्मणून कृतज्ञ बुद्धीनें तिनें **पैगंबरास** असें ह्मटलें कीं, मला आपली स्त्री कर ह्मणजे तुझे मजवर उपकार होतील. **पैगंबरानें** तिच्या बोलण्यास मान देऊन तिजबरोबर लग्न लाविलें. ही गोष्ट सर्वत्र जाहीर होतांच **मुसलमानां**नीं आपसांत असा विचार केला कीं, **बनी-मुस्ता-**

लिक टोळीचे लोक आतां **पैगंबराच्या** गोतांतले झाले आहेत; आपणहि त्यांच्याशीं सलोख्यानें वागलें पाहिजे. सर्वांचा असा विचार झाल्यावर प्रत्येक शिपायानें आपापल्या अटकेंतील माणसें बंधमुक्त केलीं. या मुळें १०० कुटुंबांस स्वातंत्र्य मिळून सर्व लोकांनीं **जुवारिया**बाई व **महमद** या दोघां स्त्रीपुरुषांवर **परमेश्वरा**चा पूर्ण आशीर्वाद नांदो, असा **परमेश्वरा**जवळ दुवा मागितला.

**सफीया**बाई या नांवाची एक **यहुदीण** होती, तिचें लग्न **पैगंबरा**बरोबर झालें. याची हकीगत वरील गोष्टीप्रमाणेंच आहे. हा **दहावा** विवाहसंबंध. **मैमुना**बाई इजबरोबर **महमदानें मक्केस** लग्न लाविलें; ही बाई त्याच्या नात्यांतील होती. लग्न झालें त्या वेळीं तिचें वय ५० वर्षांचें होतें. ह्या लग्नामुळें त्या बाईस एक आधार झाला व त्या बाईचे आप्तांतले दोन रणशूर पुरुष येऊन **इस्लामास** मिळाले. एकाचें नांव **इब्न-आबास** व दुसऱ्याचें नांव **खालीद-इब्न-वलीद**. हाच **ओहद** येथील लढाईंत **महमदाच्या** शत्रूंच्या घोडेस्वारांचा अधिपति होता. **इस्लामाची** दीक्षा घेतल्यावर यानेंच पुढें **हेलेणी** लोकांस जिंकून पादाक्रांत केलें. हा **अकरावा** विवाहसंबंध. ही **पैगंबराच्या** लग्नांची हकीकत झाली. ह्या लग्नांमुळें त्यानें **अरबस्थानां**तील कुटुंबांचे जे परस्पर तंटे चालले होते ते पुष्कळ नाहींसे केले. पुढें पुष्कळ वर्षें लोटल्यावर **अर्फात** पर्वतावर **महमदानें** जो उपदेश केला

त्यांत त्यानें असें सांगितलें आहे कीं, परमेश्वराची आज्ञा अशी आली आहे कीं, जातीजातींतले परस्परांमधील कलह यापुढें बंद झाले पाहिजेत; प्रत्येक माणसास चारच बायका करण्याची मुभा आहे. परमेश्वराचा चारच बायका करण्याविषयींचा आदेश **पैगंबर मदीनेस** गेल्यावर पुष्कळ दिवसांनीं मिळाला. ह्याचीं अकरा लग्नें अवल होऊन गेलीं होतीं. इतर लोकांस आपल्या बायकांस सोडचिट्टी देण्याचा जसा अधिकार होता, तसा **पैगंबरास** नव्हता. त्याला आपल्या बायका सोडून देण्याची मनाई होती, व जास्त लग्नें करण्याचीहि मनाई झाली होती. या प्रकरणांत जे कित्येक लोक त्याला दोष लावितात तो व्यर्थ आहे.

काडी मोडून देण्याविषयीं जे **कुरानांत** नियम सांगितले आहेत त्यांविषयीं पुष्कळ गैरसमजूत आहे. पूर्वीं **अरब** लोकांत सोडचिट्टी देण्याचा अधिकार केवळ नवऱ्यालाच असे; आणि त्याबद्दल त्याला कोणतेंहि बंधन नसे. बायकांबरोबर दयाळू-पणानें व रास्तपणानें वागलें पाहिजे असें **अरबी** लोकांस मुळींच वाटत नसे. सोडचिट्टी देण्याची चाल **पैगंबरास** मुळींच आवडत नसे. तो वारंवार ह्मणे कीं, दास मुक्त केल्यानें परमेश्वरास फार आनंद होतो; परंतु बायकोला काडी मोडून दिल्यानें परमेश्वर अत्यंत कोपायमान होतो. त्यानें जे या प्रकरणीं नियम लावून दिले आहेत, ते ध्यानांत ठेवण्या-

सारखे आहेत. नवराबायकोची सुटासूट कायम होण्यापूर्वीं ती सुटासूट तीन वेळां झाली पाहिजे; आणि प्रत्येक वेळीं एक एक महिन्याचा अवकाश ठेविला पाहिजे. सोडचिठ्ठी देतेवेळीं बायको ऋतुमती अथवा अस्पर्श नसावी व गर्भवती-हि पण नसावी. असा प्रकार तीनदां झाला पाहिजे. ह्या दरम्यानचे वेळांत त्यानें तिला उघड अथवा गुप्त रीतीनें आपल्या-कडे बोलावून आणलें तर लोटलेली मुदत कामास पडत नाहीं. सोडचिठ्ठी नक्की झाल्यावर पुढें चार महिने लोटेपर्यंत सोडलेल्या बायकोस इतर पुरुषाबरोबर लग्न करितां येत नाहीं. ह्या मुदतींत बायको परीक्षेवर आहे असें ह्मणण्याचा प्रघात आहे. नवऱ्यानें सोडलेली बायको ज्या मुदतीपर्यंत परीक्षेवर असेल ती मुदत संपे तोंपर्यंत पोटगी व राहण्यास जागा ह्यांविषयीं तिचा हक्क तिच्या नवऱ्यावर असतो. जेव्हां काडी मोडण्याची गोष्ट नवऱ्यापासून उद्भवते, तेव्हां लग्नाच्या वेळीं नवऱ्यानें जें कांहीं तिला द्यायाचें कबूल केलें असेल, तें सर्व त्यानें तिला दिलें पाहिजे. बायको आपल्या नवऱ्याच्या संमतीनें त्याचेपासून आपली लग्नाचे संबंधांतून सुटका खरीद करून घेण्यास मुखत्यार आहे.

नवरा नपुंसक असल्याचें शाबिद झाल्यास बायकोस नवऱ्या-पासून सुटका करून घेण्याची मुभा आहे. बायको न सोडून देण्याविषयीं व होईल तर परस्परांचें सख्य राखण्याविषयीं

प्रयत्न करणें ह्या गोष्टी **कुरानांत** वारंवार सांगितल्या आहेत. मनुष्य लोभी फार असतो; परंतु बायकांबरोबर दयेनें व धर्मबुद्धीनें वागला तर परमेश्वर ती गोष्ट विसरणार नाहीं. जर परस्परांत बेबनाव होण्याचा संभव असला तर नवऱ्याचे घराण्यांतील एक दोन पुरुष निवडून घेऊन त्यांस हा परस्परांतील तंटा मोडण्यास सांगावें. परस्परांचा समेट करून घेण्याची इच्छा असल्यास परमेश्वर त्यांस साह्य देईल.

**ख्रिस्ती, यहुदी,** व एक ईश्वर मानणारे असे दुसऱ्या धर्मांचे लोक यांच्यांतील सुशील बायकांशीं लग्न करण्याची मुभा **मुसलमान** लोकांस आहे. **कुरानांत** सांगितलें आहे कीं, आपल्या बायकांबरोबर पवित्र आचरण ठेवा; व्यभिचार करूं नका; व वेश्यागमन करूं नका. बायकांनीं बुर्खा घेण्याची चाल, पूर्वींपासून **अरबस्थानांत** चालत आलेली होती, तेव्हां ती तशीच कायम राहिली. **कुरानांत** या बाबतींत असें सांगितलें आहे कीं, हे **पैगंबरा,** तूं आपल्या बायकांस, आपल्या लेंकींस आणि तुझे जे शिष्य आहेत, त्यांच्या बायकांस सांग कीं, घराबाहेर चालतांनां तुह्मी आपला बुर्खा सर्व अंगभर खालवर पडूं द्या, ह्मणजे त्यांनां लोक इजतदार गरती स्त्रिया आहेत असें सहजच ओळखतील व बीभत्स शब्दांनीं अथवा बीभत्स अंगचेष्टांनीं त्यांचा अपमान होणार नाहीं. विश्वास ठेवणाऱ्या बायकांस सांग कीं,

त्यांनीं आपली दृष्टि आंवरून ठेवावी, व आचरणांत संयमन ठेवावें. वर वर दिसणाऱ्या दागिन्यांखेरीज आपले अलंकार लोकांस न दिसतील अशी खबरदारी ठेवावी; व आपल्या पदरानें आपलें वक्षस्थळ झांकावें. **पैगंबरा**च्या घरांत पडदा नसे. **अयेशा**बाईनें तर **अली**विरुद्ध स्वतः लढाई चालविली. **पैगंबरा**ची कन्या **फातमा**बाई ही तर **पैगंबरा**च्या मागून **खलिफता** कोणास द्यावयाची ह्या वादांत पुढाकार घेत असे. तशीच **पैगंबरा**ची नात **झैनाब** ही मोठी शूर असे. **पैगंबरा**च्या उपदेशानें एवढें झालें कीं **अरबस्थानां**त जो अनाचार माजत चालला होता, त्याचा जोर कमी झाला. स्त्रीजातीचा गौरव **पैगंबरा**च्या हातून झाला ही गोष्ट निर्विवाद आहे. स्त्री बाल्यावस्थेंत असतां, आपल्या मातापितरांच्या ताब्यांत सर्वस्वीं असते; परंतु वयांत आल्यावर **कुराना**चे मतें स्त्री सर्वस्वीं स्वतंत्र होते. आपल्या भावाप्रमाणें तिला आपल्या मातापितरांच्या धनाचा वांटा मिळतो. वयांत आलेल्या स्त्रीचें लग्न तिच्या संमतीशिवाय होत नाहीं. लग्न झाल्यावर तिचें स्वातंत्र्य नष्ट होत नाहीं. ह्मणून लग्नाच्या कराराच्या वेळीं नवऱ्यानें बायकोला बक्षीस ह्मणून कांहीं धन देणें अवश्य आहे. हें धन अतिशय ह्मणजे किती असावें ह्याची मर्यादा नाहीं; परंतु तें अगदीं थोडकें ह्मटलें तर दहा दर्म ( ह्मणजे सुमारें ३० रुपये. ) इतकें असावें; आणि तें लग्न झाल्यावर कांहीं दिवसांनीं द्यावें असा

करार करण्याचा शिरस्ता आहे; तथापि फलशोभन होतांच अथवा नवरा मरण पावतांच अथवा काडी मोडून दिल्यानें नवराबायकोचा संबंध तुटतांच हें धन घेण्याचा बायकोला हक्क प्राप्त होतो. आपणास नवऱ्यानें बक्षीस दिलेलें धन वसूल करण्यापुरता बायकोचा आपल्या मयत नवऱ्याच्या मिळकतीवर हक्क चालतो. नवऱ्यानें बायकोस जें धन बक्षीस देण्याचें कबूल केलें असेल त्याची रकम केवढीहि असली तथापि ती कायद्याप्रमाणें बायकोला मिळूं शकते. बक्षीसाची रकम अमुक असें ठरलेलें नसल्यास त्या स्त्रियेच्या बापाच्या कुळांतील दुसऱ्या स्त्रियांनां जी रकम मिळाली असेल तिच्या मानानें तिला मिळते. बक्षीस द्यावयाचें धन कर्जादाखल समजलें आहे. कानुनांत सांगितला आहे त्यापेक्षां जास्त हक्क लग्न झाल्यामुळें स्त्रीवर पुरुषाचा बसत नाहीं; व तिच्या स्थावरजंगम धनावर नवऱ्याचा हक्क बसत नाहीं. स्त्रीनें मिळविलेलें धन नवऱ्याला तिच्या परवानगी शिवाय खर्च करितां येत नाहीं. वयांत आल्यावर आपल्या धनाची व्यवस्था स्त्री स्वतःच करूं शकते. तिला आपल्या नवऱ्यामार्फत अथवा बापाच्यामार्फत त्याची व्यवस्था केली पाहिजे असें नाहीं. कोर्टांत फिर्याद करण्याचा अधिकार तिला आहे. नवऱ्याच्या नांवानें फिर्याद करण्याची जरूर नाहीं. जे पुरुषांस हक्क आहेत तेच स्त्रियांसहि आहेत; आणि हें कुरानांत स्पष्ट करून ठेविलें आहे.

# अध्याय १४ वा.

## दास.

"जें तुह्मी खातां तें तुमच्या गुलामांस खावयास द्या. आणि जीं वस्त्रें तुह्मी परिधान करितां तशींच वस्त्रें त्यांस लेण्यास द्या."

गुलामगिरी ही फार प्राचीनकाळापासून जगांत चालू आहे. मात्र मानवांची जसजशी सुधारणा होत गेली, तसतशी ही गुलामगिरी कमी कमी होत गेली. दुसऱ्याच्या बळाचा उपयोग करून घेऊन आपली मेहनत वांचवून सुख साध्य करून घेणें हें गुलामगिरीचें मूळ. मनुष्यांचें परस्परांशीं कसें वर्तन असावें याविषयीं जनसमाजांत निर्बंध होण्याचे पूर्वीं, बळी तो कान पिळी हाच नियम प्रचलित होता. गुलामगिरी जशी रानटी लोकांत होती, तशीच सुधारलेल्या लोकांतहि आजपर्यंत चालत आली आहे. **इस्लामी** धर्मांत जातिभेद किंवा वर्णभेद मानण्याची चाल नाहीं. मानवांची योग्यता सारखीच व दर्जा पण एकच. रणीं, राजदरबारीं, राजप्रासादीं, अथवा परमेश्वरमंदिरीं सर्वांचा मान सारखाच. सर्वजण मोकळ्या मनानें एकमेकांस भेटतात. **इस्लामा**चा पहिला मुवाझीम ह्मणजे प्रार्थनेस पुकारणारा **शिद्दी** गुलाम होता. **इस्लामा**नेंच गुलामगिरीची पहिल्यानें कंबर मोडिली. आपल्या शिष्यांस **पैगंबरा**चा असा उपदेश होता कीं,

गुलामांस बंधांतून मुक्त करण्याइतकी दुसरी कोणतीहि गोष्ट परमेश्वराला प्रिय नाहीं. विहित आचार करण्यांत अंतर पडल्यास त्याची क्षमा गुलामांची सुटका केल्यानें होते. त्यानें अशीहि आज्ञा केली कीं, जे गुलाम नोकरी करून नोकरीवर मिळविलेल्या पैशानें आपली सुटका करून घेऊं इच्छितात, त्यांस तसें करूं देण्याची सवड द्यावी. ज्या गुलामांस साम्प्रत द्रव्य मिळविण्याचें साधन नसेल, व ज्यांची इच्छा दुसरीकडे जाऊन कामधंदा करून द्रव्यसंचय केल्यावर आपली मुक्तता करून घ्यावी अशी असेल, त्यांच्या धन्यानें त्यांच्यापासून करार करून घेऊन त्यांस मुलखावर जाण्याची परवानगी द्यावी. आपली सुटका करून घेण्यास गुलाम लोकांस सरकारी खजिन्यांतून उसनें द्रव्य देण्याची पैगंबरानें तजवीज करून ठेविली होती. गुलामानें लिहून दिलेल्या करारनाम्यांतील शब्दार्थ कसा करावा याचा संशय पडला तर त्यांत गुलामाच्या फायद्याची गोष्ट ज्या अर्थें-करून निघेल तोच त्या शब्दाचा अर्थ आहे असा निर्णय केला पाहिजे असा कानून त्यानें घालून दिला.

मी आपल्या गुलामास मुक्त करीन असे शब्द धन्याच्या मुखांतून चुकून जरी निघाले तरी तें जाणूनबुजून दिलेलें वचन आहे असें मानून तें खरें करण्याचें धन्याला भाग आहे. आपल्या गणगोतांतलीं माणसें, शेजारी, आपल्यासह असणारे प्रवासी, वाट चुकलेले प्रवासी, ह्या लोकांशीं जशी आपली

वागणूक स्नेहाची असते, तशीच स्नेहाची वागणूक गुलामाबरोबर असावी, असा **पैगंबरानें** नियम घालून दिला. गुलामांची बंदांतून मुक्ति सढळ हातांनीं करावी. आपल्या द्रव्यांतील हिस्सा त्यांस द्यावा. आपले ताब्यांतील दासीशीं संभोग करण्याची इच्छा धरूं नये; परंतु तसा प्रसंग घडून आल्यास दासीस आकाशांत अक्षय सुखलाभ होईल असें अभिवचन त्यानें दिलेलें आहे. तसेंच दासीपासून झालेली संतती स्वतंत्र समजली जाईल व धन्याच्या मरणानंतर दासींनां स्वातंत्र्य मिळेल असें ठरविलें आहे. एखाद्या **मुसलमाना**ची जर हत्या झाली तर गुलामास मुक्त करणें हें प्रायश्चित्त योजिलें आहे. कांहीं प्रकारचें असत्य भाषण झाल्यास गुलामाची सुटका करावी, ह्मणजे मनुष्यास प्रायश्चित्त मिळून तो निर्दोष होतो. जो एकदां दासपणांत सांपडला त्यानें जन्मभर त्याच स्थितींत राहावें असा **इस्लामा**चा हेतु कधींहि नव्हता. **पैगंबरानें** असें स्थापिलें होतें कीं, परदेशांतील मनुष्य **इस्लामी** राजाच्या राज्यांत जर पळून आला तर त्याला मुक्त करावें. गरीबांच्या पोषणाकरितां ह्मणून जो एक कर घेत त्यांतील कांहीं रकम गुलामांनां मुक्त करण्याकडे लावावी असाहि नियम केला. धन्यांनीं गुलामांकडून वाजवीपेक्षां फाजील काम करून घेऊं नये अशी **पैगंबराची** सक्तीची ताकीद असे. गुलाम ह्मणून दासांस धन्यांनीं हाक

मारूं नये. तर "माझ्या तरुण गड्या" अगर "माझ्या तरुण गडे" अशी हाक मारावी.

ज्या प्रकारचें अन्न धनी खातो त्याच प्रकारचें अन्न दासास खावयास द्यावें; व जशीं वस्त्रें धनी परिधान करितो तशींच वस्त्रें दासास परिधान करण्यास द्यावीं. गुलाम करते वेळीं कोणाहि लेंकरांस त्यांच्या आईपासून दूर करूं नये. भावास भावापासून दूर करूं नये. बापास लेंकरांपासून दूर करूं नये. नवराबायकोची ताडातोड करूं नये. अथवा गणगोतांचीं माणसें एकमेकांपासून दूर करूं नयेत. दास्यत्व असल्यामुळें मनुष्य नीच गणतां कामा नये. कारण दास्यत्व हें प्रसंगोपात्त चांगल्या स्थितींतल्या मनुष्यांसहि प्राप्त होतें; ही स्थिति आज आहे तर उद्यां नाहींशी होईल, अक्षयींची नाहीं. **झैद** याजला **पैगंबरानें** दासपणांतून मुक्त केलें होतें व त्याजकडे सर्व सैन्याचें आधिपत्य दिलें होतें; आणि मोठमोठ्या कुळांतील सरदार मोठ्या आनंदानें त्याच्या हाताखालीं काम करीत असत. **हेल्लेणी** लोकांवर जी स्वारी केली त्या स्वारीवरचे सैन्याचें आधिपत्य **अबूबकरानें झैद** याचा मुलगा **ओसेमा** याजकडेसच सोपिलें होतें. लढाईंत जे कैदी सांपडतील मग ते पुरुष असोत अगर स्त्रिया असोत त्यांनांच दास करावें, इतरांस करूं नये असा **कुराना**चा बोध आहे. **पैगंबरा**च्या पूर्वीं गुलामांचा व्यापार चालत असे. योग्य अगर अयोग्य लढाईंत सांपडेल त्यास गुलाम करून किफायतीनें लोकांस विकावें, व आपला

स्वार्थ साधून घ्यावा, अशी वहिवाट चालत आली होती. परंतु **पैगंबरानें** असा परिपाठ घातला कीं, जी वाजवी रीतीनें लढाई झाली असेल व तींत जे लोक पाडाव केले जातील त्यांसच दास्यांत टाकावें, व त्यांची कोणीं खंडणी दिल्यास त्यांस सोडून द्यावें; अथवा नोकरी करून ते आपली खंडणी करून घेत असल्यास त्यांस तशी सवड द्यावी. वारंवार तर असें होत असे कीं, गुलामानें **पैगंबराची** आग्रहपूर्वक विनंति केल्यास त्या गुलामाची लवकरच सुटका होई. दुसऱ्या लोकांनां त्यांच्या देशांतून चोरून आणून त्यांस दास्यत्वांत घालणें अगर गुलामांचा व्यापार चालू करणें, ह्यांची **पैगंबरानें** सक्त मनाई केली होती. **पैगंबराच्या** शब्दांचा खरा हेतु ह्मटला ह्मणजे दासपणा जगांतून नाहींसा व्हावा असा आहे तेव्हां दासपणा जगांतून नाहींसा करण्याविषयीं सर्व **मुसलमानांनीं** झटावें, हें त्यांचें कर्तव्य कर्म आहे.

---

# अध्याय १५ वा.

## जिहाद अथवा इस्लामी धर्माच्या लोकांनीं धर्मा-करितां केलेलीं युद्धें.

धर्माच्या बाबतींत बळजबरी नसावी. सुरा (२) ओवी २५७.

**महमद पैगंबराच्या** धर्माचा विस्तार जो अतित्वरेनें झाला, त्याची हकीकत लक्षांत ठेवण्यासारखी आहे. **पैगंबर**

मरून पुरीं तीस वर्षें झालीं नाहींत तोंच लक्षावधी लोकांनीं त्याच्या धर्माचा स्वीकार केला; आणि एक शतक पुरें झालें नाहीं तोंच त्रिखंड पृथ्वीवर त्याच्या धर्माचा प्रसार झाला. हा प्रसार तरवारीच्या जोरावर झाला नाहीं. **मदीनेस पैगंबराचें** आगमन झालें त्या समयास **अवस** व **खिजराज** या दोन जातींचे आपसांतील तंटे जरी मिटले होते, तथापि त्यांची पुनरुत्पत्ति होण्याचा संभव होता. प्रारंभीं **यहुदी** लोक **मदीनेकर अरबांचा** आश्रय धरून असत. हा आश्रय सोडून स्वतंत्र रीतीनें राहातां यावें या उद्देशानें बळाची जमवाजमव करण्याच्या तजविजी या समयास त्यांनीं चालविल्या होत्या. ज्या **मक्केकर** शिष्यांनीं आपल्या गुरूसाठीं जीवाचीहि परवा ठेविली नव्हती; व जे उपासमार सोसून व देशत्याग करून त्याच्या बरोबर **मदीनेस** आले होते, अशा लोकांची संख्या फारच थोडी होती. **मदीनेकर** लोकांपैकीं फारच थोड्या लोकांनीं त्याचें शिष्यत्व प्रथमारंभीं पत्करिलें होतें. शिवाय **मदीनेकरांत** एकी नसून फूट होती. **मदीनेकरांतील** एक सरदार **मदीनेचें** राज्यपद मिळविण्याचे उद्देशानें मूर्तिपूजकांचे सल्यानें वागत असे. **यहुदी** लोकांची आपसांत जूट होती. त्यांनीं विषप्रयोग व विश्वासघात या साधनांनीं **पैगंबराशीं** वितुष्ट मांडिलें.

**पैगंबराच्या** शिष्यसमुदायांत जे नाना जातींचे लोक जमले होते, त्यांची आपसांत जूट जमावी, व त्यांनीं परस्परांशीं

प्रेमभावानें वागावें, ह्मणून **पैगंबरानें** पुष्कळ यत्न चालविले. दोघां भिन्न जातींच्या माणसांत तंटा झाला तर जातवाले लोक तंटा आपला आहे असें समजून परस्पर जातिजातींशीं युद्ध माजवीत. तसें न व्हावें ह्मणून पंच लोकांनीं तंटे तोडावे अशी **पैगंबरानें** योजना केली. **अवस** व **खिजराज** असा जो कुटुंबभेद असे तो त्यानें नाहींसा केला. त्यानें आपल्या जमातींत **यहूदी** व **ख्रिस्ती** यांचा समावेश केला. जे त्याच्या धर्मावर श्रद्धा ठेवीत होते, त्यांचा आपसांत प्रेमभाव वाढून त्यांचें एकमेकांचे घरीं जाणेंयेणें असावें ह्मणून त्यानें नियम घालून दिले. **यहूदी, ख्रिस्ती** व **साबी** आणि इतर ज्या लोकांचा परमेश्वरावर भाव आहे, व जे परलोक आहे असें मानितात, व सदाचरणानें वागतात, त्यांवर कोणत्याहि प्रकारचें संकट गुदरणार नाहीं, असें त्यानें जाहीर केलें. जो कोणी आपला सूड उगविण्याचा हक्क सोडून देईल, त्यास ईश्वरापासून पापाची क्षमा मिळेल. जो कोणी माणसां-मध्यें मध्यस्ती करून वितुष्ट मोडून टाकील, त्याचें नुकसान न होतां, कल्याणच होईल, परंतु जो कोणी वितुष्ट माजवील त्याला दुःखच सोसावें लागेल असा त्यानें बोध केला.

याप्रमाणें **पैगंबर** लोकांची सुधारणा करीत असतां व त्यांस दुराचरणापासून दूर करून पुण्यवंत करीत असतां, त्याचा सूड घ्यावा ह्मणून त्याच्या शत्रूंनीं अविश्रांत श्रम चालविले. त्याला मारून टाकून त्याच्या मतास मुळापासून खणून काढून

नष्ट करण्याचा त्यांनीं विडा उचलला. पूर्वापार चालत आलेल्या आमच्या धर्माचा नाश करण्याकरितां, **महमद** व त्याचे अनुयायी यांनीं आमच्या शत्रूंच्या शहराचा आश्रय करून ह्या नवीन मताचा फैलाव करण्याचें मांडिलें आहे, तेव्हां समस्त **अरबस्थानानें** एकत्र होऊन त्या लोकांनां निर्मूळ केलें पाहिजे, असें त्यांनीं जाहीर केलें. ह्या **मुसलमान** लोकांचा अदृश्य परमेश्वर, त्याची अनन्य भावाची पूजा, हीं व परस्परांवर प्रेम करण्याचा व अंतःकरणांत सुविचार ठेवण्याचा जुलूम आह्मांस नको; व ह्या गोष्टींकरितांच ह्यांनीं आमचे पुरातन देव सोडून दिले आहेत, तेव्हां अशा पिशांस जगांतून निर्मूळच केलें पाहिजे, असें **पैगंबराचे** शत्रू ह्मणत. अशा जालीम लोकांपासून आपला व आपल्या शिष्यमंडळीचा बचाव करून घेणें अवश्य होतें. हा बचाव करण्यासाठीं **पैगंबरानें** जर तरवार हातीं धरली नसती, तर तो व त्याचें शिष्य-मंडळ रसातळास जाऊन पोंचलें असतें. जेव्हां शत्रूंनीं **पैगंबरावर** हल्ला करण्यास प्रारंभ केला तेव्हां आपलें व लोकांचें रक्षण होण्यासाठीं तरवार ध्यावी ह्मणून ह्यानें आपले शिष्यांस सांगितलें. परमेश्वराच्या भक्तांत आपलें गणगोत आहे, त्यांच्या बरोबर आपल्या आणाभाका झाल्या आहेत, त्यामुळें त्यांची व आपली दोस्ती झाली आहे ह्या सर्व गोष्टींचा विसर पडून जेव्हां तुमच्या अंगावर ह्या देशांतील लोक दौड करून येतील त्या प्रसंगीं तुह्मी आपला बचाव करण्यास

मागें हटूं नका. तुमचे शत्रु तुमच्यावर चालून आल्यास आपला बचाव करण्यास तत्पर असा; परंतु तुह्मी होऊन प्रथमतः तुटून पडूं नका. आगळीक करणारावर परमेश्वराचा क्रोध आहे. असें **पैगंबरा**चें आपल्या लोकांस सांगणें होतें.

**यहूदी** लोकांनीं **मुसलमान** लोकांशीं जें भयंकर वितुष्ट केलें, **मुसलमानां**बरोबर केलेल्या तहनाम्याची व करारनाम्याची जी त्यांनीं पायमल्ली केली, सतत बंडखोरपणा जो त्यांनीं चालविला, आणि **मुसलमानां**स मूर्तिपूजकांच्या हातीं देण्यासाठीं जो त्यांनीं पुनः पुनः प्रयत्न चालविला, त्या सर्व गोष्टींवरून **यहूद्यां**चें पारिपत्य करणें **मुसलमानां**स भाग पडलें. **मुसलमानां**ची जमात त्या वेळीं लहान व दुर्बळ होती ह्मणून त्यांचा बचाव करण्याकरितां व त्यांच्यावर सहसा कोणीं येऊन पडूं नये ह्मणून धास्ती उत्पन्न करण्याकरितां **यहूदी** लोकांचें पारिपत्य करणें भाग झालें. त्यांचा सूड उगवावा या हेतूनें त्यांचें पारिपत्य केलें नाहीं.

ही गोष्ट निर्विवाद आहे कीं **मदीने**करांकडून आपल्या पुरींत येण्याविषयीं त्यास पाचारण झाल्यामुळें **महमदानें** आरंभिलेल्या कार्यास विजय मिळाला, तसेंच ह्या निमंत्रणाच्या अंगीकारापासून जशी **मदीने**करांच्या धर्माध्यक्षपणाचीं सर्व सूत्रें त्याच्या हातांत आलीं, तशींच राज्यसूत्रेंहि त्याच्या हस्तगत झालीं. त्यामुळें मुख्य न्यायाधीशीचें काम व प्रजापालनाचें काम हीं त्याच्या अंगावर येऊन पडलीं. जसे

ह्याच्या सुखदु:खाचे विभागी **मदीने**कर झाले, तसाच **पैगंबर** त्यांच्या सुखदु:खाचा वांटेकरी झाला. मूर्तिपूजक व त्यांचे दोस्त यांनीं **मुसलमान** लोकांचा छळ मांडिला होता. त्यामुळें त्यांच्या हालचालीचें धोरण कोणीकडे आहे हें डोळ्यांत तेल घालून पहाणें **पैगंबरास** भाग पडलें. एकट्या **मदीना** शहरानें देशांतील समस्त लोकांशीं सामना करणें मोठें कठीण काम होतें. हळू हळू सामोपचारानें **अरबस्थानां**तल्या निरनिराळ्या जाती **पैगंबरास** येऊन मिळाल्या व एका निराकार परमेश्वराची भक्ति करूं लागल्या. ह्या धरित्रीवरच्या सर्व लोकसमुदायांत **अरब** लोक नास्तिक, दांभिक, तापट व उग्र, आहेत. अशा लोकांस, आपल्या मनोविकारांस आवरून कसें धरावें याचा धडा **पैगंबरानें** उत्तम प्रकारें घालून दिला. ही मोठी नवल करण्यासारखी गोष्ट आहे. शांततेच्या समयीं व लढाईच्या समयीं राष्ट्रांचें परस्परांमध्यें वर्तन कसें असावें याबद्दल नियमबंधन त्या कालापर्यंत मुळींच नव्हतें. राष्ट्रामध्यें व निरनिराळ्या जातींमध्यें युद्धसंग्राम झाला ह्मणजे जो विजयी होईल त्यानें पराजय पावलेल्या लोकांमध्यें जे अंगानें बळकट त्यांची कत्तल उडवावी, जे निराश्रित व निरपराधी त्यांस दास बनवावें, घरांतील मालाची लूट करावी, अशी वहिवाट **रोमी** लोकांची सत्ता प्रबळ होती त्या वेळीं सुद्धां होती. आसमंतात्‌भागींच्या राष्ट्रास जिंकून अंकित करून ठेवावें; हाच काय तो प्राचीन लोकांच्या लढाईचा उद्देश असे. आपलें

काम करून घेणें असल्यास तह करावा; व आपल्या सोयीस पडेल त्या वेळीं तो तह मोडावा. परराष्ट्रांचें स्वातंत्र्य ह्मणजे कवडीमोल अशी प्राचीन लोकांची समज असे.

ज्या समयीं जगांत नैतिक व सामाजिक विषयांच्या बाबतींत अज्ञान होतें, त्या वेळीं **पैगंबरानें** सर्वत्र समता आहे, कोणाचाहि दर्जा कमी नाहीं व जास्तहि नाहीं अशा नियमांचा आचारविचार प्रसिद्ध केला ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. **महमदा**चें लोकांस ह्मणणें असें असे कीं, तुह्मी **इस्लामी** धर्माचा अंगीकार करा. पण कोणावरहि बळजबरी करून **महमदानें** आपला धर्म स्थापन केला नाहीं. जे कोणी त्या धर्माचा अंगीकार करीत त्यांस **मुसलमानां**चे हक्क व अधिकार मिळत. जे परधर्मी लोक **इस्लामी** राजांचे अमलाखालीं राहात, त्यांस आपापल्या देवाची भक्ति करण्याची मुभा असे. **कुरानां**त सांगितलें आहे कीं, धर्माच्या बाबतींत कोणावर बळजबरी होऊं नये. यावरून सिद्ध होतें कीं **इस्लामी** अमलाखालीं राहाणाऱ्या प्रजेस धर्मसंबंधीं बाबतींत सर्व प्रकारची मोकळीक असे. एका स्थळीं असें सांगितलें आहे कीं, विश्वास तर परमेश्वराकडूनच प्राप्त होतो, असें आहे तर तूं विश्वास धरावा ह्मणून मनुष्यावर बळजबरी करणार काय? अशा प्रकारें बळजबरीचें आचरण न करितां जे तुला सोडून जातात त्यांस चिकटून राहा. आपल्या अंतःकरणाला ग्वाही ठेवून सत्य

वचन बोलत जा. जो तुझें वाईट करील, त्याचें तूं कल्याण कर. हा उपदेश दुर्बळ माणसाचा नव्हता, तर ज्याच्या हातांत सर्व सत्ता होती, फौजफांटा होता, राज्याचीं सर्व सूत्रें होतीं, अशा माणसानें हा उपदेश केला होता. निर्बल असे पुष्कळ धर्मवीर सांगतात कीं, शांतीच्या मार्गाचा अवलंब करा. राज्यकार्यधुरंधर हे सत्ता हातीं नसली ह्मणजे सांगतात कीं, आपल्या वर्तनांत पुष्कळ साम ठेवावें; परंतु तीच सत्ता हातीं आली ह्मणजे उपदेशाचा झोंक सर्वस्वीं बदलतो. **पैगंबरानें** जेव्हां **मक्केच्या** जुन्या मंदिरांत आपल्या फौजेनिशीं प्रवेश केला, त्या वेळीं तो ह्मणाला सत्याचा विजय झाला. अंधःकाराचा लोप झाला. असें बोलून त्यानें एकदोघे शिवायकरून बाकीच्या सर्व **मक्केकर** लोकांस माफी दिली. दुर्बळ व अनाथ यांचें संरक्षण करण्याची आज्ञा दिली; आणि दास होते त्यांस मुक्त केलें. त्यानें बाकीच्या सर्व लढाया अशाच धर्तीवर केल्या.

पराजय पावलेल्या लोकांपासून थोडाबहुत कर घेऊन त्यांस आपापले धर्मसंबंधी आचारविचार पाळण्याची तो मुभा देत असे. एकदां कराची रक्कम ठरल्यावर जर कोणीं पराजित लोकांच्या धर्मकृत्यांत हात घातला तर **इस्लामी** धर्मा-विरुद्ध आचरण केल्याचा दोष अशा माणसावर येई. **नाज-रान** गांवच्या **ख्रिस्ती** लोकांस **पैगंबरानें** जो जाहीरनामा पाठविला तो खालीं दिला आहे. " **बनीहारीसकरांचे** बिशप

यांस तसेंच **नाजरान**करांचे बिशप, प्रीस्ट व संन्याशी आणि जती यांस परमेश्वराच्या **पैगंबरा**कडून लिहून जातें कीं, आजतागाईत जे तुह्मी आपले धर्माचे सानथोर आचार व विधी आपआपल्या देवळांत, मठांत व प्रार्थनादि भक्तीचे स्थळीं पाळीत आलां ते सर्व तुह्मीं बिनधोक या पुढेंहि पाळावे. कोणताहि बिशप आपल्या गादीवरून दूर केला जाणार नाहीं. कोणताहि संन्याशी आपल्या मठांतून काढला जाणार नाहीं, व कोणताहि प्रीस्ट आपल्या कामावरून दूर केला जाणार नाहीं. त्यांचे हक्कांत व अधिकारांत कोणत्याहि प्रकारें फेरफार केला जाणार नाहीं. त्याचप्रमाणें त्यांच्यांत ज्या गोष्टी चालू आहेत त्या तशाच कायम ठेविल्या जातील. जोंपर्यंत तुह्मी शांत बुद्धीनें व नीतीनें आपलें आचरण ठेवाल तोंपर्यंत तुमच्यावर बळजबरी होणार नाहीं. तुह्मीहि कोणावर बळजबरी करूं नका. अशाविषयीं परमेश्वराकडून व त्याच्या **पैगंबरा**कडून तुह्मांस अभिवचन दिलें जात आहे.

तरवारीच्या बळावर आपल्या धर्माचा फैलाव करावा हें **पैगंबरा**च्या स्वभावाला आवडत नसे. तसेंच धर्ममताच्या बाबतींत वितंड वाद करण्याचा त्याला तिटकारा असे. पुनः पुनः तो ह्मणे कीं, जें तुह्मांस माहित नाहीं, त्याचा वितंडवाद कां करीत बसतां? सत्कृत्यें करण्यांत परस्परांवर एकमेकांनीं सरशी करावी. ज्या वेळीं तुह्मी परमेश्वराकडे जाल त्या वेळीं

तो तुमच्यांतील मतभेदाचा खुलासा करून देईल. **मूटा** येथील लढाई व **टेबूका**वरची स्वारी ह्या दोन्ही गोष्टी घडून येण्याचीं कारणें ह्मटलीं ह्मणजे त्या देशांत **पैगंबरानें** जे आपले वकील पाठविले होते त्यांस **हेल्लेणी ख्रिस्ती** लोकांनीं ठार केलें हें होय. ह्या लोकांचें पारिपत्य **पैगंबराच्या** हातून न होतां पुढें त्याच्या शिष्यांनीं केलें. राष्ट्राची परस्परांमध्यें नीति कशी असावी ही गोष्ट **कुरान** धर्मशास्त्रांत सांगितली आहे. त्या ग्रंथांत विनाकारण लढाई करण्याविषयीं सांगितलें नाहीं. **मुसलमान** लोक समस्त परधर्मीयांस असें सर्वदां ह्मणत कीं, आमच्याशीं तुह्मी तंटा करूं नका; व आमचे दोस्त व्हा; आणि आह्मी तुमच्याशीं विश्वासानें वागूं. हें पसंत पडल्यास आह्मांस खंडणी द्या; व आह्मी तुमचा सर्व प्रकारें प्रतिपाळ करूं. तुह्मांस कोणाकडूनहि इजा होऊं देणार नाहीं. तुमचे हक्क जितके असतील तितके तुह्मी पाळा. खंडणी देणें तुह्मांस पसंत नसेल तर आमच्या धर्माचा अंगीकार करा. ह्मणजे आमचे जे जे हक्क आहेत ते तुह्मांस मिळतील व त्यांचा तुह्मी सुखानें उपभोग घ्या. युद्धसंग्रामाच्या संबंधानें जे नियम **पैगंबरानें** लावून दिले आहेत, त्यांवरच लढाईची तजवीज सर्व **मुसलमान** लोक बांधतात. ते नियम साधारणतः हे आहेत कीं जे तुमच्यावर शस्त्र धरितात, त्यांच्याबरोबर तुह्मी परमेश्वरानें दिलेल्या धर्मासाठीं लढाई करा. पण

त्यांच्यावर प्रथमतः हल्ला करून तुह्मी आज्ञांचा अतिक्रम करूं नका. कारण अतिक्रम करणारावर परमेश्वराची कृपा नसते. जर त्यांनीं तुमच्यावर हल्ला केला तर तुह्मी त्यांचा जीव घ्या; परंतु त्यांनीं जर माघार घेतली तर तुह्मी नास्तिक लोक खेरीजकरून बाकीच्या लोकांशीं युद्ध करणें बंद करा.

समाप्त.

## परमेश्वराचीं नांवें फार गोड आहेत त्या नांवांनीं त्याचा धांवा करा.



१ अर्रहमान = वत्सल.
२ अर्रहीम = दयाळू.
३ अल् मलिक = शास्ता.
४ अल् कुद्दूस = पवित्र.
५ अस्सलाम = शान्त.
६ अल् मोमिन = सत्यसंध.
७ अल् मुहैमिन = रक्षण.
८ अल् अजीज = महाशक्ति.
९ अल् जब्बार = दमयिता.
१० अल् मुतकब्बिर = महान्.
११ अल् खालिक = स्रष्टा.
१२ अल् बारि = कर्ता.
१३ अल् मुसव्विर = विधाता.
१४ अल् गफ्फार = क्षमाशील.
१५ अल् कहहार = प्रबळ.
१६ अल् वहहाब = वदान्य.
१७ अर्रज्जाक = भर्त्ता.
१८ अल् फत्ताह = प्रकाशन.
१९ अल् आलिम = ज्ञाता.
२० अल् काबिज = निग्रहः.
२१ अल् बासित = वर्धन.
२२ अल् खाफिज = मानभंजक.
२३ अर्राफे = उद्धारक.
२४ अल् मुइज् = मानद.
२५ अल् मुजिल् = मायी.
२६ अस्समी = श्रोता.
२७ अल् बसीर = द्रष्टा.
२८ अल् हाकिम = न्यायाध्यक्ष.
२९ अल् अद्ल = न्याय.
३० अल् लतीफ = सूक्ष्म.
३१ अल् खबीर = सावधान.
३२ अल् हलीम = दयार्द्र.
३३ अल् अजीम = बृहत्.
३४ अल् गफूर = क्षमाशील.
३५ अश्शकूर = कृतज्ञ.
३६ अल् अली = पर.
३७ अल् कबीर = स्थूल.
३८ अल् हफीज = गोप्ता.
३९ अल् मुकीत = बलवर्धन.
४० अल् हसीब = गणक.
४१ अल् जलील = महातेज.
४२ अल् करीम = उदारधी.
४३ अर्रकीब = प्रजागर.
४४ अल् मुजीब = कामद.
४५ अल् वासे = विभुः
४६ अल् हकीम = ज्ञान.
४७ अल वदूद् = प्रेमल.
४८ अल् मजीद = भगवान्.

४९ अल् बाइस = उद्धाता.
५० अश्शहीद = साक्षी.
५१ अल् हक् = सत्य.
५२ अल् वकील = नेता.
५३ अल् कवी = प्रतापवान.
५४ अल् मतीन = स्थाणु
५५ अल् वली = आश्रय.
५६ अल् हमीद = स्तव्य.
५७ अल् मुहसी = गणयिता.
५८ अल् मुबदे = आरब्धृ.
५९ अल् मुईद = पूरयिता.
६० अल् मुहयी = जीवन.
६१ अल् मुमीत = काल.
६२ अल् हइ = नित्य.
६३ अल् कय्यूम = शाश्वत.
६४ अल् वाजिद = स्थिर.
६५ अल् माजिद् = भगवान्.
६६ अल् वाहिद = एकमेव.
६७ अस्समद = अमर.
६८ अल् कादिर = भीम.
६९ अल् मुक्तदिर = प्रभु.
७० अल् मुकद्दिम् = प्रागोपदेष्टा.
७१ अल् मुवख्खिर = समाप्तिकर्ता.
७२ अल् अव्वल = आदि.
७३ अल् आखिर = अंत.
७४ अज्जाहिर = व्यक्त.
७५ अल् बातिन = अव्यक्त.
७६ अल् वाली = ईश.
७७ अल् मुतआल = परम.
७८ अल् बर्र = सत्यधर्मपरायण.
७९ अत्तव्वाब = सुलभ.
८० अल् मुन्तकिम् = शत्रुतापन.
८१ अल् अफू = क्षमावान्.
८२ अर्रऊफ = कारुणिक.
८३ मालि कुल्मुल्क = जगन्नाथ.
८४ जुल जलाल वलइक्राम = प्रतापौदार्याधीश.
८५ अल् मुकसित = समदर्शिन.
८६ अल् जामे = संग्राहक.
८७ अल् गनी = स्ववश.
८८ अल् मुगनी = द्रविणप्रद.
८९ अल् मुअती = दाता.
९० अल् माने = दमयिता.
९१ अज्जार = भयकृत.
९२ अन्नाफे = स्वस्तिकृत.
९३ अन्नूर = तेज.
९४ अल् हादी = नेता.
९५ अल् बदी = अतुल.
९६ अल् बाकी = अमेयात्मा.
९७ अल् वारिस = दायाद.
९८ अर्रशीद = सुव्रत.
९९ अस्सबूर = सहिष्णु.
१०० अल्ला = परमेश्वर.

